


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

(म.रा.साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

अंक २५५-ऑक्टोबर-डिसेंबर १९९०

## दिवाळी ९० : काव्य विशेषांक

### 'माझी आवडती कविता आणि तिची जन्मकथा'

**संपादक : शंकर सारडा**
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव,
डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १५ रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव, पुणे ४११०३०
टाईपसेटिंग : प्रमोद वि. बापट, प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

अनुक्रमणिका

दिवाळी १९९०

# अंतरंग

# संपादकीय

मित्रहो,

यंदा ज्ञानेश्वरी या मराठीतील श्रेष्ठ काव्यग्रंथाची जन्मशताब्दी आणि बालकवी त्र्यंबक बापूजी ठोंबरे यांची जन्मशताब्दी सर्वत्र साजरी होत आहे. या दोघां कविश्रेष्ठांच्या स्मृतीनिमित्त महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा दिवाळी अंक काव्यविशेषांक म्हणून काढण्यात येत आहे. मात्र नेहमीप्रमाणे निव्वळ कविता वा काव्यविषयक सैद्धान्तिक लेख न देता, या अंकासाठी एक सोपे, सुटसुटीत मध्यवर्ती सूत्र पुढे ठेवण्यात आले आहे. मराठीतील नामवंत नव्या-जुन्या कवींनी स्वतःच्या कवितांपैकी स्वतःला विशेष आवडती एक कविता निवडावी आणि तिची जन्मकथा सांगावी अशी कल्पना पुढे ठेवून, सुमारे सत्तर कवींना पत्रे पाठवली. त्यांपैकी चाळीसेक कवींनी या कल्पनेला प्रतिसाद दिला. त्या त्या कवींच्या आवडत्या कविता आणि त्या कवितेची प्रेरणा, निर्मिती प्रक्रिया, तिच्यातील छंद-लय-वृत्तात्मक प्रयोग, तिचे रसिकांनी केलेले स्वागत वगैरे मुद्द्यांच्या अनुषंगाने उद्बोधक तपशील देणारे लेख– असा हा मर्मबंधातील ठेवीचा मौल्यवान ऐवज या दिवाळी अंकाच्या निमित्ताने आमच्या रसिक वाचकांपुढे ठेवताना आनंद होत आहे.

अर्थात कुठलाही आनंद परिपूर्ण नसतो. काहीतरी त्रुटी जाणवतेच. या अंकात ज्यांचे लेख हवे होते अशी आणखी काही नावे आपल्याला हा अंक चाळताना सहज सुचतील. आम्हाला ती नावे सुचली नसतील असा ग्रह करून घेण्याचे कारण नाही. त्यांना आम्ही पत्रे आणि स्मरमणपत्रेही पाठवली होतीच. काहींनी लिहायचे मनात आहे असे कळवले होते; काहींनी लिहायला जमणार नाही असेही कळवले, परंतु काहींना आपल्या कामाच्या व्यापात पत्राचे उत्तर पाठवण्यासही सवड झाली नाही. काहींनी प्रत्यक्ष भेटीत जरूर लिहितो असे सांगितले होते; पण वेळेअभावी ते लिहू शकले नसावेत. हा खुलासा येथे करण्याचे कारण एवढेच की मुद्दाम कोणाला वगळावे असा आमचा हेतू नव्हता; आणि वाचकांना ज्यांची अनुपस्थिती जाणवेल त्यांची उपस्थिती आम्हांलाही हवीच होती हे वाचकांच्या लक्षात यावे.

कविवर्य कुसुमाग्रज, इंदिरा संत, डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. कृ. ब. निकुंब, सरोजिनी बाबर, संजीवनी मराठे, सुधांशु, शांता शेळके, सुरेश भट वगैरे ज्येष्ठ कवींनी या कल्पनेचे स्वागत केले; तसेच इतरही कवींनी आमच्या आवाहनाला प्रतिसाद दिला याबद्दल त्यांना मनःपूर्वक धन्यवाद.

या मनोगतांमधून मराठीतील गेल्या पन्नासेक वर्षांतील काही उत्तमोत्तम कृतींकडे आपले

लक्ष विनासायास वेधले जाईल. कवितेच्या निर्मिती-प्रक्रियेवरही प्रकाश पडेल. मराठीत ज्या मानाने चांगले काव्यलेखन होत आहे, त्या मानाने ते वाचकवर्गापर्यंत पोचत नाही; त्याची समीक्षा होत नाही; अनेक कवींच्या वाट्याला उपेक्षा येते किंवा त्यांचे नाव एका छोट्याशा परिघाबाहेर जातच नाही. काव्य उदंड लिहिले जात आहे आणि ते मोठ्या प्रमाणावर प्रसिद्धही होत आहे, परंतु कवीच्या पृथगात्म व्यक्तित्वाचे व जीवनदृष्टीचे रसरशीत दर्शन घडवणारे काव्य, चांगले काव्य, लक्षवेधक काव्य, दर्जेदार काव्य कुठले आणि रविकिरण मंडळ-नवकाव्य -दलित-काव्य-गझल-हायकू वगैरेच्या अनुकरणातून सर्रास लिहिले जाणारे उसने सूर आळवणारे काव्य कुठले याचा नीरक्षीरविवेक विशेष गांभीर्याने केला जात नाही. वृत्तपत्रात छापून येणाऱ्या सामान्य कवितांचा आदर्श समोर ठेवून त्यानुसार लेखन करण्यात धन्यता मानणारे कवी स्वतःच्या प्रतिभेला चुकीच्या दिशेने नेतात आणि काहीतरी भरकटत राहतात. 'कविता दशकाची' या सारखे उपक्रम हाती घेऊन, नव्या कवींमधील प्रतिभावंतांचा शोध घेणारी एक कार्यक्षम यंत्रणा कार्यरत व्हायला हवी; त्यायोगे चांगल्या कवींचे चांगले काव्य वाचकांपर्यंत पोचण्याच्या प्रक्रियेला वेग येऊ शकेल. कविसंमेलनांना हजेरी लावणारे आणि टाळ्या घेणारे कवी अनेकदा लोकांना आवडते तेच लिहावे-वाचावे या मोहचक्रात फसतात आणि स्वतःची कवी म्हणून जी काही प्रतिभा आहे ती व्यर्थ घालवतात. कविसंमेलनात टाळ्या घेणाऱ्या कविता म्हणजे चांगल्या कविता असा गैरसमज आधीपासून मनाशी घट्ट धरून वावरणाऱ्या कवींची आत्मवंचना थांबवणे अवघड जाते. एखादी कविता वाचल्यानंतर खाली तिच्या कर्त्याचे नाव नसले तरी तिचे वेगळेपण मनात रेंगाळत राहिले पाहिजे. भाषाशैलीचे प्रतिमा-प्रतीकात्मतेचे व कर्त्याच्या व्यक्तित्वाचे वेगळेपण स्वतःची वेगळी मुद्रा घेऊन अवतरले पाहिजे. 'स्वयंपूर्ण आत्मतेजोलयांकित जागा शोधण्यासाठी वहिवाटेची वाट सोडावी लागते, आपल्या अस्तित्वाचे संदर्भ तपासत अटळ कपाळमोक्षाच्या मार्गाने जावे लागते आत्मशोधाच्या आंधळ्या वाटेवर चाचपडत_ संदिग्धजटिल अनुभवविश्वाशी हुतात्म्याचे इमान राखत_गूढ शब्दगांधाराची अचूक सम पकडत जावे लागते' असे 'ग्रेस' यांच्या शब्दात सांगता येईल.

या अंकातील बहुतेक लेखांवरून जाणवते ते हे की, काव्याकडे आणि आपल्या निर्मितीकडे गंभीरपणे साधकाच्या भावनेने पाहणारे हे कवी आहेत. जाणीवपूर्वक केलेल्या रचनेपेक्षा अंतःस्फूर्तीने अवतरणाऱ्या काही शब्द-भावांना येथे विशेष मोल आहे. हे जे काही अंतःप्रेरणेने वा प्रतिभेने समोरच्या कागदावर उमटते ते काही वेळा त्या कवीलाही थक्क करून टाकते. कवी रोमँटिक असो, मार्क्सवादी असो वा दलित असो- निर्मिती प्रक्रियेत जाणिवेपेक्षा नेणिवेचा भाग अधिक आहे. कवीच्या त्या त्या कवितेमधून जे प्रकट होते ते केवळ त्या कवीच्या वैयक्तिक-खाजगी अनुभवाचे निवेदन-चित्रण उरत नसते; ते मानवजातीच्या असंख्य अनुभवांचे अनेकविध आकृतिबंधही घेऊन आलेले असते. आदिबंधात्मक समीक्षेच्या भाषेत सांगायचे तर कलावंत नेणिवेतल्या आदिप्रतिमांना वर काढून समकालीन भाषेत त्यांचा

आविष्कार करत असतो आणि हे करीत असताना जाणिवेतल्या मूल्यांशी त्यांचे नाते जोडतो. मानवी अंतःस्तलाशी निहित अशा, वैयक्तिक पातळीवरच्या अनुभूतीला सांस्कृतिक व्यवहाराच्या, सामूहिक जाणिवेच्या पातळीवर आणण्याचे काम साहित्य करते-हे आदिबंधात्मक समीक्षेचे सूत्र कळत नकळत प्रत्येकच कवीच्या निवेदनातून डोके वर काढताना दिसते. या निवेदनांमधली विविधता लक्षणीय आहेच; कवींच्या निवेदनातील प्रांजलपणाही विशेष नजरेत भरणारा आहे. कवींच्या आणि कवितेच्या अधिक निकट नेणारा हा दिवाळी अंक आहे असा बहुसंख्य चोखंदळ वाचकांना प्रत्यय येईल असा विश्वास वाटतो.

बालकवींच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने या अंकात माधव मनोहर आणि डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे दोन लेख देत आहोत. बालकवींच्या प्रतिभेचे दोन वेगळे पैलू आपल्यासमोर त्यामुळे येतील.

**साहित्य समालोचन अंक**

फेब्रुवारी १९९१ च्या पहिल्या आठवड्यात महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा साहित्य समालोचन अंक म्हणून प्रसिद्ध होईल. १९९० मध्ये प्रकाशित झालेल्या मराठी पुस्तकांवरील फेब्रुवारी १९९१ च्या पहिल्या आठवड्यात महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा साहित्य समालोचन अंक म्हणून प्रसिद्ध होईल. १९९० मध्ये प्रकाशित झालेल्या मराठी पुस्तकांवरील समालोचनात्मक लेख त्यात येतील. चोखंदळ वाचकांनी, समीक्षकांनी आपल्याला लक्षणीय वाटलेल्या कोणत्याही एका पुस्तकावर सुमारे हजार शब्दांत समीक्षणात्मक मजकूर पाठवावा. दिनांक १ जानेवारी १९९१ च्या आत तो आम्हाला मिळावा. प्रसिद्ध होणाऱ्या सर्व लेखांना साहित्य पत्रिका मानधन म्हणून फूल ना फुलाची पाकळी निश्चित देईल. जितके जास्त वाचक आपल्या आवडीच्या पुस्तकांवर अभिप्रायात्मक लेख पाठवतील, तितका हा अंक अधिक सर्वसमावेशक व प्रातिनिधिक होऊ शकेल. सर्वांचे सहकार्य अपेक्षित आहे.

**ग्रंथोत्सव**

- पुणे येथे नॅशनल बुक ट्रस्ट आणि मराठी प्रकाशक परिषद यांच्या विद्यमाने दि. २७ सप्टेंबर १९९० ते ७ ऑक्टोबर १९९० अखेर एक भव्य ग्रंथप्रदर्शन आयोजित करण्यात आले होते. उत्तम आखणी आणि सुंदर मांडणी यामुळे हे ग्रंथप्रदर्शन अत्यंत आकर्षक ठरले. दिल्ली, पाँडेचरी, कलकत्ता अशा दूरदूरच्या प्रकाशन संस्थांनी त्यात भाग घेतला. मराठी प्रकाशकांनी आणि शासकीय संस्थांनीही मनःपूर्वक या उपक्रमाला साथ दिली. वाचक-ग्राहकांची उपस्थितीही चांगली होती.कलकत्ता बुकफेअर, ऑल इंडिया बुक फेअर, मुंबईची बुक फेअर-याप्रमाणे पुणे व इतर शहरीही (औरंगाबाद, नागपूर, कोल्हापूर) अशा प्रकारची ग्रंथप्रदर्शने दरवर्षी भरवण्यात आली तर ग्रंथव्यवहाराला मोठी चालना मिळेल.मराठी साहित्य संमेलनांच्या वेळी ग्रंथप्रदर्शने भरतात. त्या वेळी स्टॉल्सची मांडणी व ग्रंथप्रदर्शनाची एकूण आखणी करताना काही त्रुटी राहतात; त्याबद्दल प्रकाशक नंतर तक्रारी करतात. मराठी प्रकाशक परिषदेने पुण्यातील ग्रंथोत्सवाचा अनुभव लक्षात घेऊन, संमेलनाच्या

स्थानिक समितीला ग्रंथप्रदर्शनाच्या दृष्टीने सहकार्य करावे. जास्तीत जास्त लोकांना सुलभपणे प्रदर्शनाला भेट देऊन, आवडीची पुस्तके बघता, घेता यावीत या दृष्टीने मांडणी कशी करावी याबद्दल मार्गदर्शक सूत्रे वितरीत करावी असे वाटते.

**रत्नागिरी : साहित्य संमेलन**

रत्नागिरी येथे दि. २१, २२ व २३ डिसेंबर १९९० रोजी अ. भा. मराठी साहित्य संमेलन होण्याचे नक्की झाले आहे. अध्यक्षपदासाठी सुप्रसिद्ध साहित्यिक द. मा. मिरासदार आणि मधु मंगेश कर्णिक हे दोघे उमेदवार उभे आहेत. यापैकी कोणाची निवड होते ते जाहीर होण्यास अजून अवधी आहे. दोघेही नामवंत व वाचकप्रिय लेखक असल्याने मतदारांचीही अवस्था अवघड होणार आहे. कोणीही निवडून आले तरी हे संमेलन उत्तम पार पडेल हे निश्चित. अध्यक्षपदाची निवडणूक पद्धत हा दरवर्षीच वादविषय होतो; दोन-तीन चांगल्या व्यक्तींमध्ये अकारण लढतीचा घाट घातला जातो. निवडणुकीपेक्षा काही वेगळा मार्ग यासाठी शोधणे सद्यःकालीन लोकशाही प्रणालीत बसणे कठीण आहे; परंतु दोन मित्रांमधील अशा लढती अनावश्यक दुरावा निर्माण करणाऱ्या ठरू नयेत असे मात्र वाटते. उमेदवारांच्या बाबतीतही हा दुरावा नंतर उरू नये; मतदारांच्या जिभेवरही त्यामुळे कसली कडू चव उरू नये अशीच एकूण प्रचाराची पद्धती राहावी.

ही दिवाळी आणि नवे वर्ष मराठी वाचकांना, लेखक-कवींना, पत्रकार-संपादकांना, ग्रंथविक्रेते-ग्रंथप्रकाशक, मुद्रक-जाहिरातदारांना, सुखसमृद्धीचे जावो ही प्रार्थना.

**–शंकर सारडा**
संपादक

---

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**

**साहित्य समालोचन अंक : फेब्रुवारी ९१**

१९९० मध्ये प्रसिद्ध झालेल्या महत्त्वपूर्ण पुस्तकांचे परिचय-परीक्षण करून देणारे लेख, १९९० मधील निवडक पुस्तकांची सूची, यामुळे हा अंकही संग्राह्य ठरेल.

**लेखक-वाचकांसाठी स्पर्धा**

१९९० मधील आपल्याला आवडलेल्या किंवा न आवडलेल्या एका पुस्तकावरील आपला अभिप्राय वा समालोचनात्मक लेख दिनांक १ जानेवारी १९९१ पर्यंत पोचेल अशा बेताने पाठवा. एक हजार शब्द (वहीची ७/८ पृष्ठे होतील एवढा) विस्तार असावा. निवडक लेखांना प्रत्येकी २५ रुपयांचे बक्षीस मिळेल. ते लेख पत्रिकेच्या, फेब्रुवारी १९९१ च्या अंकात प्रसिद्ध केले जातील.

**संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
**टिळक रोड, पुणे ४११०३०**



अनुक्रमणिका

# क्रांतीचा जयजयकार

कुसुमाग्रज

आतापर्यंत तीनशे-चारशे कविता संग्रहांतून आणि नियतकालिकांतून प्रकाशित झाल्या असतील. त्यांतील एखादी कविता आवडती म्हणून निवडून काढणं हे प्रायः अशक्य. काव्यलेखनाची एकूण प्रक्रिया फार गुंतागुंतीची आणि खुद्द लेखकालाही पूर्णतः न उलगडणारी अशी आहे. 'शॉ'नं एका ठिकाणी म्हटलं आहे, 'चालत्या काळातून बोलणं निर्माण होतं, तर साचलेल्या काळातून साहित्य निर्माण होतं.' हे पुष्कळसं खरं आहे. एखादी घटना घडली, एखादं दृश्य पाहिलं, वा एखादा भावोद्दीपक अनुभव आला आणि लगेच काव्य लिहिलं गेलं, असं सहसा होत नाही. कवितेची जवळीक समोर दिसेल ते टिपणाऱ्या कॅमेऱ्याशी नाही, तर चित्रकलेशी आहे, जी घटनेशी नव्हे, तर घटनेतून निर्माण होणाऱ्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रियेशी बांधलेली असते. ही प्रतिक्रिया भावनात्मक असेल, विचारात्मक असेल वा कल्पनात्मकही असेल. प्रतिक्रिया कोणत्याही स्वरूपाची असो, त्या निर्मितीत त्या लेखकाचं 'मीपण' किती प्रमाणात, किती प्रभावीपणानं प्रगट झालं आहे हा प्रश्न महत्त्वाचा असतो. काव्यलेखनाचं व्रत म्हणा, व्यवसाय म्हणा, एकदा स्वीकारला म्हणजे कवी लिहीतच राहतो. अंतरंगातील उद्रेकाची मागणी आहे म्हणून लिहितो, वाग्विलासासाठी लिहितो, किंवा कोणाच्या तरी मागणीसाठी म्हणूनही लिहितो. या सर्वांतच त्याचं स्वत्व, त्याचं 'आथिलेपण' कमीअधिक प्रमाणात गुंतलेलं असतं. म्हणूनच कवीची अस्मिता हा समुद्र मानला, तर काही कविता लाटांवरच्या असतात, काही लाटांपलीकडे असलेल्या अथांगातील असतात, तर काही किनाऱ्यावरच्या असतात.

म्हणजेच त्याला काही जवळच्या असतात, काही थोड्या दूरच्या असतात. आणि काही बऱ्याच दूरच्या असतात. यांतील जवळच्या कविता कवीला अधिक आवडणाऱ्या, कारण त्यांत त्याची 'स्व'ची गुंतवणूक अधिक प्रमाणात असते. केव्हा अशा त्याला प्रिय असलेल्या कविता रसिकांनाही प्रिय होतात, काही होत नाहीत. स्वतःला आवडलेल्या अशा कवितांचा स्वीकार रसज्ञांनी केलेला असला तर त्या त्याला अधिकच प्रिय होतात. अशा काही कवितांचा मी निर्देश करू शकेन. स्वप्नाची समाप्ती, कोलंबसाचे गर्वगीत, क्रांतीचा जयजयकार, अहि-नकुल, बर्फाचे तट, कणा, प्रेमयोग, याचका आणि राजा आला.

वाचकाला काव्य आवडणं म्हणजे त्या काव्यातील अनुभूती वाचकानं दत्तक घेणं, ती आपलीच आहे असं मानणं. अशी काव्यं त्याला आत्माविष्काराचं समाधान देतात, दुःखात सांत्वन देतात, सुखाचा गुणाकार करतात आणि संकटकाळात आधारही देतात.

(पृष्ठ २०२ पहा)



अनुक्रमणिका

ाल्कवी जन्मशताब्दीच्या निमित्ताने :

# ालकवींची सृष्टिकविता: एक विचारणा

माधव मनोहर

बालकवींची कविता म्हणजे प्रामुख्याने निसर्गविषयक वा सृष्टिविषयक कविता असे जे ोण्ण म्हणतात, ते निसर्ग व सृष्टी हे दोन शब्द जणू काय एकार्थवाचक होत, असे समजतात. ा'णि बालकवी म्हणजे निसर्गाचे वा सृष्टीचे कवी असे ते मानतात.

उपर्युक्त विचाराला काहीसा छेद देणारा विचार म्हणजे बालकवींची निसर्ग ृष्टिविषयक कविता महत्त्वाची असली, तरी त्यापेक्षाही अधिक महत्त्वाची अशी त्यांच्या ाण्याच्या संबंधातील उत्कट निराशा व्यक्त करणारी कविता ही होय. शालेय पाठ्यपुस्तकातून ीर्घकाळात 'आनंदीआनंद' ही बालकवींची कविता हटकून निवडली जात असे आणि केवळ ाच एका कवितेवर पोसलेले जे कोण असतात, ते मानतात की बालकवी म्हणजे जणू ाानंदाचे उद्‌गाते होत. बालकवींच्या कित्येक कवितांची शीर्षकेच 'उदासीनता, निराशा' अशी ासतात. आणि 'काय असे संसारात' या कवितेची सुरुवातच 'आशा सरली' या शब्दांनी तर ाखेर 'कसले हसणे' या शब्दांनी केलेली आढळते. मग जिज्ञासूंना प्रश्न पडतो की बालकवींचा ाारा जीवनविषयक दृष्टिकोण कुठला ?

बालकवींची कविता दुभंगलेली आहे. निसर्ग / सृष्टिविषयक कविता आणि नैराश्याचे ाट सावट पडलेल्या कविता या दुभंगलेल्या कवितांना सांधणारी अशी ही कविता आढळते; रंतु येथे बालकवींची निसर्ग / सृष्टिकविता एवढाच विचार अभिप्रेत आहे.

बालकवींची सृष्टिकविता तिभंगलेली आहे. त्यातील प्रत्येक भाग वैशिष्ट्ययुक्त आहे. ्या तीन भागांना सांधणारे असेही दुवे आहेत. गोविंदाग्रजांप्रमाणेच ालकवींनीही ेशवसुतांना गुरुस्थानी मानलेले आहे. त्यात काही फरक असेल, तर तो एवढाच आहे की ोविंदाग्रज केशवसुतांचे स्मरण कवितेतून वारंवार भक्तिभावपूर्वक करतात. त्या स्मरणांची ारिणती 'केशवपुत्राचा' महशूर चेला (मी) सच्चा' या घोषणेत होते, तर बालकवींच्या कवितांतून ेशवसुतांचा नामनिर्देश आढळत नाही. बालकवींनी 'केसरी' सारख्या लोकमान्य टिळकांच्या ाजकारणलक्ष्य आणि वाङ्मयनिरपेक्ष अशा रुक्ष साप्ताहिकातून-अर्वाचीन काव्याविषयी ेखन केले होते आणि त्यात केशवसुतांच्या प्रातिनिधिक कवितांचे निर्देश करून केशवसुतांबद्दल आपला कृतज्ञ भक्तिभाव स्पष्टपणे व्यक्त केला होता. बालकवींच्या सृष्टिकवितेविषयी लिहितानाही केशवसुतांचा उल्लेख येतो, पण या उभयतांच्या सृष्टिकवितांत जो एक अन्योन्य संबंध आहे, त्याविषयी कोणी काही बोलत नाही. या घटनेचे एक कारण असे










दिसते की बालकवींना रेव्ह. टिळकांचा सहवास दीर्घकाळपर्यंत लाभला होता. परिणामी टिळकांच्या कवितेचे संस्कार बालकवींच्या कवितेत शोधण्याचा यत्न केला जातो, तो योग्यच आहे; पण बालकवींच्या सृष्टिकवितेवर टिळकांपेक्षाही गडद छाया केशवसुतांच्या कवितेची आहे हे कोणाच्या फारसे लक्षात आलेले दिसत नाही. टिळक नसते, तर बालकवीही नसते; हे जितके खरे आहे तितकेच केशवसुत नसते, तर बालकवीही नसते; हेही खरे आहे.

रेव्ह. टिळकांच्या 'वनवासी फूल' या खंडकाव्यावर बालकवी चर्चेसमधून प्रवचने देत असत. वस्तुस्थिती अशी आहे की, बालकवींच्या सृष्टिकवितेचा जो पहिला भाग आहे, त्यातील भाषेपासून अभिव्यक्तीपर्यंतचे कित्येक विशेष म्हणजेच टिळकांच्या 'वनवासी फुलाचे' काव्यविशेष होत हे ध्यानी घ्यायला हवे.

बालकवी म्हणजे सृष्टिकवी असे समीकरण जनमानसात रूढ झालेले दिसते. बालकवींच्या या पहिल्या भागातील कित्येक कवितांची शीर्षके 'संध्यातारक, निर्झरास, तारकांचे गाणे, संध्यारजनी, फुलराणी, अरुण, बालविहग' अशी आहेत. या सृष्टिकवितांची भाषा बालकवींनी टिळकांच्या 'वनवासी फुला'ला स्मरून घडवलेली आहे, हे उघड आहे, पण मुद्दा तो नाही. आहे, तो वेगळाच. 'वनवासी फूल' हे मराठी काव्यातील चेतनगुणोक्ती या अर्थालंकाराचे रमणीय उदाहरण आहे. 'वनवासी फुला'तील फूल हे माणसाप्रमाणेच कवीला बोलावते, त्याच्याशी बोलते, बोलता बोलता हसते, क्वचित खिन्न होते, रडवे अश्रू ढाळते आणि त्याच्या वियोगाने दुःखी होते. माणूसपणाचे हे जे लाक्षणिक विभ्रम आहेत, ते सर्व त्या वनवासी फुलाच्या ठायी ओतप्रोत आहेत. वनवासी फुलाच्या निदिध्यासातून बालकवींनी चेतनगुणोक्तीची ही परिभाषा आत्मसात केली होती; त्याची उदाहरणे उपर्युक्त कवितांतून शोधण्यासारखी आहेत. बालकवींचा 'निर्झर' हा 'बालगुणी' आहे. बालकवींच्या तारका 'कुणी नाही ग कुणी नाही, आम्हाला पाहत बाई' असे म्हणत 'लाजत लाजत हळूच हासत' प्रकट होतात. आणि बालकवींची 'फुलराणी' म्हणजे तर मराठी कवितेतील चेतनगुणोक्तीचा कलशाध्याय होय.

बालकवींच्या या तथाकथित सृष्टिकवितांमध्ये सृष्टिवर्णन वा सृष्टिभाषा आढळत नाही. या कवितांची शीर्षके जरी सृष्टवस्तूंची वा सृष्टघटनांची असली, तरी केवळ चेतनगुणोक्त विधानांवर भर आहे. उदाहरणार्थ : 'संध्यातारक' म्हणजे 'दिनरजनीच्या हृदयावरले, प्रेमसंगमी उद्भवलेले मुग्ध तान्हुले फूलच पहिले' असते. 'अष्टदिशांचा गोफ' असेल तर त्या नावाच्या कवितेत अष्टदिशा चेतनगुणोक्त असतात. 'निर्झरास' मधील निर्झरही असाच चेतनगुणोक्त आहे. चांदण्या गोपी असतात आणि चंद्र कृष्ण असतो. तारका मानवी प्रेमिकांना जवळ आणण्यासाठी अनेक खेळ खेळतात. अरुण 'नभःपटाला रंगविणारा चितारी' असतो, अरुण 'प्रेमाचा लोंढा वरून आणणारा' असतो. 'दिव्यांचे झोत वसुंधरेच्या हृदयात न कळत ओतणारा' असतो.

प्रस्तुत संबंधात 'फुलराणी'चे उदाहरण सर्वाधिक प्रत्ययकारक आणि प्रत्ययकल्पक

चेतनगुणोक्तीचा देणारे आहे. या कवितेला आधारभूत असणारी अशी सृष्ट घटना कोणती ? सूर्योदयसमयी फुले उमलतात ही. पण या कवितेतील फूल केवळ फूल नसते. त्या फुलांची होते 'फुलराणी'. ती कशी ? तर प्रणयचंचला भ्रूलीला अवगत नसणारी. जी 'आईच्या मांडीवर बसुनी' झोके घेणारी आणि गाणी गाणारी कुमारिका होती. 'फुलराणी'तील 'संध्यावात' हा "पुरा विनोदी' आहे, आणि त्याला या 'अमुच्या फुलराणी'चे प्रणयरहस्य माहीत आहे. येथे "मध्यरात्रीच्या निवांत समयी या कुंजातून, त्या कुंजातून इवल्याशा दिवट्या लावण्याचे खेळ खेळणारी' वनदेवी आहे आणि त्या देवीला 'ओव्या सुंदर गाणारा निर्झर' आहे. फुलराणी स्वप्ने बघते, ती 'प्रियकर रविकराच्या चुंबनदाना'ची.

येथे संध्यावात 'पुरा विनोदी' असेल, तर प्रभातवात 'स्वर्भूमीचा हात जुळविणारा' आहे. येथे 'ग्रहमाला खेळ खेळुनी दमल्यामुळे लपावयाला' लागल्या आहेत. येथे 'हर्षनिर्भरा अवनी शुभ्र धुक्याचे वस्त्र लेवुन नटलेली' आहे. फुलराणी आणि रविकर यांचे मिलन तेजोमय नव मंडपात' होणार असते. येथे 'दिव्य वऱ्हाडी गगनी' येतात ते 'जिकडे तिकडे उधळित मोती'. त्यांच्या अंगावर 'लाल सुवर्णी झगे' आहेत. आणि येथे 'वाङ्निश्चय करावयाला आकाशी चंडोल' चालला आहे. येथे 'मंगलाष्टके' गाणारे 'सृष्टीचे भाट' आहेत. आणि सनई वाजवणारा 'मारुतराणा' आहे. येथे पखवाजवादक आहे तो 'निर्झर' आणि नर्तक आहेत ते 'भारद्वाज'. अशा थाटामाटात 'नवरदेव सोनेरी रविकर' आणि 'नवरी फुलराणी सुंदर' यांचे लग्न लागते ते 'दवमय अंतःपट' फिटल्यावर. मग वधूवरांची भेट होते.

मनोरम चेतनगुणोक्तीच्या कल्पनाविलासाने सांगोपांग नटलेली अशी 'फुलगणी'सारखी दुसरी कविता मराठी भाषेत आढळणार नाही. पण या कवितेतील हा सारा कल्पनाविलास मनोरम आहे. काल्पनिकाला आधार आहे तो एका सामान्य सृष्ट घटनेचा. घटना फूल उमलण्याची. पण एवढा एक तपशील वगळला, तर ही कविता कथा सांगते ती मानवी प्रणयाची आणि प्रणयोत्तरच्या यथासांग लग्नविधीची व प्रेमिकांच्या मिलनाची. अशा या कवितेला सृष्टिकविता म्हणून संबोधणे, म्हणजे त्या संबोधनाचा मथितार्थ न समजणे होय. कारण येथे सृष्टी केवळ नाममात्रच आहे. अन्यथा जो सर्व पसारा आहे तो चेतनगुणोक्त अलंकरणाचा. या 'फुलराणी' गटांतील कवितांच्या भाषाशैलीवर व चेतनगुणोक्त अलंकरणावर टिळकांच्या 'वनवासी फुलांचा' ठसा आहे. या कवितांचा वर्ण्य विषय दूरान्वयाने सृष्टी असला, तरी ती सृष्टी चेतनगुणोक्तीने भारलेली आहे. या गटातील सर्व कविता रूपकात्मक आहेत. चेतनगुणोक्तीची परिणती रूपकात होणे अपरिहार्यच असते.

या गटातील कवितांवर कविवर्य टिळकांचे ऋण आहे, त्याचप्रमाणे काही कवितांवर केशवसुतांचेही ऋण आहे. केशवसुतांनी वर्डस्वर्थ-कोलरिज व प्रामुख्याने शेले आणि कीटस् या आंग्ल कवींच्या ओडस्च्या अभ्यासातून व निदिध्यासातून निष्पन्न अशा कित्येक ओडसदृश कविता लिहिलेल्या आहेत. उदाहरणार्थ : 'पुष्पाप्रत, वातचक्र, भृंग, म्हातारी' इ. केशवसुतांच्या या कवितांची प्रेरणा शेलेच्या 'ओड टू दि वेस्ट विन्ड' अथवा कीटस्च्या 'ओड



अनुक्रमणिका

टू दि नाइटिंगेल' अशा विख्यात कवितांची आहे. शेले व कीटस् या समकालीन रोमॅन्टिक कवींनी ओड्चा एक मोठा मनोरम असा साचा घडवलेला दिसतो. त्यांची ओडस् कोणा सृष्ट वस्तूला वा सृष्ट घटनेला उद्देशून रचलेली असली, तरी त्यांच्या लेखी स्कायलार्क अथवा नाइटिंगेल हे पक्षिविशेष अथवा 'वेस्ट विन्ड' सारखे घटनाविशेष म्हणजे स्वर्गीय वरदानाचे मूर्तिमन्त साक्षात्कार असतात. त्यांच्या तुलनेत मानव क्षुद्र पामर असतो, पक्ष्यांच्या स्वर्गीय गुणांचा अंशभाग आपल्याला प्राप्त व्हावा, म्हणून आपले रडगाणे गाऊन झाल्यावर त्यांची मानवाने करुणा भाकावी.

काही सृष्ट वस्तूत वा सृष्ट घटनात स्वर्गीय गुणवत्तेचा जो साक्षात्कार असतो, तो त्या कवींना भावतो, ते त्या सृष्ट वस्तु-घटनांना प्रार्थना करतात की त्यांनी सदैव दुःखग्रस्त पामर मानवांना- (ओड्मध्ये कवींनाच) दैवी गुणवत्तेचा काही अंश करुणापूर्वक द्यावा. केशवसुतांची थोरवी अशी की त्यांनी इंग्रजीतील रोमॅन्टिक ओड्चे मर्म हेरले व मराठी ओड्समध्ये प्रभावी विचार व्यक्त केले, पण अनुसरण म्हणजे अनुकरण नव्हे. केशवसुतांच्या 'पुष्पाप्रत, भृंग' इ. ओडस् आहेत, त्यांतील दुःखगर्भ मर्माशय स्वजीवनानुभवातून त्यांच्या प्रत्ययास आलेला होता. आणि आपले जीवित्व हे 'वाटे नाटक शोक संकुल' आणि 'अमुचा प्याला दुःखाचा, डोळे मिटून प्यायाचा' या निष्कर्षाप्रत ते आलेले होते.

दैवी संपत्तीची श्रीमंत उदारता आणि मानवी जीवनाची हीनदीन दरिद्रता यांच्या परस्परसंबंधातील हा जो तौलनिक विचार आहे, तो केशवसुतांना मनोमन भावलेला होता. म्हणूनच 'पुष्पाप्रत' सारख्या आपल्या मराठी ओड्मध्ये ते पुष्पाला 'चिरतरुणा, चिररुचिरा म्हणून संबोधितात, आणि त्याच्या तुलनेत 'काळोखाच्या जगामध्ये या मृत आशांच्या चितांवरूनि या । पिशाच माझे भटकत आहे, शांति नसेचि तया ।'- अशी मनोवस्था प्रकट करतात. त्यावरून केशवसुतांच्या ओड्ची संकल्पना स्पष्ट व्हावी.

बालकवींची 'निर्झरास' ही कविता 'फुलराणी'प्रमाणेच अग्रगण्य समजली जाते. रसिक टीकाकारांनी या कवितेचे कौतुक केले आहे, पण वस्तुस्थिती अशी आहे की बालकवींची अनुप्रासमधुर शब्दकळा वजा केली, तर 'निर्झरास' ही कविता केशवसुतांच्या 'भृंग'नामक ओड्चा सरळ अनुवाद आहे. केशवसुतांना 'भृंगाचे गान' म्हणजे 'सृष्टिचे गमते कवन', आणि ते 'गान' त्यांच्या लेखी 'परमानंदे परिपूर्ण' असे आहे. प्रीति, चारुता, आनंद यांचे मधुरच्छेद' सदैव गाणारा असा हा केशवसुतांचा 'भृंग' आहे, तर उलट कवीच्या 'अस्मदीय हृदयीं ठरलें । की जग हें दुःखें भरलें ।- 'सृष्टिचे कवन' गाणारा भृंग हा खरा कवी, तर उलट आम्ही कवी कसे ? तर 'श्रुतिवैचित्र्या बघणारे । आम्ही मात्रा जुळणारे ।' आणि म्हणून 'कवि आम्हांलागुनि म्हणणें । म्हणजे कविशब्दार्था लोळवणें'च होय.

बालकवींचा 'निर्झर' हा केशवसुतांच्या भृंगाचाच अवतार होय. केशवसुतांच्या 'भृगांचे गान' म्हणजे 'सृष्टीचे कवन'. तेव्हा तो भ्रमर हा खरा कवी आणि केशवसुत मात्र केवळ 'गणमात्रा जुळणारा'. त्याला कवी म्हणणे, म्हणजे 'कवि शब्दार्था लोळवणे'. बालकवींच्या

'निर्झरा'ची भाषा वेगळी आहे, पण 'निर्झरास कवितेतील अर्थाशय 'भृंगा'चाच आहे. बालकवी निर्झराला 'तो काव्यदेविचा प्राण खरा' म्हणून 'कवीश्वरा' असे संबोधितात, तर उलट मी 'कवितेचा दास भला । कवी बोलती जगांतला,' केशवसुतांचे 'जग हे दुःखे भरलें' आहे, तर बालकवी 'जडतेला खिळुनी राही, हृदयबंध उकलत नाही' म्हणून दुःखी आहेत. केशवसुतांना दैवी भृंगाची 'रसिकता' व 'गुंगी' जीवाच्या आकांताने हवी आहे, तर बालकवींची निर्झराला प्रार्थना आहे की 'शिकवी रे शिकवी मातें । दिव्य तुझी असली गीतें ।

केशवसुत व बालकवी यांच्या ओडस् मधील साम्यविशेष किती म्हणून दाखवावेत? 'पुष्पाप्रत'मध्ये केशवसुतांना 'शांति नसेचि'. तर 'बालविहग'मध्ये 'शांति मिळेना', म्हणून बालकवी कष्टी आहेत. 'बालविहग'मध्ये कवी 'भवदुःखाच्या अनंत डोहीं' बुडतो आहे. आणि या जिण्यापासून त्याला मुक्तता हवी आहे. तर 'वातचक्र'मध्ये केशवसुतांचा प्रश्न आहे : 'मीहि कशाला येथ रहावें । काय असे ज्यां मी चिकटावें ?'— केशवसुत व बालकवी या उभयतांच्या ओडस् मधील असे काही काही साम्यविशेष शोधू बघणाऱ्या जिज्ञासूला ते ठायी ठायी सहज गवसतील, असे आहेत. असो. हे झाले केशवसुत व बालकवी यांच्या ओडस्मधील साम्य विशेषांविषयी.

बालकवींच्या (फुलराणी, निर्झरास) इ. सृष्टिकवितांची शीर्षके सृष्टवस्तुघटनांची वाचक असली, तरी या कवितांतून सृष्टिरूप केवळ अभावानेच दिसते. या कवितांचा हेतू मुळातच सृष्टिदर्शनाचा नाही तर सृष्ट वस्तुघटनांच्या अवलोकनातून निष्पन्न होणाऱ्या विचारणेचा आहे. ही विचारणा द्विविध आहे : ती चेतनगुणोक्त, रूपकात्मक आहे, तसेच सृष्टवस्तूचे निमित्त करून त्याच्या तुलनेत मानवी जीवन कसे निरर्थक व नैराश्यपूर्ण आहे ते दाखवणारी आहे.

बालकवींच्या सृष्टिविषयक कवितांच्या दुसऱ्या गटात 'श्रावणमास, पाऊस, औदुम्बर, खेड्यातील रात्र, ते डोंगर सुंदर' इ. कविता प्रामुख्याने मोडतात. या गटातील सृष्टिकविता आशयपरत्वे अगदी वेगळी आणि वैशिष्ट्ययुक्त आहे. या कवितांतून व्यक्त होणारे सृष्टिरूप दृष्टिगोचर आहे. पहिल्या गटातील कवितांमधील सृष्टिदर्शन अमूर्त, ॲबस्ट्रॅक्ट होते. या गटातील सृष्टिदर्शन सगुण, साकार असे काँक्रीट आहे. या सर्वच कविता चित्रमय आहेत. सृष्टिचित्रांचे रंगरूप आकार डोळ्यात भरणारे आहे. 'औदुम्बर' ही चित्रकविता घ्या. एखाद्या प्रतिभाशाली चित्रकाराने रंगरेखांचा उपयोग न करता त्या ऐवजी शब्द योजून ती चित्रिली आहे, असे वाटावे.

या कविता लिहिणारा कवी हा त्या कवितांतील सृष्टिदृश्यांचा प्रत्यक्ष साक्षी आहे. आणि आसमंतातील दृश्यांचा एकएक तपशील प्रथम डोळ्यात साठवून नंतर तो कागदाच्या चित्रपटावर अचूक उतरवतो आहे. या कवितांतून वर्णिलेली सृष्टी ही संस्कृत भाषेत वर्णिलेल्या सृष्टीसारखी सामान्यरूप नाही. ती विशेषरूप आहे. हा कवी हा लॅन्डस्केप पेन्टर आहे. या गटातील कवितांमधील सृष्टवस्तूंवर कवीने कशाचा आरोप केलेला नाही, वा या कवितांची

परिभाषा रूपकांची नाही. ही कविता म्हणजे त्या शब्दाच्या रूढ अर्थाने खरीखुरी सृष्टिकविता आहे– कवीने पाहिलेल्या सृष्टिविषयाचा रंगरूपाकार वाचकाच्या डोळ्यात भिनवणारी अशी.

आश्चर्याची गोष्ट अशी की केशवसुतांच्या अनेक कवितांच्या शीर्षकात सृष्टि हा शब्द डोळ्यात खुपेल इतपत दिसत असला, तरी सृष्टिवर्णनपर अथवा सृष्टिदर्शनपर अशी 'एक खेडे'सारखी एखादीच कविता सापडते. पण त्या कवितेतही वर्णिलेले खेडे हे अमुक एक खेडे आहे, असे नाही. त्या कवितेतील खेडे हे सामान्य नाम आहे. विशेष नाम नव्हे. त्या कवितेतील खेडे हे एक आदर्श खेडे आहे. ते अज्ञात स्थळी आहे आणि ते असे एक खेडे आहे की जे त्याला 'एक गवतारू खोप रहायाते' आणि 'शेतवाडी एक ती खपायला' लाभती, तर ह... आहे ! केशवसुतांचेच समकालीन कवी रेव्ह. टिळक यांचीही अपवादात्मक प्रत्यक्ष पाहिलेले सृष्टिचित्र शब्दांकित करणारी कविता अपवादात्मकच आढळते. त्या काळात अप्रूप वाटणारी ही कविता म्हणजे 'पर्वतारोहण'. या कवितेच्या आरंभीच कवीने कंसांकित टीप दिली आहे. 'वाईपासून पांचगणीपर्यंतच्या प्रदेशाचे वर्णन: दिवस उन्हाळ्याचे, वेळ सकाळ'– त्या काळच्या काव्यरीतीस अनुसरून याही कवितेत उपमा उत्प्रेक्षा, रुपकादी अर्थालंकारांचा अनुप्रासमंथर भरजरी थाटमाट डोळे दिपवून सोडणारा आहे, पण तरीसुद्धा 'इकडे पर्वत, तिकडे दरी' यामधील चढणीच्या वाटेवरून दिसणाऱ्या कृष्णेच्या खोऱ्याचे वर्णन चित्रसदृश उतरले आहे. या कवितेतील सहजमनोहर सृष्टी ग्रीष्मावर रूसलेली असल्यामुळे येथे वर्णन आहे, ते त्या कामरूपिणी सृष्टीच्या 'दु:खद' रूपाचे. ज्या जिज्ञासूंना बालकवींची सृष्टिकविता अभ्यासायची असेल, त्यांनी बालकवींचे पूर्वसूरी गुरू म्हणून रेव्ह. टिळकांचा आणि त्यातल्या त्यात 'वनवासी फुला'बरोबरच प्रस्तुत 'पर्वतारोहणा'चा– अभ्यास करणे उपयुक्त ठरेल.

'पर्वतारोहण'मधील सृष्टीची नानाविध चेतनगुणोक्त रूपे विलक्षण भुरळ घालणारी आहेत. येथे कवीची प्रतिज्ञाच मुळी 'चित्र काढुनी ठेवूं हृदयान्तरीं । सखी तें रंगवील वैखरी ।' अशी आहे. या कवितेतील उदयोन्मुख भास्कर हा 'बांधुनी मंदिल शिरिं भरजरी' पूर्वक्षितिजावर उभा राहिला आहे, तर बालकवींच्या 'फुलराणी'तील 'दिव्य वऱ्हाडी' जे गगनी येतात, त्यांच्यापैकी 'कुणीं बांधिला गुलाबि फेटा । झकमकणारा सुंदर मोठा ।' प्रस्तुत कवितेतील 'पुलकित सृष्टि रविकर स्पर्शाने डोळे उघडणारी' आहे. येथे 'रम्य आरसे सृष्टिसतीचे फुटले' आणि 'हरपले' आहेत, तर 'गिरीचें अंगवस्त्र लोपलें' आहे. येथे पाचगणीचा 'घाट म्हणजे शोभेचा पाट वहात' जाणारा आहे. आणि हाच वाहता 'पाट कांची वनदेवीची दिसे.' हा 'पट्टा गिरिंचा सृष्टिच्या विगलित वेणींतला भांग' आहे 'की अन्त:पट हा गिरिदरी युग्मातला' आहे. येथे 'ग्रीष्म भिकारी घरासि येतां, मलिन पटाला नेसुन सृष्टि वसे ।'

बालकवींच्या 'फुलराणी'तील चेतनगुणोक्त रूपकांचा उगम कोठे आहे, ते या उदाहरणांवरून समजण्यासारखे आहे. बालकवींच्या पूर्वकाळातील टिळकांची सृष्टी ही अशी चेतनगुणोक्त आहे, पण तत्कालीन अन्य गुणाढ्य कवींच्या काव्यात असे सृष्टिदर्शन वा सृष्टिवर्णन अभावरूपच आहे.

बालकवींच्या दुसऱ्या गटातील काही कवितांत मराठी काव्येतिहासात प्रथमच दृक प्रत्ययकारक असे अनलंकृत, अकृत्रिम सृष्टिवर्णन आढळते. या गटातील 'श्रावणमास' ही कविता पहिल्या व दुसऱ्या गटातील दुवा सांधणारी आहे. दुवा असे मुद्दामच म्हटले. कारण या कवितेत थोडी रूपक रचना आढळते. 'इंद्रधनूचा गोफ दुहेरी विणलासे' दिसतो. आणि तोच 'इंद्रधनूचा गोफ' म्हणजे 'नभोमंडपी कुणीं बांधिलें मंगल तोरण' असे भासते. आणि येथे 'बलाकमाला' म्हणजे 'कल्पसुमांची माळचि भासे.' अथवा ही 'बलाकमाला' म्हणजे 'अवनीवरतीं उतरुनि येती ग्रहगोल.' मात्र ही अलंकारिक अशी रचना पूर्व काव्यातील एका गुणविशेषाचे स्मरण करून देण्याइतपतच मर्यादित आहे.

येथे लक्षणीय आहे ते श्रावणमासातील सृष्टिरुपाचे केवळ यथातथ्य असे वर्णन. या श्रावणमासात 'चोहिंकडे हिरवळ दाटलेली' दिसते. आणि 'क्षणात येते सरसर शिरवे क्षणात फिरुनी ऊन्ह पडे.' त्यात पुन्हा सूर्यास्ताच्या वेळच्या वर्णनात 'तरुशिखरांवर, उंच घरांवर पिवळें पिवळें ऊन्ह पडलेले' दिसते. ऊन्ह कसे ? तर 'पिवळे पिवळे.' हे जे रंगाचे भान आहे, ते मराठी कवितेत अदृष्टपूर्व असे आहे. 'फडफड करूनी भिजले अपुले पंख पाखरे सावरती.' ही ओळ वाचताक्षणीच त्या ओळीत वर्णिलेले दृश्य वाचकाच्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभे ठाकते. जसे कविवर्य टिळकांच्या 'मातींत ते पसरले अति रम्य पंख' पक्षिणीचे करुण चित्र मूर्तिमंत रेखाटतात. 'विशेषे करून 'चंचू तशीच उघडी, पद लांबविले.' या कवितेतील अर्थालंकरण पहिल्या गटातील सृष्टिकवितेचे स्मरण करून देणारे आहे, पण येथे 'उंच घरांवरचे पिवळे पिवळे ऊन्ह' आणि 'भिजले पंख फडफड करून सावरणारी' पाखरे मात्र एकदम नवी आहेत. या कवितेच्या भाषेतही जुन्या नव्याचा असाच संगम दिसतो. म्हणजे असे की या भाषेवर काही एका प्रमाणात संस्कृत भाषेचा प्रभाव आहे. येथे 'इंद्रधनू' आहे, 'जलद' आहेत, 'संध्याराग' आहे, 'बलाकमाला' आणि 'कल्पसुमे' आहेत, 'सुवर्णचंपक' आहे आणि 'पुरोपकंठी शुद्धमती बाला' आहेत. अनुप्रास तर सर्वत्र आहेतच, पण त्याचबरोबर येथे एकीकडे 'सुंदर हरिणी हिरव्या कुरणी' बागडत असतील, तर दुसरीकडे 'फडफड करुनी भिजले पंख सावरणारी' पाखरेही आहेत. 'उंच घरांवरचे पिवळे पिवळे ऊन्ह' आणि 'भिजल्या पंखांची ही पाखरे' बालकवींच्या एका वेगळ्याच प्रकारच्या नव्या सृष्टिविषयक अनुभूतीची व वर्णनविशेषाची साक्ष पटवणारी आहेत.

येथे असे वाटते की बालकवी श्रावणमासाचे दृश्य डोळे उघडे ठेवून बघत आहेत, आणि स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलेल्या त्या दृश्याचे वर्णन नेमक्या शब्दात करीत आहेत की ते शब्द वाचून वाचकाच्याही डोळ्यांसमोर बालकवींनी स्वतः पाहिलेले दृश्य मूर्त रुपात प्रकट होते. 'श्रावणमास' हे दुसऱ्या गटातील सृष्टी कवितेचे प्रसादचिन्ह आहे आणि 'श्रावणमास' प्रसाद-चिन्ह असेल, तर औदुम्बर म्हणजे त्या प्रसादचिन्हाचे परिणत रूप होय.

'औदुम्बर' ही आठ ओळींची कविता आहे. या आठ ओळींच्या मर्यादेत बालकवींनी जे दृश्य आकारास आणले आहे, ते एक परीने अमर्याद असे आहे. कारण त्या दृश्यात 'बेटाबेटातून

वाहणारा' आणि आपल्या दोन्ही तटांवर 'हिरवाळी' घेणारा 'निळा सांवळा झरा' आहे. 'पैल टेकडीकडे चार घरांचे चिमुकले गाव' आहे. 'दाट शेतमळ्यांची हिरवी गर्दी' पुढे आहे. त्या शेतमळ्यात एक 'पायवाट पांढरी अडवी तिडवी पडलेली' आहे आणि ती पायवाट 'हिरव्या' कुरणांमधून 'काळ्या डोहाकडे' चालली आहे. त्या डोहातील 'जळ झाकळलेले' आहे, त्या 'ज़ळात पाय टाकुनी औदुम्बर बसला' आहे.

लक्षात घ्या : हे एक परिपूर्ण दृश्य आहे. त्या दृश्यात नानाविध सूक्ष्म तपशील आहेत, आणि त्या सर्व तपशीलांचे मिळून परिपूर्ण झालेले असे हे एक चित्र आहे. आणि त्या चित्रातून व्यक्त होणारा नानाविध रंगांचा खेळ प्रेक्षकांची नजरबंदी करणारा आहे. 'निळा सावळा' झरा, त्याच्या तटांवर 'हिरवाळी', दाट शेतमळ्यांची 'हिरवी' गरदी, तर पायवाट 'पांढरी'. ती अडवी तिडवी 'पांढरी' पायवाट 'हिरव्या' कुरुणांमधून 'काळ्या' डोहाकडे चालली आहे. डोहाचे जळ 'झाकळलेले' आणि म्हणून त्याच्या लाटांवर गोड 'काळिमा.' ही केवळ रंगाची आंधळी उधळण नव्हे. या दृश्यातील प्रत्येक रंग हा त्या चित्राच्या दृश्य रूपचित्रासाठी आवश्यक असा आहे. आणि हे रंग नसते, तर ते चित्रही नसते. ही चिमुकली कविता वाचून असे वाटते की व्हॅन गोसारखा एखादा प्रतिभाशाली चित्रकार औदुम्बरालगतच्या घाटावर हाती चित्रफलक घेऊन बसलेला आहे, पुन्हा पुन्हा मागे वळून बघत एकाग्रतेने तो या दृश्याचे रंग प्रथम डोळ्यांत साठवून घेतो आहे, आणि ते चित्र कॅनव्हासवर उतरवण्याच्या नादात त्याचे देहभान हरपलेले आहे. येथे काव्यकला आणि चित्रकला या दोन वेगळ्या कला आहेत, हे भानच नाहीसे होते. म्हणून मराठी भाषेत केवळ अपूर्व अशी ही चित्र कविता आहे : 'औदुम्बर'

'औदुम्बर' बाबतची आणखी एक बाब विशेष लक्षणीय आहे. 'औदुम्बर' पूर्व बालकवींची सृष्टिकविता उपमा, उत्प्रेक्षा, रूपक व चेतनगुणोक्ति या अर्थालंकारांनी आरपार नटलेली आहे. तर 'औदुम्बर'च्या स्वभोवक्तीत तसल्या त्या अलंकरणाचा सर्वथैव अभाव आहे. अलंकरणाचा हा अभाव दि. के. बेडेकरांसारख्या टीकाकाराला असह्य वाटला असावा. आणि म्हणून त्याने औदुम्बर हाच एक रूपकालंकार आहे, असे समजून मुळात या कवितेत नसलेला असा काही एक गूढार्थ शोधण्याचा असफल यत्न केला असावा. बेडेकरांनी 'औदुम्बर'च्या सुप्त अन्वयार्थाची ही अशी गुप्त बिकट वाट दाखवल्यावर ती वाट वहिवाटणारे नंतर अनेक निघाले, तर ते नवल नव्हे. पण मुळात 'औदुम्बर' अगदी स्वच्छ, नितळ आणि पारदर्शक अशा कविता आहे. या कवितेतील वर्णन केवळ डोळ्यांना दिसणाऱ्या चित्रमय रूप विशेषांचेच काय ते आहे. बाकी जे न देखे कवी, ते देखणारी, विक्षिप्त व्यस्त टीकादृष्टी अजबच म्हणायला हवी!

'मेघांचा कापूस' यांसारख्या कवितांची जातकुळी 'औदुम्बरा'चीच आहे. 'खेड्यातील एक रात्र' कवितेचा स्वतंत्र निर्देश करायला हवा. औदुम्बराची पार्श्वभूमी निखळ रमणीय अशी आहे. 'औदुम्बर' हे एका सुंदर सृष्ट दृश्याला दिलेले सुंदर शब्दरूप आहे. तर 'खेड्यातील रात्र'ची पार्श्वभूमी भयाण, भीषण, भयंकर अशी आहे. या कवितेतील 'माळ उजाड' आहे. 'बुरूजाच्या भिंती पडल्या' आहेत. 'देऊळ ओसाड' आहे. आणि त्या 'ओसाड देवळापुढचा

वडाचा पार' असा आहे की जेथे 'अंधार दाटला' आहे. तेथे 'ओढ्यात भालू ओरडतात, वाऱ्यात भुतं बडबडतात', आणि 'डोहात काळ्याशार सावल्या' पडतात. आणि 'गर्द जाळीत रात देत हुंकार'. तेथे 'भर रानी काकस्थानीं ज्वाळ भडकोनी' उठतात. तेथे अस्मान धरणीला मिळते. आणि तेथे 'आर ना पार– असा अवकाळ रात्रीचा प्रहर घोर घुमतो.' 'औदुम्बर' प्रमाणेच 'खेड्यातील एक रात्र' या कवितेतही एका रमणीय नव्हे तर भेसूर अशा दृश्याचे भयानक वर्णन आहे. पण केवळ वर्णनच. 'औदुम्बर'सारख्या या दोन्ही कवितांतील दृक्प्रत्ययकारक वर्णनांपलीकडचा गूढार्थ शोधू बघणारे जे कोण आडवाटेने जाणारे टीकाकार आहेत, त्यांना प्रत्येक दृश्य रूपाच्या आत वा पलीकडे कवीला अभिप्रेत नसलेला असा अन्वयार्थ शोधण्याची ओढ असते. दृश्य रूपाचे निखळ नितळ सौंदर्य त्यांना का भावत नाही, हा खरोखरच एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. बालकवींच्या डोळ्यांना जर सृष्टीचे एखादे दृश्य कवितेसाठी पुरेसे वाटते, आणि त्या दृश्याला नेमक्या शब्दात धरण्याची असाधारण किमया जर ते साधू शकतात; तर बालकवींचे हे अनन्य साधारण असे कर्तृत्व टीकाकारांना रुचू नये, आणि त्या शुद्ध शब्दशिल्पातून त्यांनी भलभलते अर्थ शोधावेत; आणि गूढार्थ संशोधनाच्या भुलभुलैयात व्यर्थ भोवंडत का गरगरावे हे न समजणाऱ्या अजाण पामरांपैकी मी एक आहे. पण ते असो.

बालकवींना जे काय आयुष्य लाभले, ते मुळातच अत्यल्प होते. आणि त्यात पुन्हा जाणकारीचा काळ तसा फारच थोडा होता. बालकवींच्या सृष्टिविषयक दृष्टिकोनात बदलत्या जाणकारीच्या वयोमानानुसार महत्त्वाचे बदल झालेले दिसतात. आरंभ काळात बालकवींनी सृष्टीचे प्रत्यक्ष रूप डोळे भरून फारसे पाहिले नाही. सृष्टवस्तू वा घटना यांच्याकडे त्यांनी पाहिले ते जणू काय मानवी रूपातच. परिणामी चेतनगुणोक्ती व रूपक हे या कवितांचे विलोभनीय अलंकार ठरले. तदनंतरच्या काळात बालकवींनी सुंदर किंवा भेसूर सृष्टिरूपे आपल्या डोळ्यात भरभरून साठवायला सुरुवात केली. आणि सभोवारच्या सृष्टीतील दृश्यांचे निखळ चित्ररूप ते रंगवू लागले.

त्या दोन सृष्टिविषयक दृष्टिकोनात पडलेला फरक पुढच्या काळातील कवितांमध्ये दिसतो.

मध्यावधीत नेमके असे काय घडले की ज्याच्या परिणामी 'दिव्यरूपिणी' सृष्टी भीषण रूप धारण करायला लागली, आणि 'जग सगळे भीषण' होऊन त्यांच्या 'मनात नांदाया' आले, ते कळणे दुरापास्त आहे. अखेरच्या पर्वातील त्यांची सृष्टिविषयक कविता अभ्यासून कळते ते एवढेच की सृष्टिदृष्यातील सौंदर्याचा प्रथम व भीषणतेचा नंतर वेध घेणारी त्यांची दृष्टीच जशी आरपार काळंवडून गेली. आणि त्यांच्या लेखी 'धरेला अंधपणा'-आला. मग 'नित्यापरि रविकिरणे अवनीवर' अवतरली, किंवा 'सांध्यरंग मनोहर' उसळले, किंवा 'राईतून वाहणारा ओढा' (निर्झर) 'गुंगत गीती' डोळ्यांसमोर आला, तरी त्यांच्या लेखी या सृष्टिदृश्यांचे आकर्षण आता पहिल्यासारखे उरले नव्हते. 'सुंदर सगळे, मोहक सगळे' आताही पूर्वीसारखेच होते. पण

'खिन्नपणा परि मनिचा न कळे' अशी त्यांची अवस्था झाली. 'हृदयी नैराश्यकालिमा' दाटला, आणि 'नैराश्ये' त्यांचे जीवित केवळ 'करूणासंकुल' झाले. अशा भ्रमनिरस्त निराश मनोवस्थेत 'सौंदर्य फुलांचे, गाणी वनविहंगांची, शीतलता निर्झरिणींची, मज रुचे न किमपि' असे त्यांनीच म्हटले आहे. 'फुलराणी, बालविहग, निर्झर– हे दिसून सर्वही मज न दिसेसें होई', असे झाले.

आणि या अखेरच्या कालखंडात 'दिन, पक्ष, मास, ऋतु, वर्ष भराभर गेले' पण 'हे रक्त जसेच्या तसेच साकळलेले' राहिले. मनोवस्था अशी विकल झाली, आणि 'हृदयाला उदासीनतेने' घेरले. तर अशा या नैराश्यमय आसन्नमरण काळातही सृष्टीचे भान 'दिसून न दिसेसे' झाले असले, तरी त्यांनी आपल्या अंतःकरणातील तीव्र वेदना व्यक्त केली ती मात्र पुन्हा सभोवारच्या सृष्टीतील पारव्याच्या व पाखराच्या रूपकातूनच. या कवितांतील 'पारवा' व 'पाखरू' चेतनगुणोक्तच आहे. नाही असे नाही. पण या कवितांत 'फुलराणी'प्रमाणे अन्योक्ती नाही, अथवा 'औदुम्बरा'प्रमाणे स्वभावोक्ती नाही.

'फुलराणी' कवितेचे अवघे सौंदर्य त्या कवितेतील सृष्ट वस्तुघटनांवर केलेल्या मानवतेच्या आरोपात होते. या कवितेत नानाविध अलंकारांची मनोवेधक बरसात आहे. तर 'औदुम्बरा'चे सौंदर्य त्या कवितेतील अलंकरणाच्या अभावात आहे. कित्येक काव्यशास्त्रज्ञांच्या मते अलंकाराचा अभाव व्यक्त करणारा स्वभावोक्ती हा अलंकार सर्वाधिक मनोरम असा अलंकार आहे. पण आपल्या आयुष्याच्या या अखेरच्या पर्वात बालकवींच्या कवितेचे रंगरूपच आरपार पालटलेले दिसते.

आता हेच बघाना 'पारवा' व 'पाखरास' या त्यांच्या उत्तर पर्वातील कविता आहेत. पूर्व पर्वातल्या 'बालविहग' कवितेचा फॉर्म ओड्चा आहे, 'सुंदरतेच्या सुमनावरचे दंव चुंबुनि' घेणारा हा बालविहग आहे आणि ओड्मध्ये असते, त्या प्रमाणे बालकवींची या कवितेतील कांक्षा त्या बालविहगाप्रमाणे आपलेही चित्त तरल व्हावे, अशी आहे. तर या उत्तर पर्वातील 'पारवा' किंवा 'पाखरू' पूर्वपर्वातील 'बालविहगा'प्रमाणे 'चैतन्याच्या गोड कोवळ्या उन्हांत' हिंडणारे नाही. तर या पारव्याचे वातावरण 'सूर्य मध्यान्ही नभी उभा राहे', असे आहे. तर 'पाखरास'चे वातावरण 'रवि वरतीं वरतीं चढत चढत गगनांत अंगार भरिल या मंद शीत पवनांत' असे आहे. हे मुद्दाम सांगण्याचे कारण असे की ओड् मधील सृष्ट वस्तू जशा दिव्य असतात, आणि त्या दिव्यतेची कांक्षा कविहृदयात असते. तसे या दोन्ही कवितांतून भावत नाही. या दोन्ही कवितांची जातकुळी निःसंशय ओड्ची असूनही या दोन कविता एक परीने आपल्या जातकुळीचे अनन्यविशेष नाकारणाऱ्या आहेत. कारण या कवितांतील 'पारवा' किंवा पाखरू' यांची रूपे सृष्ट वस्तूंची असली, तरी वस्तुतः ती कवीच्या अंतःकरण प्रवृत्तीची द्योतक आहेत. या उभयतांच्या आणि कवींच्या अवस्थांत इतकी व अशी एकरूपता आहे की प्रत्येकाचे स्वतंत्र अस्तित्व त्याच्या वेगळेपणाने जाणवूच नये. या कवितांतील तू– पण व मी– पण स्पष्ट जाणवत असले तरी ते तू-मी-पण इतके एकरूप आहे की वाचणाऱ्याच्या चित्तात त्यांचे अद्वैत नव्हे ज्ञानेश्वरांच्या 'अमृतानुभवा'त वर्णिल्याप्रमाणे निकराचे पूर्णाद्वैत उमटते.

'पारवा' आणि 'पाखरास' या मराठी काव्यातील अद्वितीय ओडस् आहेत. 'पारवा' मधील 'भिंत खचली, कलथून खांब गेला' या पहिल्या चरणाविषयी कविवर्य मर्ढेकरांनी 'अनुपम' हे विशेषण योजिले आहे. विशेषणाबाबत मर्ढेकर हे नेहमीच दक्ष असतात. मर्ढेकर हे मराठी काव्याचे साक्षेपी अभ्यासक. मराठी काव्याच्या इतिहासात बालकवींनाच कवी मानतात. मर्ढेकरांनी पारवा कवितेतील पहिल्या चरणाविषयी व मराठी कवीतेतील बालकवींच्या अग्रस्थानाविषयी ही जी दोन विधाने केली आहेत. मात्र त्या विधानांच्या स्पष्टीकरणपर असे एक अवाक्षरही लिहिलेले नाही. ते काही लिहिते, तर त्यांच्या 'वाङ्मयीन महात्मता' प्रबंधात आणखी एका मोलाच्या प्रकरणाची भर पडती. पण ते होणे नव्हते.

हा पारवा वर वर्णन केल्याप्रमाणे 'भिंत खचली, कलथून खांब गेला। जुनी पडकी उद्ध्वस्त धर्मशाळा। तिच्या कौलारी बसूनि-' खिन्न नीरस एकान्तगीत गातो आहे. वेळ ऐन मध्यान्हीची आहे. 'उष्ण झळा बाहेर तापतात' अशी. तेव्हा स्वाभाविकच पक्षिगण 'शान्त सावल्यात सुखे साखर झोपेत' पेंगलेला आहे. पण त्यांच्यापेक्षा वेगळा असलेला हा पारवा– त्याला 'हौस उडायाची नाही' ती का? त्याला 'जगतात नको मान'– असे का?

'गोड हिरव्या झुपक्यात दडायाचे' सोडून जे खिन्न नीरस एकान्त गीत तो गातो आहे, ते कशासाठी? काय म्हणून? त्याचे चित्त 'कोणत्या कोवळ्या विकारें दुखतखुपत' आहे? त्याला गोड गाण्याचे 'भान' का नाही? तो पारवा 'करुणगीते घुमवीत दुःख निद्रे निद्रिस्त' आहे. पण तो निदान असह्य अशा दुःखाने संतप्त असूनही बुद्ध राजासारखा आपल्या समाधीत मग्न तरी आहे. आणि म्हणून बालकवीला या पारव्याच्या दुःखमग्न सुखाचा हेवा वाटतो आहे.

वस्तुतः हा 'खिन्न, नीरस एकान्तगीत' गाणारा पारवा आणि 'शून्य मनाच्या घुमटात' उमटणारे व घुमणारे गीत, निरर्थक असूनही तन्मयतेने ऐकणारा कवी या उभयतांच्या वृत्तीत तसा फारसा फरक नाही. आणि तरीसुद्धा पारवा बरा. कारण त्याच्या निद्रिस्त समाधीच्या अवस्थेत त्याला सभोवारच्या 'उष्ण' वातावरणाचा विसर पडतो. कवीच्या 'जगतात उष्ण वारे' फिरत असूनही पारव्याला त्याचे भान नाही, म्हणून कवी कष्टी आहे. पण हे म्हणणेही तितकेसे खरे नाही. कारण पारवा म्हणजे कवीचेच प्रतीकरूप होय. 'गोड गावें मग भान हें कुठून?' कारण पारवा व कवी दोघेही विषण्णचित्त आहेत. ही कविता अपूर्ण आहे. या कवितेने पूर्ण रूपात नेमका काय आकार धारण केला असता, आणि त्या आकारातून नेमका कोणता अर्थाशय निष्पन्न झाला असता; ते समजायला काहीच मार्ग नाही. 'पाखरास' या कवितेवरून थोडीफार कल्पना करता येते एवढेच.

'पाखरास' ह्या कवितेत, ज्या पाखरास उद्देशून कविता लिहिली ते पाखरू आणि ती रचणारा जो कवी, त्या उभयतांचे अभिन्नत्व प्रतीत होते. पारव्याला ज्या प्रमाणे 'जगतात मान नको आहे' आणि म्हणून त्याला सभोवारच्या जगतासाठी गोड गावे, हे 'भान' नाही. त्याचप्रमाणे हे जे एकाकी पाखरू आहे, त्याला 'गायिलें कधीही न कोणी.' किंवा त्याचे सांत्वन करण्यासाठी 'कुणी वनी येवोनी' त्याच्यासाठी अश्रू पण गाळले नाहीत. कारण हे पाखरू त्या

पारव्याप्रमाणेच दु:खमग्न आहे. आणि 'दु:खाचा वाली कुणा कुणीही नसतो.' कारण उघड आहे. 'निःश्वास धावती सौख्यामागे सारे.' आणि हे जे कोण जगावेगळे पाखरू आहे, ते त्या पारव्याप्रमाणेच 'मंद शीत पवनात रवी अंगार भरतो' अशा मध्यान्ही 'निष्प्रेम मनाचे गाणे केविलवाणे' गाणारे आहे. ऐन दुपारच्या गरम वातावरणातील त्याची उदासीनता एक वेळ समजू शकते. पण उषःकाल असो वा संध्याकाळ, कोणताच काळ या पाखराला 'सुखदायी' गमत नाही. कारण 'निष्प्रेम मनाला कोठेही सुख नाही' । पारवा 'खिन्न नीरस एकान्तगीत का गातो' या प्रश्नाचे उत्तर (पारव्यास उद्देशून लिहिलेले) या कवितेत मिळते. तो पारवा व हे पाखरू दोघेही निष्प्रेम जिणे' जगत आहेत. आणि 'निष्प्रेम मनाला कोठेही सुख' नसल्यामुळे त्या निष्प्रेम मनाचे गाणे 'खिन्न नीरस' वा 'केविलवाणे' होते. या दोन कवितांतील वातावरणातील फरक समजून घ्यायला हवा. पाखराच्या सभोवारचे सर्व जग हे 'समाधिस्थ' होते. पण पाखराला मात्र 'शान्तिलेशही नव्हता ठाऊक' पारवा 'उद्‌ध्वस्त धर्मशाळेच्या कौलारी बसून खिन्न नीरस एकान्तगीत गातो' आहे. तर हे पाखरू मात्र बैसून कुठे तरि काटेरि झुडूपात' आपले गाणे केविलवाणे गाते आहे. या कवितेचे अखेरचे चरण 'पारवा' कवितेचे पूर्ण रूप सुचवणारे असावेत असे वाटते. त्या कवितेत पारवा आणि कवी प्रायशः एकरूप असूनही काहीसे भिन्न आहेत. आणि म्हणून त्या कवितेत द्वैताचा किंचित विकल्प आहे. पारवा 'निद्रिस्त' आहे, तर कवी उष्ण वाऱ्याच्या माऱ्यामुळे बेचैन आहे. त्या कवितेतील द्वैतभावसंभव आहे की अपूर्णतेच्या परिणामी आहे. आणि पूर्णरूपात तो कसा मिटला असता, त्याचे प्रात्यक्षिक (कदाचित) 'पाखरास' या कवितेत आढळते. पाखरू दु:खमग्न आहे, त्याचे 'निष्प्रेम मनाचे गाणे केविलवाणे आहे, आणि ते कोठल्या तरी 'काटेरी झुडूपातून' प्रकट होत आहे. पण त्या पाखराचे जिणे त्या पाखराला कसे व किती असह्य झाले आहे, त्याची कल्पना या कवितेतील अखेरच्या चरणांवरून येते. आणि तत्क्षणी ते पाखरू म्हणजे स्वतः कवीच होय, हे ध्यानात येते. आणि ते ध्यानात येताच रसिकाचे मन क्षणार्ध स्तिमित आणि नंतर उद्विग्न होते. या कवितेचे अखेरचे चरण असे आहेत:

*'येईल एक परि धन्य दिवस सौख्याचा*
*जो करिल तुझ्यासह अन्त तुझ्या गीताचा*
*फिरवून फरारा गोफण तो झाडील*
*कांट्यावर उघडे भग्न हृदय पाडील !'*
*मग एकच धडकी, एकच अन्तिम बोल*
*बोलून तुझे हे जळतें हृदय निवेल.*

या अन्तिम चरणातील पाखराची अखेर ही वस्तुतः कवीलाच अभिप्रेत असणारी स्वतःची अखेर आहे. तो जो कोण कालपुरुष आहे, त्याने आपल्या हातातील 'गोफण फिरवून भरारा' झाडल्यावर 'कांट्यावर उघडे भग्न हृदय' पडणार आहे आणि 'जळतें हृदय' निवणार आहे, ते केवळ पाखराचेच नव्हे, तर त्या पाखराबरोबरच कवीचेही आहे आणि हा जो पाखराच्या

'गीताचा त्याच्यासह अन्त' आहे, तो जेव्हा केव्हा येणार आहे, तो पाखराच्याच नव्हे तर कवीच्याही लेखी 'धन्य दिवस सौख्याचा' असणार आहे. 'आनंदी आनंद गडे । इकडे तिकडे चोहिंकडे ।' असे मधुवयाच्या नव्हाळीत उन्मादभराने गाणारा हाच तो कवी की जो आपल्या अल्पायुष्याच्या अखेरच्या चरणात 'खिन्न, नीरस एकान्त' किंवा 'निष्प्रेम मनाचे गाणे केविलवाणे' गातो. आणि शेवटी स्वतःच्या मरणाचा दिवस हा 'धन्य दिवस सौख्याचा' असे मानतो ! आणि त्या मरणदिनी पाखराचे म्हणजेच स्वतःचेच 'जळते हृदय निवेल', अशी ग्वाही देतो.

बालकवी म्हणजे सृष्टीचा कवी, असे एक समीकरण आधुनिक मराठी कवितेच्या विचारणेत, केवढ रूढ नव्हे तर, प्रतिष्ठा पावलेले आहे. जे प्रतिष्ठित असते, ते ग्राह्य म्हणून स्वीकारले जाते. त्याची चिकित्सक विचारणा सहसा होत नाही. बालकवींची सृष्टिकविता ही अशा काही विश्लेषणाची व विचारणेची मागणी करणारी आहे, असे मला वाटत होते. बालकवींच्या कवितांचे संग्रह प्रदीर्घ प्रस्तावना व टीपा यांसह प्रकाशित झाले. पण त्यात बालकवींच्या सृष्टिकवितेची सोदाहरण व्याख्या आढळली नाही. म्हणून (उपेक्षित) व अपेक्षित तो व्याख्याप्रपंच करण्याचा हा प्रयत्न. 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' अशीच माझी धारणा आहे. माझ्या या प्रमेयावरही चर्चा व्हावी अशी अपेक्षा आहे.

लेखन काल २० मे १९७८

(माधव मनोहर, शिवाजी पार्क, चौथा रस्ता, दादर मुंबई २८)











बालकवी जन्मशताब्दीच्या निमित्ताने :

# फुलराणी : स्वप्न आणि वास्तव

डॉ. द. भि. कुलकर्णी

विश्वातील शाश्वत माधुरी, शाश्वत वेदना आणि शाश्वत चारुता संवेदनशीलतेने बालकवींनी टिपली. तिला अर्वाचीन मराठी काव्यात तोड नाही. या संवेदनशीलतेतून झालेली निर्मिती इतकी तरल आणि इतकी व्यामिश्र आहे की तिचे एका वाचनात ग्रहण करावयाचे तर आपणापाशीही तितकीच अलौकिक संवेदनशीलता हवी. पण ते कसे शक्य आहे ? म्हणूनच मग एकदा ऐलतटावरून, एकदा पैलतटावरून, एकदा आलिंगून तर एकदा दूरदुरून त्यांची कविता आस्वादावी लागते.

'फुलराणी' ही तशी किती साधीभोळी कविता. कुणीही म्हणावे,"हो, मला 'फुलराणी' आवडते. मला ती कविता जवळजवळ पाठच आहे. किती सुरेख आणि सोपी आहे ती कविता ! अशा कविता आजकालचे कवी का नाही लिहीत ?"

खरोखरच एका अर्थाने 'फुलराणी' ही कविता अगदी साधीसोपी आहे. नुसती गाठ सोडली की रेशमी वस्त्र कमरेवरून गळून पडावे तशी ही कविता मनात सहज ओघळत जाते !

काय आहे बरं या कवितेत ? फुलराणी म्हणजे कुठल्यातरी वेलीवरची कळी. ही वेली गृहसजावटीतली नाही की उद्यानातलीही नाही; ती आहे शेताकडची, वनापासची. म्हणून तर कवितेत 'डोलडोलवी हिरवे **शेत**','निजलीं **शेतें**'; निजलें **रान**', 'झुलुनि राहिलें सगळें **रान**', 'वनदेवी','निर्झर' इत्यादी शेताचे, वनाचे, झऱ्याचे संदर्भ आले आहेत.

**बालकवींची पार्वती**

बालकवींची पार्वतीसुद्धा अशीच एक रानकळी होती. भ्रूलीला तिला अवगत नव्हत्या. तिला संध्याकाळच्या झुळकीप्रमाणे प्रसन्न (= विनोदी) भाऊराया नव्हता. अभागिनी होती ती. बालकवी, तू तरी तिला रविकरांप्रमाणे खुलवायला हवे होते; पण तुम्ही दोघेही आपआपला ठाव सोडायला तयार नव्हता. ती कळी दीर्घ काळ कळीच राहिली; वांझ आयुष्याचं माळरान तिच्याभोवती पसरून राहिलं आणि तुला आयुष्याची एक एवढीशी पाकळीच लाभली पण त्यावरही एक दवबिंदू होता. त्या दवबिंदूमध्ये तू आकाश पाहिलंसः तू धन्य झालास. ती वन्यच राहिली !

बालकवींचं वैवाहिक जीवन विस्कटलेलं होतं : आर्थिक ओढग्रस्त, स्थलांतरे आणि ताटातूट; स्वभावभिन्नता आणि चढेल, तुसडी, तेढी नाती; पण याच दुःखांनी त्यांना तात्कालीन










स्त्रीजातीचं सामाजिक दुःख जाणवून दिलं. या सामाजिक समस्येवर इलाज काय होता? अर्थातच स्त्रीस्वातंत्र्य : स्त्रीचं आतून उमलणं. या विषयावर सुधारक लेख लिहीत होते; भाषणे देत होते; संस्था काढीत हेते, संघर्ष करीत होते, मोठेच कार्य ते करीत होते.

**सामाजिक वेदनेचे स्वप्नान्तर**

बालकवींनी मात्र अगदी लहानसेच कार्य केले: त्यांच्या व्यक्तिगत व्यथेने सामाजिक समस्या जाणली आणि त्या सामाजिक वेदनेने एक शाश्वत स्वप्न पाहिले; ते स्वप्न म्हणजे 'फुलराणी' ही कविता. अरे, सृष्टी तर सुरम्य आहे, प्रसन्न (= विनोदी) आहे; तिथे सुसंवाद, स्नेह आणि प्रीती आहे. तिथे प्रत्येकाला नाचण्याचे, गाण्याचे, स्वप्न पाहण्याचे, जीवनानंद उपभोगण्याचे, स्वातंत्र्य आहे; तिथे लहान-मोठा असा भेद नाही. म्हणून तर साक्षात आकाशातील प्रेमदेवता धरतीवरील एका खेडुत कळीला "ही अमुची राणी" असा किताब बहाल करतात.

सृष्टीत प्रीती आहे, मीलन आहे आणि शिगोशिग आनंद आहे. व्यक्तिगत आणि समाजनिर्मित क्लेशाने होरपळलेले एक मन सृष्टीकडे वळले आणि तिथे त्याला स्वातंत्र्य, समता, सख्य आणि सौख्य दिसले. ते प्रतिविश्व पाहून त्याला स्वविश्वातील पराधीनतेची, विषमतेची, द्वेषाची आणि दुःखाची दाहक जाणीव झाली. त्याचे मन निवले आणि दुखावले. दुखावले आणि निवले. अलौकिक संवेदनशीलता असलेलं ते मन, त्याच्यापाशी काही सिद्धी नव्हती की फुंकर मारून त्याने हे जग बदलवून टाकावं. ज्याचे वडील पोलीस खात्यातील सालस कर्मचारी होते, असा तो शालीन जीव होता. जनजागृतीची तडफ त्याच्यापाशी नव्हती की तिच्या बळाने त्याने हे जग उलथवून द्यावे. कीर्तनकाराबरोबर वणवण भटकणारा तो एक अर्धशिक्षित जीव होता. बालकवी, तुम्ही योगी नव्हता, पुढारी नव्हता,कार्यकर्ते नव्हता, विचारवंत नव्हता; तुम्ही आपले एक लहानसे कवी होता. व्यक्तिगत आपत्तीने तुमचे हृदय विदीर्ण झाले होते आणि सामाजिक विपत्तीने तुमचे हृदय तिळतिळ तुटत होते आणि तुम्ही कवी होता. आंतरविश्व आणि सामाजिक विश्व या झरोक्यांतून तुम्ही जेव्हा सृष्टीकडे पाहिले तेव्हा तुम्ही स्तंभितच झालात; मानवनिर्मित विश्व आणि निसर्गनिर्मित विश्व यांतील विरोधाने तुम्ही स्तिमितच झालात. दुःख आणि आनंद, ताटातूट आणि मीलन, समता आणि विषमता, विखार आणि आकर्षण. सृष्टीकडे पाहताना, बालकवी, तुम्हाला मानवाची विस्मृती नाही झाली; उलट, तेव्हा मानवस्मरणाने तुम्ही अधिक व्याकुळ, विव्हळ झालात. तुमच्या मनात असा प्रश्न आला की, अरे, मानवी जीवन असे नितांत झाले तर! आणि मग त्या सृष्टीत तुम्हास सगळा समाजच दिसायला लागला!

**दोन पदे : अभिव्यक्त आणि अध्याहृत**

पण 'फुलराणी' ही काही रूपकात्मक कविता नाही. सामाजिक कविता नाही की

आत्मचरित्रपर कविताही नाही. 'फुलराणी' ही साधी 'प्रीती आणि प्रीतिविवाह' या प्रतिमांच्या साहाय्याने अभिव्यक्त झालेली एक निसर्गचित्रणात्मक भावकविता आहे; परंतु 'सृष्टीतील आनंद' या अभिव्यक्त पदाशी 'विसंवादी सामाजिक परिस्थिती' या अध्याहृत पदाचा जो विरोध संबंध कवितेस अभिप्रेत आहे तो जाणवला नाही तर ही कविता केवळ 'बालकविता'च ठरेल. ही कविता वाचताना वाचकाच्या मनात विरोधी समाजचित्र उभे राहिले नाही तर त्याचे वाचन भुंडेच राहील.

एकदा एखाद्या वाङ्मयकृतीतील भुयारे, तळघरे आणि मजले-मनोरे दिसायला लागले की, वाचक स्तिमित-स्तंभित होत जातो. कधी कधी स्वतःही नवी तळघरे-भुयारे आणि नवे मजले-मनोरे उभारून तिथे नवनिर्मिती साधतो. अस्सल वाङ्मयकृती अशा रसिकागणिक वाढत-घडत असतात. ते रसिकाचे नव्हे त्या वाङ्मयकृतींचेच आंतरसामर्थ्य असते. अहो, वेलीस माणी घातल्याने तिने वाढावे यात नवल नाही, पण कित्येक वाङ्मयकृतींचे ताजमहालही रसिकांच्या अंतःकरणातील रसवर्षावाने नवनवी रूपे धारण करतात याला काय म्हणावे ? स्वतःच रसिकाच्या अंतःकरणात रस निर्माण करावयाचा आणि स्वतःच त्यावर स्वतःचे पोषण करावयाचे अशी अस्सल वाङ्मयकृतींच्या घरची सुलटी खूण असते !

'फुलराणी'मधील नादमधुरता कर्णबधिरालाही ऐकू यावी इतकी सूक्ष्म आहे कारण ती मानसगम्य आहे. 'हिरवे हिरवे', 'डोल डोलवी', 'लाजलाजवी', 'झोके झोके', 'या कुंजातून त्या कुंजातून', 'डुलता डुलता', 'नाचनाचतो', 'गुंगत गुंगत' या अभ्यस्त शब्दांनी जे नादमाधुर्य निर्माण केले आहे त्याचे प्रयोजन केवळ श्रवणसुख देणे हे नाही; त्यातून सृष्टीची हर्षनिर्भरता कवितेस अभिव्यक्त करावयाची आहे, हिरवे निळे, सुवर्णी आणि गुलाबी हे रंगसंदर्भ कवितेत आले आहेत ते केवळ दृष्टिसुख सुचविण्यासाठी नव्हे, तर सृष्टी-समृद्धी प्रकट करण्यासाठी. फुलराणी आणि तिचा वडील भाऊ विनोदी (प्रसन्न) संध्यावात, वनदेवी आणि निर्झर अनेक प्रेमदेवता, फुलराणी आणि रविकर यांच्यातील विविध संवाद कवितेत आहेत. कुठे शब्दरूप, कुठे नेत्रपल्लवी, कुठे कदाचित करपल्लवी. हे संवाद आणि ही पात्रे केवळ अनुभवाचे नाट्यीकरण करण्यासाठी आलेले नाहीत. त्यातून कवितेने सृष्टीतील आंतर-संवाद, आंतरिक सुसंगती सुचविली आहे. ती जाणून सामाजिक विसंवादाने ज्यांना हळहळायचे असेल त्याने हळहळावे, ज्यांस खवळून उठायचे असेल त्याने खवळून उठावे. कविता काही ती पांगिलकी स्वीकारीत नाही, तसे करून तिला आपले शाश्वत रूप शबल करावयाचे नाही : बैसोनि थिल्लरी । वेडूक सागरा धिक्कारी ॥

### गतिसूचक प्रतिमा

सृष्टीत आनंद आहे आणि पृथ्वीवरील एवढीशी साधीभोळी कळी आणि स्वर्गातील एवढा भव्यदिव्य सूर्य यांच्या मीलनाने तो वृद्धिंगत झाला आहे. हा आशयही कविता भाष्यरूपाने सांगत नाही तर गतिसूचक प्रतिमांच्या आवर्तनाने वाचकाच्या अंतर्मनापर्यंत

संक्रमित करते. या गतिसूचक प्रतिमा अशा आहेत.

(१) डोलणे-झुलणे

*(अ) गोड निळ्या वातावरणात*
*अव्याज मने होती डोलत*
*(आ) पुरा विनोदी संध्यावात*
*डोलडोलवी हिरवे शेत*
*(इ) झुलुनि राहिले सगळे रान*
*स्वप्नसंगमी दंग होऊन !*
*(ई) प्रणयचिंतनी विलीन वृत्ती*
*कुमारिका ही डोलत होती;*
*(उ) डुलता डुलता गुंग होऊनी*
*स्वप्ने पाही मग फुलराणी,*

(२) झोके घेणे

*(अ) आईच्या मांडीवर बसुनी*
*झोके घ्यावे गावी गाणी*
*(आ) आंदोली संध्येच्या बसुनी*
*झोके झोके घेते रजनी;*

(३) नाचणे

*(अ) स्वर्भूमीचा जुळवित हात*
*नाचनाचतो प्रभातवात*
*(आ) नाचु लागले भारद्वाज*
*वाजविती निर्झर पखवाज*

अभ्यस्त शब्दांची नादमधुरता आणि रंगांची ऐश्वर्यसूचकता, पात्र-प्रतिमांचा हृदयसंवाद आणि हर्षनिर्भरता प्रकट करणाऱ्या गतिप्रतिमा– एवढ्याने काय झाले ! कुमारिकेचे वयात येणे, प्रेमात पडणे आणि विवाहमंत होणे ही नैसर्गिक आणि सर्जनशील प्रक्रिया समाजाने किती हीन करून टाकली, हे मनात धरून फुलराणीची अवस्यांतरे पाहावीत. बहीण-भावाचे खेळकर नाते, ग्रहगोलांनी हवाहवासा जादूटोणा करणे, जग निजले असता फुलराणीने जागे राहणे आणि जग जागे झाल्यावरही या अव्याज अस्थितप्रज्ञावतीने स्वप्नमग्न राहणे, स्वप्नात प्रणयखेळ पाहून तिने विरहार्त होणे आणि तिच्या सुखासाठी प्रेमदेवतांनी आकाशातून खाली येऊन तिला

'राणी' करून तिच्या सोबत खेळणे (उद्या तिचे लग्न होणार आहे म्हणून आज तिचे हे लाड आणि प्रशिक्षण चालले आहे बरे का !) चंडोल, भारद्वाज मारुत आणि निर्झर या साऱ्यांनीच तिच्या परिणयात सहभागी होणे_ हे सारे आठवा आणि समाजात काय घडते तेही आठवा. हे चित्र पाहा आणि हे चित्र पाहा : दाखवणे आणि पाहणे. हुंडा आणि मानपान, रुसणे-फुगणे आणि हेवे-दावे. उखाळ्या-पाखाळ्या आणि जळफळाट, थयथयाट, दगड आणि धोंडे. आठवा. वधू-वर आणि वऱ्हाडी गणगोत यांच्यात इतका आंतरसंवाद असलेले विवाह आपल्या समाजात होतील तेव्हा स्वर्भूंचा संगमच घडून येईल, नाही ?

**लौकिक-अलौकिकाचे मीलन**

सीता-स्वयंवर आपण पाहिले आणि द्रौपदी स्वयंवरही आपण पाहिले. दमयंतीचे आणि सुभद्रेचे प्रेमविवाहही आपण पाहिले. प्रेम आणि त्याची शिळवड असे प्रेमविवाह आपण पाहतो आणि नववधूंना पोटात घेणारी पाणमाय आणि त्यांना अलिंगन देणारा अग्निनारायणही आपण थंड आणि क्रुद्ध नजरेने पाहतोच; त्यावर आपण सारे आपापल्यापरीने उपायही शोधतो. पण एकदा आपण या साध्याभोळ्या कळीचा प्रेमविवाह आणि तिचे स्वयंवरही पाहू या. तिला प्रणयलीला कळत नाहीत म्हणून ती 'साधीभोळी' आहे. पण प्रेमदेवता आणि वनदेवता यांनी तिला आपले म्हटले आहे. म्हणून ती 'राणी'ही आहे. सगळी सृष्टी तिच्यावर प्रेम करते आहे व ती सर्व सृष्टीवर प्रेम करते आहे. म्हणूनही ती 'राणी' आहे. ('फुलराणी' ही केवळ प्रियकर-प्रेयसी यांची प्रेमकहाणी नाही. ती अशी समग्र सृष्टीची, विश्वाची प्रेमकहाणी आहे !) कळी आणि सूर्य यांचा विवाह हा लौकिक आणि अलौकिक यांच्यातील संवादाचा आणि मीलनाचा अविष्कार आहे : सृष्टितील वास्तव कळीचे स्वप्न झाले आहे; कवीचे स्वप्न सृष्टीतील वास्तव झाले आहे.

वाङ्मयकृती हे एक अर्थनृत्य असते : नृत्यात जशी कायेला गती मिळते आणि त्या गतीला उमलते-मिटते बंध प्राप्त होतात आणि त्या बंधातून जसे लावण्य, शाश्वत भावावस्था आणि शाश्वत जीवनार्थ प्रकट होतात तसेच वाङ्मयकृतीतही घडत असते. नृत्याचा आस्वाद न घेता जे नर्तिकेच्या शरीराचाच दृष्टिभोग घेतात ते करंटे असतात. भावावस्था आणि जीवनार्थ न पाहता जे गतीच पाहत बसतात ते दळभद्री असतात

(डॉ. द. भि. कुळकर्णी, ए वन जंतरमंतर, अमरावती मार्ग, नागपूर ४४००१०)

# लयवेल्हाळ

इंदिरा संत

'लयवेल्हाळ' ही कविता मी गेल्या मार्च, एप्रिल आणि मे या तीन महिन्यात लिहिली. लिहून पुरी केली आणि श्री श्री. पु. भागवतांच्याकडे मौज दिवाळी अंकासाठी पाठवूनही दिली. या कवितेवर लिहायचे ठरवले ते ही कविता मला अतिशय आवडली, फार चांगली वाटली म्हणून नव्हे. कविता चांगली की बरी एवढाच माझा विचार असतो. माझ्या कवितेतील ही मला फार आवडते आणि ती आवडत नाही असे कधी मला वाटत नाही. आणि वाचकांपर्यंत तर ही कविता पोचायचीच आहे.

पण ही कविता का निवडली याला एक कारण आहे. माझी पहिल्यापासून एक सवय आहे. कवितेचे शब्दसमूह किंवा ओळी सुचल्यापासून ती पूर्ण होईपर्यंत तिच्यावरील सर्व प्रक्रिया मनातच होत असतात. आणि मग ती कागदावर उतरते. या वेळी मात्र तसे झाले नाही. जेव्हा जेव्हा जे जे सुचले ते मी लगेच कागदावर लिहिले. कारण विसरून जाईल म्हणून. पाच-सहा वेळा असे झाले की जे शब्द वा ओळी सुचत वा मनावर येत त्यावर पुन्हा विचार करावा म्हटले तर त्या आठवतच नाहीशा झाल्या. म्हणजे अशा माझ्या पाच-सहा कविता विस्मरणात बुडाल्या. तसे होऊ नये म्हणून मी ही कवितेची डायरी ठेवली.

गती आणि माझी कविता निर्मिती यांचा काही अनुबंध असावा. कविता सुचणे किंवा तिला पुढे शब्दरूपात आणणे ही क्रिया, मी जेव्हा एकटीच चालत फिरत असते, प्रवासात बस, गाडीत असते किंवा झोपाळ्यावर असते आणि ज्या वेळी मनाला कोणतेही दुसरे अवधान नसते, अशा वेळी मनात सुरू होते. या गतीमुळे मन समूहापासून अलग होते. एकांती होते. निसर्ग मग्न होते. आणि मनाला एक निर्भर अशी अंतर्मुखता वा उदासी व्यापून राहते. अशा वेळी कवितेतील शब्द, ओळी मनावर तरंगत आल्यासारख्या येतात आणि त्या मनात घोळत घोळत ओळीमागून ओळीने त्यांचा आविष्कार स्पष्ट होऊ लागतो. असा आविष्कार सुरू होतानाच तो आपले वृत्त-छंद व शब्दकळा यांनी परिपूर्ण असा होत असतो. पूर्ण झाल्यावर लिहिताना मात्र शुद्धलेखन, विरामचिन्हे, शब्दात जागा सोडणे, गर्भित भाव अर्थानुसार शब्दसमूह अलग करणे हे सर्व अत्यंत काळजीपूर्वक करावे लागते. कवितेतील या गोष्टींनी कवितेचा अर्थ वा भाव अधिक गहिरा होतो हे खरेच आहे. कवितेवरील जाणीवपूर्वक विचारही या वेळी होतो.

अशीच एकदा दुपारी झोपाळ्यावर बसले होते आणि मनात खालील ओळी आल्या,



अनुक्रमणिका






*"किती उंचावरून_ अवकाशातून_*
*ओवळीचे हे घळणे_ डोळ्यासमोर किती गोजिरवाणे_*

या दोन ओळी मनावर तरंगत आल्यासारख्या आल्या. या ओळी सुचाव्यात असे काही घडले नव्हते. घरात कुणी ओवळीची फुले आणून दिली नव्हती किंवा ओवळीशी संबंधित असे काही स्मरणातही नव्हते. ओवळी हे बकुळीचे कोकणी नाव. बकुळीचा वृक्ष असतो. तो मी पाहिला आहे. मुली सकाळ, संध्याकाळ बकुळीखाली फुले वेचतात आणि केळीच्या सोपटाच्या दोऱ्यात ती ओवून त्यांचे वळेसर करतात हेही पाहिले, पण कविता विषय व्हावा असा बकुळीचा सहवास नव्हता. तरी 'या ओळीतून_ ओवळीचे घळणे' आले. वातावरणाचा परिणाम म्हणावा तर तेही नेहमीचेच होते. समोर जमिनीवर लांब पात्यांच्या गवताची हिरवळ, कुंपणाच्या भिंतीशी केशरमोराचा (स्पॅथोडिया) अघळपघळ वृक्ष, फाटकापासून दारापर्यंत फुलवेलींच्या कमानी— त्यावर झोके घेणाऱ्या लांब लांब डहाळ्या. हलकेसे उतरतीचे ऊन घराच्या भिंतीवर वरपर्यंत चढलेले. या नेहमीच्या दृश्यात देखील काही वेगळे घडले नव्हते. या तीन ओळी मनात ओवळीबद्दल काही वासवाराही नसताना सुचल्या. त्यांचे वृत्त वगैरे त्यांच्या समवेतच आले आणि शब्द समूहांच्या जोड्यापण— त्या सुचताना मनात तशाच म्हटल्या गेल्या. पुढे काही उमटले नाही. आणि चहालाही हाक आली म्हणून मी उठले. चहा घेताघेताच ठरवले— आता या ओळी लिहून ठेवायच्या. म्हणजे येता-जाता नजरेला पडतील आणि विसरून जाणार नाहीत.

काही दिवसांनी एका रात्री लवकर जाग आल्याने त्या अस्वस्थपणातच पुन्हा त्या ओळी आठवल्या आणि त्या मनात घोळणे सुरू झाले. या घोळण्याला मी 'हलवा करणे' असे नाव ठेवले आहे. हलवा करण्याची प्रक्रिया आणि कविता निर्मिती यात बराच सारखेपणा आहे. शुभ्रतीळ, धूर न येणारा कोळसा, ठराविक आच, ठराविक वातावरण थंड हवा आणि भोवताली मुलाबाळांचा वावर नाही असे एकटेपणाचे— लखलखीत तसराळे, ते धरायला स्वच्छ शुभ्र फडके आणि चांदीच्या भांड्यात सुगरणीची परीक्षा पाहणारा साखरेचा पाक— तो चांदीच्याच चमच्याने तीळावर पसरून बोटांनी तीळ घोळायचे. तिळातून तैलबिंदू वर येतात आणि पाकाने त्यांचा काटा तयार होतो— घोळवता घोळवता— तिळाला अतिसुंदर मोहर येऊ लागतो आणि हलवा तयार होतो. काव्यबीज, मनाची, वातावरणाची अवस्था, शब्दकळेचा साठा आणि कवींची हौस, आवड, ध्यास आणि निष्ठा— हेच सर्व त्या घोळण्यात असते.

आणि मग पहाटे मी त्या लिहिलेल्या ओळींच्या पुढे ज्या ओळी मनात तयार झाल्या त्या लिहून ठेवल्या. त्या अशा :

*"किती उंचावरून_ पानाफांद्यामधून*
*अवकाशातून_ बकुळीचे हे ओघळणे*
*किती लडिवाळ_ लोभस वाणे_*

*झुंजुकमुंजुक वाऱ्याच्या_ अलवार लयीवर*
*हिचे हळुवार हिनकळणे_ की*
*कुणाच्या मनोमनीचे_ मंद्र सुवासी सरगमणे.*
*पिवळ्या पिसोळीने अलगद_ सोनकीवर उतरावे*
*तसे हिने तळीच्या गवतपात्यावर_ हलकेच समेवर यावे.*
*किंचित् रेलून_ त्या हिरव्या निळया बाळ उन्हात*
*किती लाडके दिसावे-"*

आता या ओळीतील पूर्वीच्या ओळींच्या पुनर्लेखनात त्या ओळीतील काही,निघून गेले काही नवे आले,काही बदलले. हे सर्व विचार करून केले नाही. घोळवण्याच्या गतीतूनच ते सर्व आविष्कार शब्दरूपात आले. हे असे काही झाले तर मी पूर्वीचेच खरे म्हणून हट्ट धरत नाही.नवे आले ते स्वीकारते.एक लक्षात आले की,असे बदल होण्यात खालील गोष्टी घडतात. अधिकसे असते ते निघून जाते.उचितसे असते ते शब्दभावरूपासह व्यवस्थित साकारते आणि नवीनही काही आविष्कार प्रकट होतो- ज्याचा अर्थ त्या वेळी लागत नाही.

नव्या लिहिलेल्या ओळी वाचल्या आणि त्यातील काही शब्दांवर मी अगदी आनंदित झाले. 'झुंजुक मुंजुक वाऱ्याची लय','मंद्र सरगमणे', 'समेवर येणे' हे असे प्रकाशी आविष्कार हे मला फार आनंद देणारे असतात. एकाच वेळी निरनिराळ्या प्रतिमांची किरणे टाकणारे हे शब्द म्हणून मी त्यांना प्रकाशी प्रतिमा असे म्हणते. कविता पूर्ण झाल्याचे समजले नव्हते. जे लिहिले ते आता कसा आकार घेणार हेही अज्ञात होते_ सुरुवातीच्या ओळीतील 'ओवळीचे घळणे' हे असे सर्वांगी साकारत आहे हे मात्र समजले होते. आता याक्षणी एकदम मनात आले हे जे सर्व घडते त्यासाठी परमेश्वराने स्वतः निर्मिलेला लहानसा कॉम्प्युटर तर हा बसवलेला नसेल ? ज्याला आपण 'प्रतिभा' म्हणतो तो ! मी अजून 'कॉम्प्युटर' पाहिलेला नाही. चित्रे पाहिली आणि वाचलेही त्याबद्दल खूप, पण असे वाटले खरे. अर्थात किती केले तरी मानवनिर्मित यंत्र त्याला मेंदू कोण घालणार ? परमेश्वराने जे निर्माण केले त्यात कोणताही चमत्कार होऊ शकतो.

यानंतर बरेच दिवस गेले. रिकामपणी सहज मी तो लिहून ठेवलेल्या कवितेचा कागद काढला_ आणि वाचता वाचता पुढे काही सुचतेसे वाटले. समोर कागद आणि मनात पुढचे काही येत राहिले तो माझी एक मैत्रीण बरेच दिवसांनी आली म्हणून उठले. तिच्याशी बोलत असताना मनात 'तळ्यात मळ्यात' होत राहिले, पण ती मला सवय आहे. माझ्या अशा लेखनासाठी मी दैनंदिन व्यवहारातून मुक्त होण्याकडे माझा मुळीच कल नसतो. उरलेल्या वेळात हे माझे काम अशी ही सवय.त्यामुळे मी मनसोक्त गप्पा केल्या. चहा-पाणी झाले. तिला गेटापर्यंत पोचवले आणि मग कागद पुढे ओढला.

त्या ओळी तेवढ्याच लिहिल्या. कारण पूर्वरचित ओळींवर काही संस्कार झाले नव्हते.



अनुक्रमणिका

*"हे ओवळीच्या फुलाच्या अवतरणाचे मनोहारी संमोहन*
*की_ मेघदूताच्या प्रवासातून निसटलेल्या एका*
*जिरेकुसरी भ्रमणाचे आरेखन_"*

शेवटच्या दोन ओळी पाहता कविता पूर्ण झाली होती. पुन्हा वाचून पाहिली आणि हप्त्याने लिहिलेला हा मजकूर मग दोन-तीन दिवसांत केव्हातरी कागदावर लिहून ठेवला. याच दोन-चार दिवसांत मुंबईहून वासंती आणि अरुण आठ दिवसांसाठी येणार असल्याने त्या गडबडीत कागदाकडे पाहायला मला सवडच झाली नाही. ते दोघे वीणा-रवीचे पाहुणे म्हणून त्यांचे बरेच बाहेरचे कार्यक्रम होते. जायच्या आदल्या दिवशी मी तिला म्हटले "तुला दाखवायसाठी एक कविता आहे." मी ज्यांना आपण होऊन कविता दाखवते त्यापैकी ती एक आहे. तिने वाचली. तिला झुंजुक-मुंजुक हे चित्रवाण वाटले. म्हणाली, "ही कविता आपण मौजला देऊ या. लिहून द्या. मी घेऊनच जाते." कविता लिहिल्यावर प्रश्न आला— वर नाव काय लिहावे_ शेवटी तिच्या माझ्या मते मथळा 'आरेखन' लिहिला. ती घेऊन गेली. पाहुणे गेल्यावर येतो तसा मनाला सुनेपणा आला. जेवण झाल्यावर एक झोप काढावी म्हणते तो 'आरेखन' हा शब्द बरा नाही असे वाटले— अर्थाच्या दृष्टीने आणि अक्षरामुळेही. ते ओवळीचे 'घळणे'_ आणि त्याला आरेखन ? पाटीवर चरा उमटावा तसा तो शब्द वाटला. दुसरे म्हणजे ओवळीच्या झुंझुक मुंजुक वाऱ्याच्या लयीवर ओघळणारी जी काही 'हालचाल' आहे ती 'आरेखन' होणार नाही असे मला मनोमनी वाटले. 'आ रे' आणि 'ख न' हा शब्द मनातून जाईना_ दोन-चार दिवस असेच गेले_ आणि मग श्री. पुं. ना लिहिले— 'कविता इतक्यात नक्की करू नका_ जरा दुरुस्ती करून मग परत पाठवते.'

शब्द सुचला नाही. देवाला कौल लावतात तशी स्मरणाला कौल लावून बसले. 'प्रतिभेला' मी कॉम्प्युटर ठरवले म्हणून तर तिने ही नाराजी दाखवली नसेल ना_ असे वाटले आणि या कल्पनेची गंमत वाटली. शब्द शोधासाठी मनातली अरण्ये पालथी घालून शेवटी, कौल लागावा तसा प्रसादासारखा तो शब्द ओंजळीत टपकला. तो शब्द होता 'लयवेल्हाळ'. काही शब्द आपल्याला आवडतात ते नेहमीच व्यवस्थित आसपास बंदोबस्तात ठेवलेले असतात. गृहिणी केशर, वेलदोडे, लवंगा, जायफळ इ. छान छान बाटल्या भरून कपाटाच्या एका खणात जपून ठेवते तसे ठेवलेले असतात. त्यातूनच हा शब्द यायला इतका ताप झाला. मागे एकदा 'दिपवा' या शब्दाने मला असाच त्रास दिला होता. असा अचानक मिळाला त्या अर्थी हे माझ्या प्रयत्नांचे फळ नसून त्या निर्मिती प्रक्रियेतूनच हे आले असावे असे मी म्हणते. आणखी एक जाणीव झाली; लयवेल्हाळ हे 'आरेखन'चे विशेषण होऊ शकत नाही. लयवेल्हाळपणा स्वयंभू आहे. आरेखन कृत्रिम आहे. तो शब्द निर्जीव आहे. व्याकरणदृष्ट्या हे बरोबर की चूक माहीत नाही, पण असे वाटले खरे. मग मी हा विचार सोडूनच दिला. पण कविता मला सोडायला तयार नव्हती असे दिसले. एके दिवशी तर तिने मला चांगलाच धक्का दिला.

त्या दिवशी संध्याकाळी मी आवारात फिरण्याचा व्यायाम करत होते_ आणि एकदम मधेच थांबले.'असं काय केलं मी' हे शब्द पुटपुटत मी घरात आले आणि खुर्चीवर गप्प बसून राहिले.घरात कुणी नव्हते म्हणून बरे.नाहीतर"काय होतंय आक्का_बरं नाही का ? डॉक्टरला फोन करू का ?" असे माझ्याभोवती कोंडाळे जमले असते. कविता मनात घोळत असताना ध्यानीमनी नसता तिच्यातील 'मेघदूताच्या प्रवासातून निसटलेले एक आरेखन' या कल्पनेने मला जागे केले होते. मी फार मोठा अपराध केला होता. महाकवी कालिदासाच्या प्रतिभेने, यक्षाला, आपल्या प्रियतम अशा पत्नीला निरोप देण्यासाठी नियोजित केलेला मेघ. तो तर सौहार्दाने तुडुंब भरलेला, रसिक, कर्तव्यतत्पर, अत्यंत विश्वासू. यक्षाचा तर तो जीवसखाच. यक्षाने त्याला आपल्या घराचा मार्ग इतका काळजीपूर्वक आणि चित्रवाण असा सांगितलेला. त्यानेही तो जिवाचे कान करून ऐकलेला_'त्यातला एक मार्ग मेघदूताकडून निसटलेला' असे मी काय म्हणून लिहिले_याची खंत वाटली_मी या सर्वांना अपमानित केले होते आणि त्या प्रतिभावंत महाकवीचा एक मार्ग निसटून आला असे मी मांझ्या कवितेत सांगितले होते,पण या कल्पनेनेच माझी मला लाज वाटली.'असं काय केलं मी' या मागे हा सर्व कल्लोळ होता. त्या 'आरेखनाने' तो चरा उमटवला तो यासाठी तर नसेल असे काही वाटले.

कविता ही प्रतिभेची निर्मिती जरी असली तरी अशा जागृत झालेल्या जाणिवा देखील तिला पूरक ठरतातच. पण एक कल्पनाच त्याज्य ठरावी हा माझा पहिलाच मनाला लागलेला अनुभव. आजवर हा जागृत चोखंदळपणा-शब्दाबाबत मी बरेचदा केला आहे. कवितेतील काही ओळी कमी केल्या आहेत,पण अशी आणि इतकी उथळ कल्पना मी आताच अनुभवते आहे.हे प्रतिभेच्या (जी काही आहे त्या) क्षीणपणाचे तर हे लक्षण नसेल असे जाता-जाता वाटून जाते.

पुष्कळदा काय होते_ कुणी आपल्याला म्हणते 'घ्या' आणि ओंजळ पुढे करते. ओंजळीतील करवंदे,जांभूळ जे असेल ते एक आपण उचलतो आणि नेमके ते आंबट,खराब निघते. ते जाणवल्यावर देणारा पुन्हा आपणच निवडून एक हातात ठेवतो.इतके सहज हे सर्व झाले असावे. आता मला त्या ओळीचे हसूच येत होते. पुन्हा एकदा वाचून पाहावे म्हणून मी तो कागद शोधून काढला आणि पडल्या पडल्या वाचत राहिले. आणि पुन्हा 'घोळणे' सुरू झाले_त्या रात्री मी पाच मिनिटे देखील झोपले नाही. भोवऱ्यात सापडल्यासारखे झाले होते - सकाळी उठून बसले आणि प्रथम त्या ओळी लिहून काढल्या.

"किंचित रेलून" या शब्दापासून ओळी अशा सुचल्या :

*"किंचित रेलून_ त्या हिरव्या निळ्या कोवळ्या उन्हात*
*या गौरांग कवडुसलीने किती म्हणून लाडके दिसावे_*
*हे बकुळीच्या त्या अधुऱ्या अवतरणाचे लयवेल्हाळ मंत्रमोहन*
*की मेघदूताला सुखी भ्रमणाचा आशीर्वाद देताना*



अनुक्रमणिका







*यक्षाच्या कमळाक्षांत लहरलेले_ रंगबावरे मनभावन_*

इथे कविता पूर्ण झाली. मन उल्हसित झाले आणि मग दोन दिवसांनी कविता कागदावर नीट लिहून श्री. पुंना पाठवून दिली.

नेहमीच्या कवितेहून या कवितेची प्रकृती वेगळी आहे. ही संपूर्ण निसर्ग कविता आहे. 'बकुळीचे ओघळणे' हे या कवितेतील जलरंगी चित्र आहे. हे ओघळणेही एका वेगळ्या पद्धतीने आविष्कृत केले गेले आहे. यात वास्तव अशा चारच गोष्टी आहेत. ज्या असायलाच हव्यात त्या. 'पानाफांद्यातून', 'बकुळ', 'गवताचे पाते' आणि 'यक्षाचा डोळा'. इतर गोष्टी– उंची, वाऱ्याची लय, सरगमणे, समेवर येणे, कोवळे रंगीत ऊन्न, कवडुसली, लयवेल्हाळ, मंत्रमोहन, रंगबावरे, मनभावन– या प्रतिमात पार्थिवता नाही. या प्रतिमांनी त्या बकुळीच्या 'ओघळण्यासारखेच' तरलरूपाने कवितेतील चित्र साकारले आहे. सर्वांगानी साकारले आहे.

शेवटी जी ओळ मला औचित्यहीन वाटली ती ओळ गेली_ पण इतर कोणतीही वेगळी कल्पना न येता मेघदूताच्या संदर्भातीलच आली. असे का व्हावे ? साहचर्यामुळे असे म्हणता येईल, पण मला जे वाटते ते तर्कापेक्षा सृजनाला धरून आहे. मला वाटते ज्या वेळी 'ओवळी' हा शब्द जाऊन 'बकुळ' हा आला त्याच वेळी निर्मितीच्या ओघात हे निश्चित झाले असावे. हे एक पूर्व नियोजन. म्हणून चूकभुलीने आलेली किंवा माझ्या काही उणिवेमुळे आलेली प्रतिमा जाऊन तिथे यक्षाच्या कमळाक्षाची कल्पना आली. त्यातील तरल असे भावसंवेदन हेच बकुळपुष्पाचे अवतरण असे प्रतिमारूप साकारले. यक्षपत्नी आपल्या प्रासादाच्या उंबऱ्यावर रोज एक बकुलपुष्प ठेवून विरहाचे दिवस मोजत असे. बकुळ पुष्प हे विरह संपला या भावनेचे एक सुवासी हवा खेळवणारे प्रतीकच नव्हे काय ? यक्षाचा आणि बकुळपुष्पाचा हा असा तरल आणि उत्कट भावबंध.

आशीर्वादाचा हा उत्कट आणि उचित असा प्रसंग मला सुचला याचे मला अजून आश्चर्य वाटते. मेघाबद्दलच्या सौहार्द आणि कृतज्ञता या ओलाव्यावर, निरोप आठवणी यांच्या हिरव्या निळ्या आनंदाच्या हिरवळीवर मीलनाचा कवडसा बकुळ रूपानेच अवतरणार नाही काय_ असे वाटले आणि मन फार सुखावले. या सर्व प्रतिमांच्या तरलपणामुळे 'लयवेल्हाळ' ही कविता निसर्गाच्या अधिक समीप गेली आहे असे वाटते. हेच तिचे माझ्या इतर कवितात नसलेले वेगळेपण.

अशी ही एका कवितेच्या निर्मितीची कहाणी. आणि माझे अभ्यासातून न आलेले पण मनापासून सुचलेले तिच्या निर्मितीवरील आणि तिच्यावरील विचार. ती कविता अशी आहे :

**लयवेल्हाळ**

*किती उंचावरून_ पानाफांद्यामधून*
*अवकाशातून_ बकुळीचे हे ओघळणे_*
*किती लडिवाळ_ लोभसवाणे !*



अनुक्रमणिका

*झुंजुक-मुंजुक वाऱ्याच्या- अलवार लयीवर*
*हिचे हळुवार हिनकळणे- की कुणाच्या मनोमनीचे*
*मंद्रसुवासी- सरगमणे- !*
*पिवळ्या पिसोळीने अलगंद- सोनकीवर उतरावे*
*तसे हिने तळीच्या गवत पात्यावर- हलकेच समेवर यावे !*
*किंचित् रेलून- त्या हिरव्या निळ्या कोवळ्या उन्हात*
*या गौरांग कवडुसलीने- किती म्हणून लाडके दिसावे- !*
*हे बकुळीच्या त्या अधुऱ्या अवतरणाचे लयवेल्हाळ मंत्रमोहन-*
*की- मेघदूताला सुखी भ्रमणाचा आशीर्वाद देताना*
*यक्षाच्या कमळाक्षात लहरलेले रंगबावरे मनभावन-*

(इंदिरा संत, २७, आदर्शनगर, वडगाव, बेळगाव-५)

# आपापला स्वतंत्र चंद्र

**शांता शेळके**

आपण वेळोवेळी लिहिलेल्या अनेक कवितांमधून कुठली तरी एकच कविता सर्वाधिक आवडती म्हणून निवडणे अवघड आहे. तशा आपल्या अनेक कविता आपल्याला आवडत असतात. काही कलात्मकदृष्ट्या बऱ्या जमलेल्या आहेत असे वाटत असते म्हणून. काही तितक्या जमलेल्या नसल्या तरी त्यात अनुस्यूत असलेल्या आपल्या व्यक्तिगत सुखदु:खांशी, भावाशयाशी आपले उत्कट आंतरिक नाते जडलेले असते म्हणून. तर काही कविता लिहिताना खरोखरच निर्मितीचा सुंदर आनंद थोड्याफार प्रमाणात आपल्याला लाभलेला असतो म्हणूनही. या अनेक कवितांमधून अमकीच कविता आवडती म्हणून कशी निवडायची ? आणि का निवडायची ?

आपल्या अनेक कवितांमधून एकच कविता आवडती म्हणून निवडणे जसे अवघड आहे तसे एखादी कविता आपल्याला कशी सुचली हे सांगणेही कठीण आहे. इतरांचा अनुभव मला माहीत नाही. पण माझ्या स्वत:च्या बाबतीत सांगायचे झाले तर कविता मला वेगवेगळ्या कारणांनी सुचते. डोळ्यांत भरलेले एखादे दृश्य, एखादे चित्र, वाचनात आलेली गद्यातील वा कवितेतील एखादी ओळ, एखादे अवतरण, रस्त्याने जाता जाता सहज कानांवर पडलेले



अनुक्रमणिका

कुणाच्या तरी तोंडचे संदर्भहीन वाक्य, निसर्गाची विशिष्ट रूपकळा आणि तिने मनात जागी केलेली भाववृत्ती, अकारण येणारी उदासीनता किंवा तितकाच अकारण मनात दाटून येणारा उल्हास, अनेक वर्षांपूर्वी अनुभवलेल्या सुखाच्या वा दुःखाच्या स्मृती आणि त्यांच्या योगाने अबोध मनात होणारी खोल, गूढ चाळवाचाळव यातले काहीही कविता सुचण्यास सहज कारणीभूत होते. हे सारे फार कुतूहलजनक असते. अलीकडचाच एक अनुभव. कुठले तरी पुस्तक वाचत होते. त्यात 'काळोखपोकळी' असा शब्द होता. मी तो नजरचुकीने 'काळोखपाकोळी' असा वाचला. माझी चूक नंतर लगेच मला उमगली, पण अभावितपणे मनात आलेली 'काळोखपाकोळी'ची प्रतिमा मात्र तिथेच भिरभिरत राहिली. आणि त्या प्रतिमेतूनच मला कविता सुचली. मुंबईला मी अनेक वर्षे राहिले. तिथे अनेक सुंदर स्नेहही मला मिळाले. पण त्या अवाढव्य शहराशी माझे भावनिक नाते मात्र कधी जमू शकले नाही. त्याची अवजड, क्रूर, लक्ष्यशून्य यांत्रिकता मला नेहमीच भयावह वाटे. एकदा मी गिरगावातल्या एका रस्त्यावरून जात होते. भोवतालच्या प्रचंड इमारती अंगावर येत होत्या. त्यातच एका इमारतीतील माडीवरची खिडकी अकस्मात उघडली आणि तिच्या कट्ट्यावर ठेवलेल्या गुलाबाच्या कुंडीतल्या झाडावर उमललेले लालभडक टपोरे फूल मला दिसले. फूल ही खरे तर मन प्रसन्न करणारी गोष्ट, पण माझ्या त्या वेळच्या विशिष्ट मनःस्थितीत ते फूलही मला मुंबईच्या तटस्थ, निर्विकार वृत्तीचे प्रतीक वाटले आणि त्यातून मला पुढील ओळी सुचल्या—

*एका खिडकीचा दुभंगतो पडदा_ बघतात डोळे निर्विकार*
*कुंडीतला लालभडक गुलाब एक तटस्थ साथीदार*

गेली काही वर्षे कवितानिर्मितीच्या प्रक्रियेबाबत माझ्यामध्ये हळूहळू बदल होत चालला आहे. आता बऱ्याच वेळा, वर सांगितलेली काहीही कारणे नसताना, अचानक कविता सुचते. काय होते, मनात एखादी प्रतिमा तरंगत येते. तिच्याभोवती विशिष्ट भाववृत्ती निर्माण होते. शब्दांचे मोहळ जमू लागते आणि कविता भरभर जुळत जाते, तर कधी गाढ झोपेतही एखादी ओळ आपली आतल्या आत परिपूर्ण तयार होऊन बसलेली आढळते. हे कसे घडते कोण जाणे. 'स्वप्नामध्ये रचिल्या ओळी यमक मला नच सापडले' असे कविवर्य विंदा करंदीकर यांनी आपल्या एका कवितेत म्हटले आहे ते बऱ्याच अंशी खरे आहे. करंदीकरांची ही ओळ कवितानिर्मितीच्या गूढ, अनाकलनीय प्रक्रियेवर प्रकाश टाकणारी आहे. आपल्या मनाच्या अबोध पातळीवर, नेणिवेत, अतर्क्यरीतीने काही ना काही चलनवलन चालू असते आणि त्यातून आपल्याशी नकळत आपल्याला कविता सुचते असा याचा अर्थ घेता येईल. कवितानिर्मितीच्या संदर्भात असे आणखीही पुष्कळ सांगता येण्याजोगे आहे. तरीही एका विशिष्ट मर्यादेपलीकडे या प्रक्रियेवर प्रकाश टाकणे अवघड आहे. प्रत्यक्ष निर्मितीचा भाग हा बराचसा अगम्य, गूढात गुरफटलेला आणि संदिग्धतेच्या धुक्याने झाकलेला असाच राहतो. कवीलाही एका ठराविक अंतरापर्यंतच या मार्गाचा शोध लागतो. पुढे सारे अस्पष्ट, अंधुक असते.



अनुक्रमणिका

हे सर्व खरे असले तरी माझ्या कविता मला कशा सुचल्या हे मला सांगता येण्याजोगे आहे. त्या सुचण्यामागची कारणपरंपरा मला आठवते. 'आपापला स्वतंत्र चंद्र' ही माझी एक अशी कविता. ती मी आठ-दहा वर्षांपूर्वी केव्हातरी लिहिली. अनेक कवी आपल्या कवितेखाली ती लिहिली गेली तो दिवस, ती तारीख साक्षेपाने नोंदवून ठेवतात. ती पद्धती चांगलीही आहे. कारण पुढे-मागे आपल्या कवितालेखनाचा कालानुक्रम या नोंदीतून आपल्याला शोधता येतो आणि कवितेची प्रगती होते आहे की परागती हे त्यातून थोडेफार कळू शकते. कवी थोर प्रतिभावंत असेल तर पुढे अभ्यासकांनाही या तारीखवार नोंदी कवीचा अभ्यास करताना उपयोगी पडण्याचा संभव असतो. कवितेखाली तारीख लिहून ठेवण्याचे महत्त्व मलाही पटते; पण का कोण जाणे, इतका व्यवस्थितपणा मला कधी जमलेला नाही. मला कविता सुचली की हाताशी असलेल्या कागदावर मी ती लिहून काढते. असे कागद जमत जातात. मग कधीतरी तो कागद पुढ्यात घेऊन कविता वहीत उतरवून ठेवण्याचे काम मी करते. ते मला फार कंटाळवाणे, कष्टदायक पण आवश्यक असे कर्तव्य वाटते. नंतरची प्रेसकॉपी मात्र मी फार काळजीपूर्वक, हौसेने करते. मग एक कविता चारदा लिहून काढावी लागली तरी मी कंटाळत नाही, तर सांगायचे कारण असे की 'आपापला स्वतंत्र चंद्र' ही माझी कविता आठ-दहा वर्षांपूर्वी कधीतरी मी लिहिली आणि 'अनोळख' या माझ्या संग्रहात ती आलेली आहे, पण तिच्या लेखनाची नेमकी तारीख, वर्ष काहीच मला आठवत नाही. ती मला कशी सुचली हे मात्र लख्ख आठवते आणि ती कुठे कशी लिहिली हेही चांगले स्मरते.

या कवितेच्या निर्मितीला एक अगदी क्षुल्लक घटना कारण झाली. आमच्या एका कविमित्राने गप्पांच्या भरात थोड्या थट्टेने, थोड्या गंभीरपणाने मला प्रश्न केला,

"आज चाळीस एक वर्ष तुम्ही कविता लिहीत आहात. काय मिळालं या खटाटोपातून तुम्हाला ? म्हणजे तसे थोडे पैसे, थोडे नाव मिळालेलं आहेच म्हणा, पण इतक्या दीर्घकालीन कवितालेखनातून कलेच्या दृष्टीनं आपल्याला काही साधलं आहे असं तुम्हाला वाटतं का ?"

मित्राचा प्रश्न साधाच होता. असे प्रश्न अनेकदा कुणी ना कुणी आपल्याला विचारते, कधी कधी तर आपण स्वतःही ते प्रश्न स्वतःला विचारतो, पण त्याकडे आपण काही मोठ्या गंभीरपणे पाहत नाही. तथापि त्या विशिष्ट दिवशी माझा 'मूड' काही वेगळा असेल म्हणा, काही कारणाने मी फार हळवी झाले असेन म्हणा, पण तो साधा प्रश्नही मला अगदी मुळापासून हलवून गेला. मी हादरले. मनाला विलक्षण अस्थिरतेच्या, हताशपणाच्या भावनेने घेरून टाकले. आपल्या पायांखालची जमीनची कुणी काढून घेतली आहे असे मला वाटले. खरे तर माझ्या लेखनाचा इतका खोल, गांभीर्यपूर्ण विचार मी सहसा कधी करत नाही. मनातल्या ऊर्मीसरशी लिहून टाकावे आणि मोकळे व्हावे अशी माझी वृत्ती आहे, पण आतल्या आत कुठेतरी माझ्या लेखनावर– विशेषतः कवितेवर– माझे प्रेम आहे. तिचा मला एक आधार, संरक्षण वाटते. म्हणून तिच्या अस्तित्व हेतूबद्दलच शंका घेतली गेल्यावर मी फार व्यथित झाले.

जवळजवळ आठ एक दिवस तशाच मनःस्थितीत गेले आणि मग मला जे काही वाटले



अनुक्रमणिका

होते तेच कवितेतून प्रकट होण्यासाठी धडपडू लागले. कवितेसारखेच काही तरी मनात दाटून आले, पण ते व्यक्त करण्यासाठी मला नेमके शब्द सापडत नव्हते. नेमकी प्रतिमा मनात साकार होत नव्हती. आत काहीतरी धुमसत होते, पण त्यावर नेमकी ठिणगी पडत नव्हती. जाळाचा उद्‌गार निघत नव्हता.

या वेळी मी फिल्म सेन्सॉर बोर्डाची सदस्य होते. त्यामुळे आठवड्यातून दोन-तीन वेळा तरी सेन्सॉरचे चित्रपट बघायला मला जावे लागायचे. वाळकेश्वरला 'व्हाईट हाऊस'मध्ये आमच्या बोर्डाचे ऑफिस होते. तिथेही कधीकधी मिटिंगच्या निमित्ताने मी जात असे. या ऑफिसमध्ये चित्रपटविषयक इंग्रजी पुस्तकांची एक छोटीशी लायब्ररी होती. तिथे पाश्चात्य नटनट्यांची चरित्रे, आत्मकथने, चित्रपटविषयक इतर पुस्तके यांचा संग्रह होता. मी अनेकदा ती पुस्तके वाचायला आणत असे. एके दिवशी मला 'एम्बसी' थिएटरमध्ये सेन्सॉरचा एक चित्रपट बघायचा होता व त्यासाठी मी तिथे आले होते चित्रपट सुरू व्हायला अर्ध्या-पाऊण तासाचा अवधी होता. म्हणून मी बाहेरच्या ऑफिसात कोचावर बसले. आणि पिशवीतले पुस्तक काढून वाचू लागले. वेळ जाण्यासाठी काही ना काही पुस्तक मी सतत बरोबर बाळगत असे. तसे ते आपल्या ऑफिसच्या लायब्ररीतलेच एक पुस्तक मी सोबत आणले होते. हे इंग्रजी पुस्तक मोठे गमतीदार होते. हॉलिवुडमधल्या एका दुय्यम दर्जाच्या दिग्दर्शकाने ते लिहिले होते आणि आपले विविध अनुभव त्याने रंगतदारपणे त्यात नोंदले होते. हा दिग्दर्शक सोबतीला एक कॅमेरामन घेऊन हॉलिवुडला आला होता. तिथे नशीब काढण्यासाठी तो आणि त्याचा मित्र जिवापाड धडपडत होते. प्रारंभीच्या दिवसांतल्या आपल्या या धडपडीचे चित्र रंगवताना या दिग्दर्शकाने एक मोठी सुंदर प्रतिमा वापरली होती. त्याने म्हटले होते, "We were both in search of our own private moons– आम्ही दोघे आपापले स्वतंत्र खाजगी चंद्र शोधत होतो !" मी ते वाक्य वाचले आणि मनात एकदम कसला तरी खटका दावला जावा तसे मला वाटले. आतल्या आत काही तरी चमकून गेले. कलेतील श्रेयसासाठी त्या दिग्दर्शकाने वापरलेली चंद्राची प्रतिमा मला मोठी समर्पक, अर्थपूर्ण वाटली. पुस्तक मिटून मी स्वस्थ बसले. त्याच वेळी, बऱ्याच वर्षांपूर्वी वाचलेल्या सॉमरसेट मॉम याच्या 'Moon and six pence' या कादंबरीचेही मला स्मरण झाले. मॉमने देखील 'चंद्र' ही प्रतिमा कलेतील असाध्य श्रेयस या अर्थाने आणि 'सिक्स पेन्स' ही नाण्याची प्रतिमा ऐहिक यश, वैभव, सुखसंपत्ती या अर्थाने वापरलेली आहे. रुपेरी नाणे धडपडून मिळवता येते, कलेचा चंद्र मात्र हाती येत नाही असा मॉमच्या त्या प्रतिमांचा आशय होता. मला वाटले, आपल्याला असेच काही तरी व्यक्त करायचे आहे. आतापर्यंत मला नेमके शब्द, नेमकी प्रतिमा सापडत नव्हती. पण त्या दिग्दर्शकाची We were both in search of our own private moons ही ओळ मी वाचली, मला समर्पक प्रतिमा सापडली आणि ताबडतोब मनात कविता जुळत गेली. तिथे बाहेरच्या ऑफिसात बसल्याबसल्या मी ती सबंध कविता लिहूनही काढली. कवितेचा प्रारंभ असा आहे–











*प्रत्येकाला कवळायचा असतो*
*आपापला स्वतंत्र चंद्र दोन्ही हातात*
*ते न जमल्यास निदान*
*वेचायचे असते चिमूटभर चांदणे तरी*
*जे डबीत ठेवायचे असते जपून*
*आणि दाखवायचे असते म्हातारपणी पोराबाळांना*
*एक अपूर्वाईची चीज म्हणून !*

श्रेष्ठ प्रतिभावंतांना त्यांचा कलात्मक यशाचा चंद्र त्यांच्या हयातीतच गवसतो. पण सामान्य कलावंतांना जन्मभर जिवापाड धडपडूनही ते श्रेयस हातात येत नाही हीच खंत बाळगावी लागते. आयुष्यात हाती न लागणाऱ्या साध्याच्या संदर्भात 'आपापला स्वतंत्र चंद्र' ही प्रतिमा मला एकदा मिळाल्यानंतर पुढच्या कल्पना, प्रतिमा अनुषंगाने भराभर सुचत गेल्या. अल्प श्रेयासाठी 'चिमूटभर चांदणे', कालांतराने फिकट होणाऱ्या यशासाठी 'चांदण्याची चिमूटभर राख', 'ठेवणीतल्या पैठणीच्या जरीकाठाप्रमाणे काळवंडणारे चांदणे' या इतर प्रतिमाही आपोआप मनात उभ्या राहिल्या. कवितेच्या उत्तरार्धात कलावंताच्या वाट्याला येणारी शोकांतिकाही मग चंद्र-चांदणे यांच्या प्रतिमातूनच व्यक्त होत गेली– तरी शेवट मात्र माझ्या अपेक्षेहून वेगळाच झाला. कलेचे श्रेय हातात न येईल तर न येवो, पण या अवघड असाध्य धडपडीतून कलावंताला काहीच मिळत नाही का ? नाही कसे ? आयुष्याच्या उत्तरार्धात कळू लागते की श्रेय हाती न आले तरी श्रेयसाधनेची खटपट सुद्धा आपल्याला एक निर्मळ आनंद देऊन गेलेली आहे. व्यावहारिक यशाच्या आनंदापेक्षा या आनंदाची जात वेगळी आहे, पण तो आनंदच असतो हे निश्चित आणि शेवटी यश काय आणि अपयश काय हे तरी कसे ठरवायचे ? जे साधायचे होते ते साधले नाही तरी त्यानेही जन्मभर आपल्याला साथ दिलेली असते. ती कमी मोलाची का म्हणून समजावी ? हा भाव मनात जागा झाला आणि कवितेचा शेवट मग असा जुळत गेला–

*तेव्हा उमगते*
*आपल्या पायांखालच्या मातीतच*
*रुजले आहे आपले चांदणे*
*आणि आसवाच्या थरथरत्या थेंबात*
*गवसतो आहे आपापला स्वतंत्र चंद्र !*

अनेक चंद्र हातातून निसटून गेले, चांदण्याची चिमूटभर राख झाली. डबीत जपून ठेवलेले चांदणेही ठेवणीतल्या पैठणीच्या जरीकाठासारखे काळवंडले तरी चंद्र तसा आपल्याला दुरावलेला नसतोच. कारण चंद्राचा ध्यास हीच एका वेगळ्या पातळीवर त्याची जवळीकही असते !

ही कविता मी लिहिली आणि मला खूप हलके, मोकळे वाटले. मला जे व्यक्त करायचे होते ते माझ्या अपेक्षेपेक्षाही इथे अधिक चांगल्या रीतीने प्रकट झाले आहे असे एक समाधान मला लाभले. आणि नंतर कविता जेव्हा प्रसिद्ध झाली तेव्हा अनेकांनी ती आपल्याला मनापासून आवडल्याचे मला सांगितले. कलासाधनेत मिळणारे यश तर आनंददायक असतेच पण त्या साधनेतले अपयश देखील आपल्या पदरात काही चांगले, श्रेयस्कर टाकून जाते.

—अशी हताश मनःस्थितीतून मला मिळालेली ही कविता !

**आपापला स्वतंत्र चंद्र**

*प्रत्येकाला कवळायचा असतो*
*आपापला स्वतंत्र चंद्र दोन्ही हातांत*
*ते न जमल्यास निदान*
*वेचायचे असते चिमूटभर चांदणे तरी*
*जे डबीत ठेवायचे असते जपून*
*आणि दाखवायचे असते म्हातारपणी पोराबाळांना*
*एक अपूर्वाईची चीज म्हणून !*

*—अनेक चंद्र निसटून जातात*
*चांदण्याची होते चिमूटभर राख*
*डबीत जपून ठेवलेले चांदणेही काळवंडते कालांतराने*
*ठेवणीतल्या पैठणीच्या जरीकाठाप्रमाणे*

*तेव्हा उमगते*
*आपल्या पायांखालच्या मातीतच*
*रुजले आहे आपले चांदणे*
*आणि आसवाच्या थरथरत्या थेंबात*
*गवसतो आहे आपापला स्वतंत्र चंद्र*

(शांता शेळके, १९ आदर्शनगर, संघवी शोरूम, राजदूत हॉटेल जवळ, पुणे-सातारा रस्ता, पुणे ३७)



अनुक्रमणिका

# लमाणांचा तांडा

डॉ. वि.म. कुलकर्णी

'लमाणांचा तांडा' ही कविता मी १९४४-४५ च्या सुमारास लिहिली. ती आचार्य शं.द. जावडेकर प्रमुख संपादक असलेल्या 'नवभारत' या प्रतिष्ठित मासिकात प्रसिद्ध झाली.

पुढे 'पहाटवारा' या माझ्या पहिल्या काव्यसंग्रहात मी ती समाविष्ट केली. (सन १९४९) कविवर्य अनिल यांची या संग्रहास प्रस्तावना आहे. त्यांनी 'लमाणांचा तांडा' या कवितेतील विषय अभिनव आहे, निरीक्षण व वर्णनकौशल्य नजरेत भरण्याजोगे आहे अशी या कवितेची भलावण केली. तिचा अनुभव मला पुढे वारंवार आला.

या कवितेची प्रार्श्वभूमी अशी की, मी ग्रामीण परिसरात लहानाचा मोठा झालो. खेड्यापाड्यातील लोक व त्यांचे संसार आणि संस्कार यांची छाप मनावर होती. लमाण लोक म्हणजे जिप्सींसारखे भटके, फिरस्ते लोक. अतिशय कष्टाळू, काटक असे मातीचे पुत्र! त्यांनी उसाच्या गुऱ्हाळाच्या दिवसांत गुऱ्हाळावर किंवा मळ्यातळ्यात कामे करावी (तेव्हा साखरेचे कारखाने फार नव्हते. उसाची गुऱ्हाळेच गावोगाव असत) गुऱ्हाळ चालू असेल तोवर तिथे काम करावयाचे. काम संपले की ते गाव सोडावयाचे. खोपटं मोडायचे. काम मिळेल तिकडे सारा 'संसार' उचलून चालू लागायचे!

कवितेला प्रेरणा मिळाली ती खरोखरच एक लमाणांचा तांडा मार्गावरून चालला होता तो पाहूनच. तेव्हा मी बेळगावच्या लिंगराज कॉलेजात प्राध्यापक होतो व बेळगावहून एकदा चिकोडीला व्याख्यानाकरता चाललो होतो. एस.टी.तून बाहेर पाहिले तो, रस्ता ओलांडीत एक लमाण लोकांचा लांवलचक तांडा चालला होता. ते अकल्पित पुढे उभे ठाकलेले दृश्य मला अगदी विलक्षण वाटले.

त्या वेळचे ४०/५० वर्षापूर्वीचे वातावरण काही थोडे वेगळेच होते. विमुक्त भटक्या बांधवांच्या जीवनाविषयी आजकाल जिव्हाळ्याने लिहिले-बोलले जात आहे. जनसामान्यात लमाणांच्या सारख्या लोकांविषयी इतकी पोटतिडीकही तेव्हा नव्हती. पण मी ग्रामीण परिसरात वाढलेला-वावरलेला. तो तांडा पाहिल्यावर मला एक निराळीच अनुभूती आली. त्या दृश्याने माझ्या कविमनाला भटक्या जनजातीच्या लोकांचे ते हलाखीचे जीवन पाहून चटका लावून सोडला. तो एक निराळाच चित्रपट डोळ्यापुढून सरकत गेला! त्या लोकांचे ते रापलेले चेहरे, घोड्यांवर, बैलांवर लादलेला संसार. 'संसार' सांभाळीत पुढे चालण्याची धावपळ– 'विंचवाचे बिऱ्हाड पाठीवर' याप्रमाणे सारी स्थिती! मला वाटले हे लमाण लोक कुठून आले, कुठं जात असतील? कसे जीवन जगत असतील? खाटल्यात झोपलेले छोटे मूल कसे वागवीत

असतील ? किती विचित्र व स्थिर हे जीवन !

तेवढ्यात, अगदी शेवटून चाललेल्या एका लमाण स्त्रीच्या खांद्यावर घेतलेल्या, आडव्या काठीच्या टोकाला बांधलेला एक पोपटाचा– राघूचा पिंजरा मला दिसला. त्याने का कोण जाणे माझे मन गलबलले. एक कवितेचे बीज नकळत मनात पेरले गेले ! दिवाणखान्यात शोभेसाठी पाळलेले पोपट मी अनेकदा पाहिले होते. त्यांचे मिठ्ठास बोल ऐकले होते, पण हा पोपट काही निराळाच वाटला. त्या भटक्या लमाण जातीच्या विस्थापित-विस्कळीत जीवनातील, संसारातील ही मानवतेची एक मंगल खूण मला जाणवली व त्याच क्षणी मनात एका कवितेची निर्मिती अमूर्त रूपात झाली ! मी मनातल्या मनात काही ओळी रचू लागलो–

*चालला चालला लमाणांचा तांडा । एका गावाहून दुजा गावाला*
*संपली येथली उसाची गुऱ्हाळे । संपला येथला अन्नाचा शेर_*

कवितेच्या पहिल्यावहिल्या ओळी आपोआप स्फुरल्या. कोणी काही म्हणो, 'खरी कविता' म्हणजे एक स्वतंत्र स्फुरणच असते. शहाणे मन तेव्हा चांगल्या अर्थाने जणू 'दिवाणे' होत असते_ते मनाने शहारणे असते. काव्यरचनेची धुंदी मी खरोखरच अनुभवत होतो. कविता पुढे सुचत जात होती_लमाणांच्या अनोख्या, उपेक्षित, दलित जीवनाचे चित्र कवितेच्या दुसऱ्या कडव्यात रेखाटण्याच्या नादात होतो. कागदाचा खिशातील कपटा काढून चालत्या एस.टी.तच मी काही तुटके-ताटके चरण टिपीत होतो. "आता दुजे गाव– आता दुजा मळा, चला पाहू चला नवीन चाकरी ! नवीन भाकरी !"

लमाणांच्या त्या प्रत्यक्ष पाहिलेल्या जीवनाचे चित्र मी सहजीच रेखाटले–

*"चार भिंतींची ती उभवाया घरे, घेतल्या चटया,*
*घेतले खाटले (त्यांचा हा पलंग), घेतली गाठोडी;*
*घोड्याच्या पाठीशी उलटे खाटले अन् त्यात घातले*
*रांगते मूल_*
*घेतली गाडगी, मडकी, डबडी_*
*(चुलीला दगड मिळतील तेथे*
*नकोत ते घ्याया बांधूनिया संगे !)*

तेव्हा 'मुक्तछंद' नव्याने रूढ होत होता. कविश्रेष्ठ अनिल फक्त या मुक्तछंदाचे निष्ठावंत पुरस्कर्ते होते. काही रचनांना मुक्तछंद मला जवळचा वाटत होता. मी हे सारे काव्य मुक्तछंदातच साकार केले ! कविता (मनात तरी) एका बैठकीत साकार झाली. पुढे तिच्यावर काही थोडे संस्कार अर्थातच केले गेले.

मुक्तछंदाच्या सहज जडणघडणीतून ही कविता साकार होत गेली. गेय रचनेच्याद्वारे या कवितेतील मुक्त आविष्कार साधता आला असता असे मला वाटत नाही. यमके आणि गणमात्रांची बंधने बाजूस ठेवून ही थोडी वर्णनात्मक, सत्य जीवन चित्रित करणारी कविता मी



अनुक्रमणिका







लिहिली. 'खंगलेले घोडे, खंगलेले बैल, धापा टाकत चालणारी कुतरी' इत्यादींचे सम्यक रेखाटन हे येण्यासाठी 'मुक्तछंद' निर्मिती-प्रक्रियेत सहजपणे साह्यभूत झाला. त्यामागे विशिष्ट चिंतनच होते असे नाही. ओळीमागून ओळी सुचत गेल्या एवढे मात्र खरे !

हो माझी एक आगळीवेगळी कविता बरीच गाजली. पाठ्यपुस्तकात तिचा समावेश त्या काळी झाला व अनेकांना तिच्यातील भावाशय व विशेषकरून 'लमण स्त्रीने डोळ्यांपुढे राहील अशा रीतीने बांधलेला राघूचा पिंजरा' विशेष लक्षणीय वाटला.

तो काळ बहुतांश गेय कवितारचनेचा होता. सुललित शब्दांची मोहिनी रसिकांवर होती. तेव्हा काही टीकाकार म्हणतही असत की, 'कविता छान आहे, पण ती गाडगी, मडकी, डबडी कवितेत कशाला आणलीत ?' मी काहीच उत्तर देत नसे, कारण त्या टीकाकारांना शहरी जीवनात लमाणांचा तांडा इतका जवळून पाहायलाच मिळाला नसेल असे मला वाटे. थोर लेखक श्री. वि.द. घाटे यांच्यासारखी मंडळी मात्र मनापासून या कवितेची स्तुती करीत. ते कोठे कविसंमेलनात वगैरे भेटले की म्हणतच मुळी की, "काय वि.म. सोलापूरहून कधी आलात ?" "कालपरवा आलो." मी म्हणे, तेव्हा ते हसून प्रेमाने म्हणत, "तांडा बरोबर आणला आहे ना ?" मला तेवढे प्रशंसेचे शब्द पुरेसा आधार देऊन जात. उपेक्षित जीवनातही जीवनप्रेम व मानवता कशी असते हे या कवितेतील मर्म आहे असे मला वाटते व ते लक्षात घेऊन रसिकांनी सदैव या कवितेला दाद दिली हे माझे भाग्य होय. त्या काळी तर, म्हणजे ४०/४५ वर्षांपूर्वी अशी भटक्या जमातीविषयीची सहजस्फूर्त कविता रसिकांना दुर्मिळच वाटावयाची.

**सर्वांत हीच कविता का प्रिय वाटते ?**

माझ्या स्वतःच्या कविप्रकृतीस जवळची अशी ही कविता आहे असे मला वाटते. अजूनही ही कविता वाचताना माझे मन एका निराळ्याच भावविश्वात मला घेऊन जाते. या कवितेने 'कवी' म्हणून मला जनमानसात थोडे स्थिरपद केले. स्नेह, जिव्हाळा, मानवता यांचे दर्शन या कवितेत घडते म्हणूनही मला ही कविता विशेष प्रिय वाटत असावी.

**लमाणांचा तांडा**

*चालला चालला लमाणांचा तांडा*
*एका गावाहून दुजा गावाला*
*संपली येथली उसाची गुऱ्हाळे, संपला येथला अन्नाचा शेर*
*आता दुजे गाव !*
*आता दुजा मळा ! !*
*चला पाहू चला—*
*नवीन चाकरी, नवीन भाकरी !*

चालला चालला लमाणांचा तांडा
पाठीवरी सारे घेउनी बिऱ्हाड
मरतुकडी ही खंगलेली घोडी
खंगलेले बैल—
यांच्या पाठीवर देखा हा संसार
चार वितींची ती उभवाया घरे घेतल्या चटया
घेतले खाटले, (त्यांचा हा पलंग), घेतली गाठोडी,
घोड्याच्या पाठीशी उलटे खाटले अन् त्यात घातले रांगते मूल !
घेतली गाडगी, मडकी, डबडी,—
(चुलीला दगड मिळतील तेथे—
नकोत ते घ्याया बांधूनिया संगे ! !—)
घोड्यांशेजारून संसारामागून रस्ता हुंगत ही
धापा टाकणारी चालली कुतरी
चालला चालला लमाणांचा तांडा
घोड्याशेजारून संसारामागून चालले बापई ! चालल्या बायका !
असंस्कृत मुद्रा— दीनवाण्या मुद्रा— अगतिक मुद्रा—
कटिखांद्यावरी यांच्याही लादले 'संसाराचे ओझे'
पहा पाठीवरी बांधली बोचकी
पहा काठीवरी आणखीही काही
उरलासुरला बांधला संसार
चालला चालला लमाणांचा तांडा—
आणि तांड्यातील, पाहिलीत का ती एक ल मा णी ण
ओझ्याने अगदी वाकली आहे. थकली आहे
तिच्या खांद्यावर, तिच्या काठीवर
जड जड सारे गुळाचे गाठोडे, देवाचे गाठोडे बांधले आहे.
—परी काठीच्या त्या एका टोकाला अन्
रा घू चा पिं ज रा बांधला आहे—
जीवाने जपल्या मायेने पोसल्या राघूचा पिंजरा बांधला आहे—
अस्थिर संसारी विकीर्ण जीवन
त्यात एकली ही कोमलता-खूण
—ओझ्याने वाकल्या लमाणाच्या स्त्रीने
डोळ्यांपुढे राही अशा रीतीने हा बांधला पिंजरा

*–तेवढीच तिच्या आत्म्याची ओळख–*
*मनाचे भोजन*
*तेवढीच तिच्या लमाणजातीच्या*
*मानव्याची खूण ! !* ४
*–चालला चालला लमाणांचा तांडा*
*एका गावाहून दुजा गावाला–*

(डॉ. वि. म. कुलकर्णी, कमळवेल, ६१/४८ एरंडवणे, पुणे ४)

# मध्यरात्रीच्या गाढ अंधारात

सुधांशु

'मध्यरात्रीच्या गाढ अंधारात' ही कविता म्हणजे कृष्णाकाठच्या पवित्र अनुभूतीची एक मंगल स्मृती. विश्व गुरू दत्तात्रेयांच्या प्रसन्न योगछायेत आणि ऋषिमुनी, तपस्वी आणि साधुसंत यांच्या पदस्पर्शानं पुनीत झालेल्या स्थानी स्पर्शून गेलेली एक अनाकलनीय अनुभवावस्था !

औदुंबरचे वातावरण असे की एखाद्या प्रशांत समयी, निर्मळ, निर्विकार अंतःकरणात, अविचल भावावस्थेत असे तेजःकण चमकले नाहीत तरच नवल. स्वर्गीय स्वर अवचित तरळून जातात आणि आत आत मग निनादतच राहतात. मग तो तपस्वी असो किंवा सामान्य गृहस्थधर्मी असो. मात्र तो स्पर्श, तो गंध किंवा तो नाद ओळखणं सोप नसतं. तो पकडून एखाद्या अमोलिक रत्नाप्रमाणे अंतःकरणाच्या संदुकेत जपून ठेवणं भाग्यानच जमत. बहुधा असे क्षण नकळत निसटूनच जात असतात. क्वचित हाती लागतात. मीच माझ्या हरिद्वार, हृषीकेशच्या प्रवासात असताना लिहिलंय–

*'हृषीकेशंच्या गंगेवरती*
*मनात माझ्या नव्हते काही*
*विकार नव्हते विचार नव्हते*
*नव्हती वृत्ती कुठल्या ठायी*
*धुंदी होती जगावेगळी*
*नाव तियेचे माहित नाही !'*

असे अमोलिक क्षण केव्हा केव्हा स्पर्शून जातात. अशाच एका निर्मनुष्य, निवांत वेळी कृष्णेच्या काठावर माझ्या निर्विकार अंतःकरणाला झालेला एक अमृतस्पर्श– या कवितेत










ओघळलेला.

जेव्हा जेव्हा एकांतात– मनाच्या अविचल अवस्थेत मी ही कविता आठवतो तेव्हा तेव्हा त्या आनंदमय अवस्थेत मी पुन्हा शिरतो– जसा आईच्या कुशीत !

ते सुख कधी सरूच नये असं वाटतं. अशी ही कविता. एकोणीसशे सत्तर साली प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'स्वर' या कवितासंग्रहात अगदी शेवटी असलेली ही कविता. या कवितासंग्रहाच्या प्रकाशनानंतर माझ्या आकाशवाणीच्या किंवा कविसंमेलनांच्या काव्यवाचनात जेव्हा जेव्हा ही कविता आली तेव्हा रसिक श्रोतेही या अलौकिक अवस्थेशी एकरूप झालेले मी पाहिले. आकाशवाणीवरील काव्यवाचनात देखील मी ही कविता वाचली आणि भारावलेल्या अवस्थेत काव्यवाचन संपविले. तर अशी ही कविता.

रात्री कृष्णेच्या घाटावरून घरी परततानाच ही कविता वेली बहरून आली. पुढे केव्हातरी कागदावर उमटली माझी कविता लिहिण्याची प्रक्रिया बहुधा एका बैठकीतच पुरी होते. कविता मनातच उमललेली असते. तिचा गंध आत दरवळत असतो. मला खुलवीत असतो. मग केव्हातरी कागदावर लिहायला म्हणून बसतो आणि लिहितो इतकेच. कविता लिहिणे म्हणजे कवितेची निर्मिती नव्हे. ती तर केव्हाच नकळत झालेली असते.

छंद-शैली-शब्द हे निर्मिती प्रक्रियेत सहजच आलेले. फूल जसे रूप-रस-रंग-गंध यांसह सहजच उमलते. रसिकांच्या अंतःकरणाला स्पर्शिण्याची तिची क्षमताही अंगभूतच.

तिचे स्वागत रसिकांनी कसे केले याकडे माझे फारसे लक्ष नसते. जी कविता मला विशेप भावली, ती रसिकांनाही आवडणारच. असा मला विश्वास असतो आणि अशा कवितेतील गूढानुभव पुन्हा पुन्हा घेत असताना मनाला जी निश्चल– शांत सदानंदावस्था लाभते तिनेच मी भरून पावतो.

**मध्यरात्रीच्या गाढ अंधारात**

*मध्यरात्रीच्या गाढ अंधारात*
*कधी कधी एकटाच बसतो–*
*डोहाच्या काठाशी*
*वंद असतात वारे*
*मंद असतात तारे*
*काठावरचे तरू स्तब्ध असतात. तप करीत–*
*समाधी भोगीत*
*मीही बनतो क्षणार्धात*
*त्यातलाच एक तपस्वी, योगी*
*आणि अचानक–*



अनुक्रमणिका







*लहरून जाते एक थंड वाऱ्याची झुळुक*
*थरथर होते औदुंबर वृक्षांची*
*वाजू लागतात– दिव्य खडावा*
*नेत्र विस्फारित होतात*
*केशरी काषाय रंग निघून जातो प्रकाश झोतासारखा*
*इकडून तिकडे*
*क्षणभर डोळे मिटतात.*
*आणि अंतःकरणात भरून राहतो–*
*दिव्य प्रकाश*
*केवळ प्रकाश*
*अबोध*
*अगम्य*
*अनिर्वचनीय–*

(ह.न. जोशी सुधांशु सदन औदुंबर ४१६ ३२०)

---

# अत्तर

**कृ. ब. निकुंब**

---

मी बेळगावला १९५१ मध्ये आलो आणि सतत एकोणीस वर्षे एकाच घरात भाड्याने राहिलो. पाच जून १९७० मध्ये तेथून सध्याच्या स्वतःच्या जागेत आम्ही राहायला आलो. ही जागा बरीच मोठी होती, पण तिच्या पुढल्या भागात काही फेरबदल करून घेणे अवश्य होते, म्हणून आम्ही आधी पाठीमागच्या भागात राहायला सुरुवात केली. या भागासमोर तेव्हा तरी झाडेझुडपे नव्हती किंवा बांधकामही झालेले नव्हते. पूर्वक्षितिज तेथून अगदी लख्ख दिसत असे. पाच-सहा महिने उलटून गेल्यानंतरची गोष्ट; डिसेंबरमधल्या एका सकाळी, जाग आल्यावर, माझ्या अभ्यासिकेतून बाहेर पडून मधले दालन ओलांडून, मी पलीकडच्या बाजूला गेलो. मुखमार्जनादी उरकून पुन्हा अभ्यासिकेकडे जाण्यासाठी, मधल्या दालनाशी आलो आणि दाराशीच विस्मित होऊन खिळून राहिलो. उघड्या दारातून आणि गजांच्या खिडकीतून आत आलेले उन्हाचे पिवळेधमक झोत सबंध दालनभर पसरलेले होते, मागच्या भिंतीपर्यंत पोहोचून काटकोनात थेट त्या भिंतीवर चढले होते. हे ऊन नुसतेच पिवळेधमक नव्हते, त्यात

जाणवण्याएवढी सुकुमार, तांबूस छटा होती. मुशीत वितळवलेल्या शुद्ध सुवर्णासारखे ते लखलखत होते. अस्सल रेशमी वस्त्राची सळसळ त्यात जाणवत होती. बेळगावच्या सुप्रसिद्ध थंडीत, त्या उन्हाचे झोत ऊबदारपणाचे संवेदन जागवीत होते. एखाद्या गोऱ्यापान, गोंडस बालकाला पाहताक्षणी उचलून घेण्याची अनावर ऊर्मी यावी, तसे काहीसे मला जाणवले.

मी झपाट्याने ते दालन ओलांडून अभ्यासिकेत शिरलो, सापडला तो कागद पुढे ओढला आणि लिहू लागलो–

*'उचलून घेतो*
*उगवत्या उन्हाचे हे चार लडिवाळ झोत*
*त्यातल्या झुलत्या सावलीसह*
*भिरभिरणाऱ्या चिमण्यांच्या !'*

वस्तुतः येथे चिमण्याच नव्हत्या, अर्थातच त्यांच्या भिरभिरणाऱ्या सावल्याही नव्हत्या. हे सारे माझ्या मनचेच निर्माण केले होते. आता लक्षात येते की, चिमण्यांच्या सावल्यांमुळे ऊन अधिकच उजळून निघणार होते आणि सावल्यांच्या झुलण्याने झोत जणू गतिमान होणार होते.

रंगसंवेदनांच्या या चमत्काराकडून माझे मन सहजपणे स्वरसंवेदनांकडे वळले. त्या सकाळच्या कोवळ्या उन्हाच्या पाठोपाठ भर दुपारचे प्रखर ऊन हाय हाय करायला लावीत असताना बिसमिल्लांच्या सनईतला सारंग मन कसे शीतल-शीतल करीत जातो त्याची मला जाणीव झाली आणि मी लिहून गेलो–

*'ऐन दुपारच्या कठोर तप्ततेला आव्हान देणारा*
*सनईतला 'सारंग' त्याचा शीतल, मंथर, रसविभ्रम*
*मी अलगद बांधून ठेवला आहे, रेशमी पाशांनी*
*सैलसर !'*

रंग आणि स्वर या दोनच काय, असंख्य संवेदना शब्दबद्ध करून ठेवणाऱ्या साहित्याचे स्मरण होणे आता अपरिहार्यच होते. क्षणाचाही विचार न करता मी लिहून गेलो,

*'या करुणोदात्त महाकाव्याच्या अखेरच्या ओळी–*
*ओठांवरच कोरला आहे त्यातला एकेक शब्द*
*उच्चारित, अनुच्चारित, मधला विरामसुद्धा !'*

येथे मी 'करुणोदात्त महाकाव्य' असे म्हटले आहे, पण त्या वेळी माझ्या नजरेसमोर तरळत होती ज्ञानदेवांची ती अतुलनीय भव्य कृती आणि गाढ झोपेतून जागे करून कोणी मला तिच्यातील सर्वोत्कट प्रसंग विचारला, तर माझे ओठ अविलंबे उच्चारू लागतील त्या ओळी–

*'मग सावळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।*
*आलंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥–*
*हृदया हृदयं येक जालें । ये हृदयीचें तें हृदयीं घातलें*










*द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥*
*दीपें दीपु लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला*
*द्वैत न मोडितां केला । आपणपों पार्थु ॥*
*तेव्हां सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया ।*
*तेथ वाडु, तरी बुडोनिया । ठेला देवो ॥*
*सिंधु सिंधूतें पावों जाये । तें पावणें ठाकें दुणां होये*
*वरी रिगे पुरवणिये । आकाशही ॥'*
*तैसें तया दोघांचे मिळणें । दोघां नावरें जाणावें कवणें*
*किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें ॥'*

दक्षपणाने जपून ठेवावा त्या तोलाचा आयुष्यातील एखादा उत्कट प्रणयानुभव सांगितला जाणे आता स्वाभाविक होते.

*'आणि तुझा तो सहवास हळुवार जुईच्या वासासारखा*
*खुलत्या सांजेतून उमलत्या रात्रीत शिरलेला*
*अनिवार बोलता-बोलता नकळत अबोल झालेला*
*तो तर केव्हाच जपून ठेवला आहे, वेगळाच*
*एका नक्षीदार उंच कुपीत !'*

निदान काही काळापुरती तरी मनाची रुखरुख, उंची अत्तराच्या वासाने दूर व्हावी, असे हे अनुभव ! म्हणून तर ते अत्तरासारखे जपून ठेवायचे !

कविता अगदी सहजपणे दिवसाच्या वेगवेगळ्या प्रहरांतून पुढे पुढे जात राहिली आहे. उगवती सकाळ, ऐन दुपार, खुलती सांज अशा टप्प्यांनी ती अलगद उमलत्या रात्रीत शिरली आहे.

ही कविता दिनांक १५ डिसेंबर १९७० ला लिहिली. ती 'अभ्र' या १९७५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या माझ्या काव्यसंग्रहात समाविष्ट आहे. ती अर्थातच आधी प्रसिद्ध झालेली आहे, पण केव्हा आणि कुठे ते आता नक्की स्मरत नाही. बहुधा 'सत्यकथे'च्या किंवा 'मौज'च्या त्या सुमाराच्या एखाद्या दिवाळी अंकातून प्रकटली असावी. ती बसल्या बैठकीला एकटाकीच लिहिली. तिच्यावर संस्कारही करावे लागले नाहीत. ती मुक्तशैलीतूनच स्वाभाविकपणाने प्रकट झाली.

संमेलनादी प्रसंगी जेव्हा कविता वाचण्याची वेळ येते, तेव्हा बहुधा मी या कवितेने प्रारंभ करतो आणि तिला चांगली दाद मिळते. दुसऱ्या आणि तिसऱ्या कडव्याची अखेर, संपूर्ण चौथे कडवे आणि समारोपाच्या ओळी श्रोते विशेषत्वाने उचलून धरतात.

आपण पत्रात सुचवल्याप्रमाणे माझ्या संग्रहातल्या वेगवेगळ्या कारणांकरिता मला आवडलेल्या काही कवितांची नावे येथे देत आहे. 'हळू हळू येई रात', 'शिशिर अजून संपला



अनुक्रमणिका







नाही' ('उज्ज्वला') 'अडसर', 'संहारचक्र' ('ऊर्मिला') 'लेणे', 'पाऊल' ('अनुबंध') 'अभ्र', 'अथ अरण्यकांड' ('अभ्र').

'अत्तर' हीही अशाच माझ्या आवडत्या कवितांपैकी एक. तिच्यावरच लिहिले ते अशासाठी की, तिच्या निर्मितीच्या वेळचे जवळजवळ सारे तपशील माझ्या मनात अद्यापही जागे आहेत.

आता आम्ही पुढल्या भागात राहायला आलो आहोत. अजूनही प्रत्येक डिसेंबरमध्ये, पुढल्या बाजूच्या माडांवर पडलेले ऊन पाहण्यासाठी मी आतुर असतो. वेगवेगळ्या ठिकाणची भिन्न भिन्न पार्श्वभूमीवरची उन्हाची अनेक चित्रे माझ्या मनाने जपून ठेवलेली आहेत, पण याच्यासारखे हेच !

— कृ. ब. निकुम्ब, टिळकवाडी, बेळगाव

---

# 'कविता स्फुरते कशी'

संजीवनी मराठे

---

*कशी अचानक जनीं प्रगटते मनातली उर्वशी*
*मी न कुणाला सांगायाची कविता स्फुरते कशी*
*कुंभ रसांचे शिरी घेउनी शब्दांच्या गौळणी*
*नजरेपुढती ठुमकत येती रूपवती कामिनी*
*हसती, रुसती, विसावती कधि तरंगती अंबरी*
*स्वप्नसख्या त्या निजाकृतीचा वेध लाविती उरी*
*त्यांच्या नादें करू पाहते पदन्यास मी कशी*
*मी न कुणाला सांगायाची कविता स्फुरते कशी*
*अवकाशावर धुंद उषेचे स्मित ओघळते कसे*
*स्मितासवे त्या उन्मेषांचे बाग बहरती कसे*
*क्षितिजमंडलीं अथवा झुकते रजतपौर्णिमा कशी*
*मनोभाव न्हाणीत राहते शीतल ज्योत्स्नारसीं*
*अंतरबाहिर एक सुरावर घुमे सुरावट कशी*
*मी न कुणाला सांगायाची कविता स्फुरते कशी '*










*हे स्वरसुंदर जीवनमंदिर कुणी कसे उभविले*
*मी न कुणाला दावायाची शिलालेख आंतले*
*समईमधली ज्योत अहर्निश भावभरे तेवते*
*तिच्या प्रकाशीं कुणापुढे मी हितगुज आलापिते*
*कशी नाचते, कीर्तनरंगी हरपुन जाते कशी*
*मी न कुणाला सांगायाची कविता स्फुरते कशी.*

'कविता स्फुरते कशी–' या नावाची माझी एक कविता आहे. ती माझ्या आवडीची कविता आहे. ही कविता सुमारे तीस वर्षांपूर्वी लिहिलेली आहे. अ. वि. गृह पुणे या संस्थेतर्फे 'मराठी साहित्य दर्शन' या नावाची माला प्रकाशित झालेली आहे. १९६१ साली प्रकाशित झालेल्या तिच्या दहाव्या पुष्पामध्ये माझी ही कविता प्रथम संग्रहित झाली आहे.

ही कविता काव्यनिर्मितीबद्दलच रचलेली आहे. पुणे आकाशवाणीतर्फे आपण कविता कशी लिहितो. या विषयावर भाषण देण्याचे आमंत्रण आले होते. असे भाषण देणे मला काही जमणार नाही, असे मी (बहुतेक) त्यांना कळवले होते. नंतर मात्र, माझ्या मनात कवितेच्या निर्मितिविषयक विचार सुरू झाला. काही कल्पनाही सुचल्या. आणि एक दिवस 'कविता स्फुरते कशी–' ही कविता लिहिली गेली. वातावरण वेगळे असे काहीच नव्हते. त्या काळामध्ये भावकवितेची पावलं मनात केव्हाही वाजू लागत. तशीच या कवितेची पावलंही जलद गतीने मनात पडत गेली.

*'मी न कुणाला सांगायाची कविता स्फुरते कशी ।*

या ओळीनंतर तिची पहिली ओळ रचून झाली एव्हढे मला आठवते ती अशी–

*कशी अचानक जनीं प्रगटते मनांतली उर्वशी*
*मी न कुणाला सांगायाची कविता स्फुरते कशी ॥*

असा कवितेचा मुखडा तयार झाला.

मला कविता दिवसाच्या काठी केव्हाही सुचत असे. घरकामात माझे बेताचेच लक्ष असायचे. या नव्या कवितेचा आरंभ तर चांगला झाला होता. छंद की जाती– नेहमीच्या सरावातली होती. मनात जुळलेला आशय प्रथम तरल स्वरूपाचा असतो. त्याला पार्थिव असे काव्यरूप कसे मिळते कोण जाणे. शब्दांच्या नादाने तर ते मिळत नसेल ? ही कल्पना मनात आली कारण तसे पुष्कळदा घडत असे. शब्दांचा छोटासा थवा नादतालयुक्त अशा रूपात कधीकधी माझ्या ओठांवर उभा राही. 'सत्यांत नाहि आले, स्वप्नांत येउं का ?' ही ओळ अशीच अलगद ओठांवर उतरली होती. मधुबाला जव्हेरी यांनी माझे एक भावगीत गायिले आहे. 'जिवाच्या जिवलगा नंदलाला रे ॥' अशी त्याची पहिली ओळ आहे. ती मला लोकलगाडीच्या तालावर सुचली होती. गीत मात्र घरी गेल्यावर पूर्ण लिहून झाले. असे नादमधुर, सुंदर शब्द आपल्याकडे येतात, खुणावतात– असे वाटून मी पहिले कडवे रचले. 'शब्दांच्या गौळणी










रसांचे कुंभ घेऊन ठुमकत नजरेसमोर येतात, त्यांच्या नादाने मी पदन्यास करू पहाते– कशी कोण जाणे'

मनात विचार चालूच होता. केवळ शब्दांसाठी आपण कविता लिहितो का ?– असे कसे असेल ? सौंदर्यदर्शनाने मन तन्मय झाले की कशी आपल्याला कविता सुचते ? अशा तद्रूप अवस्थेविषयीं काही सांगावे म्हणून– पण दुसरे कडवेही चटकन् जुळवले गेले. अवकाशावर उषेचे धुंद स्मित ओघळते, किंवा चांदण्या रात्री आपल्या चित्तवृत्ती सुस्नात होतात. नवोन्मेषाने नटतात. अशा वेळी आपल्या तोंडून सुरावट निघते. गाणे निघते. असेच असेल ना ? कोणास ठाऊक.

'कोणास ठाऊक' असे म्हणताना वाटले की याखेरीज आणखी देखील एक सुमुहूर्त असतो. जेव्हा आपण आपल्या हृदयस्थापुढे मन मोकळे करत असतो. हे आत्मनिवेदनही कवितेला प्रेरणा देत असते ना ? नाही ?–

या कल्पनेनें माझ्या कवितेचे तिसरे आणि अखेरचे कडवे लिहिले गेले. कविता तयार झाली आणि नंतरच्या एका काव्य गायनाच्या कार्यक्रमात मी ती म्हणून दाखवली. चाल साधीच पण आतला आशय खुलवील अशी लागली होती. श्रोत्यांना ती पसंत पडली. एव्हढेच नव्हे, तर एस्.एस्.सी. च्या पाठ्यपुस्तकात ती लवकरच समाविष्ट केली गेली. माझ्या मुलीला मी ती समजावून देत होते. मनात येत होते की आपण तर नित्यच ही निर्मिती प्रक्रिया अनुभवत असतो. त्याचे हे रेखाचित्रच आहे. छायाचित्रासारखे सुस्पष्ट आणि सर्व गुणांनी युक्त.

कानामनाला आनंद देणारी ही 'कविता स्फुरते कशी–' कविता या तिच्या गुणरूपामुळेच माझ्या आवडीची झाली असेल का ?

—संजीवनी मराठे, १६, सुखनिवास, १०२/२ अ शिवाजीनगर, पुणे १६

# निद्रेची अफीम जीवावर चढते आहे

अनुराधा पोतदार

उभ्या आयुष्यात्त, जाणत्या वयापासून कितीतरी कविता केल्या जातात. बरेचवेळा कळत-नकळत अगदी सहजपणे आणि अपरिहार्यपणे त्या मनातल्या मनात, काही क्षणातच होतात; प्रयलपूर्वक, कराव्या लागत नाहीत. तर कधीकधी कित्येक दिवसांच्या अंतराने मनाचा छळवाद करीत अगदी प्रयासपूर्वक त्या केल्या जातात. क्वचित रचल्याही जातात; काही उद्देशाने, सहेतुकपणे, कुणीतरी सांगितले म्हणून, मागणी आली म्हणून. माझ्या बाबतीत मात्र असे फारच क्वचित घडते. कविता होते ती काही क्षणातच, मनातल्या मनात, अकल्पित. गती

मला मानवते, नव्हे, गती, वेग माझ्या कवितेला अगदी अत्यावश्यक असतात. म्हणूनच की काय माझ्या बऱ्याचशा कविता प्रवासात होतात. गच्चीवर फेऱ्या घालताना, किंवा संध्याकाळी घराबाहेर पडल्यावरही त्या होतात. मग कधीतरी त्या कागदावर उतरवल्या जातात. प्रवासातही कागद-पेन जवळ ठेवावे लागते, कारण काही वेळाने मन वेगळ्या व्यवधानात गुरफटले की कविता मनातून निसटून जाण्याचेही भय असते. अनेकदा अशी निसटलेली कविता पुन्हा हाताशी लागणे फार कठीण होऊन बसते. स्मरणाची तार कितीही ताणली तरी ती हुलकावणी देते ती देतेच. फार अस्वस्थ करणारा अनुभव असतो तो.

आपल्या आयुष्यभराच्या काव्यसंभारातून आपली सर्वांत प्रिय कविता निवडणे मला तरी फार कठीण अगदी अशक्यप्राय वाटते. वेगवेगळ्या कारणांसाठी वेगवेगळ्या कविता प्रिय होतात. एखादी कविता काव्यवाचनाच्या कार्यक्रमात उचलून धरली जाते, जाणत्या रसिकांना भिडते, तिचे मर्म ती त्यांच्या कानामनापर्यंत पोचवू शकते म्हणून आवडते. दुसरी एखादी, स्वतःचे अंतस्थ मनोगत नेमके, अगदी पूर्णत्वाने व्यक्त झाल्याची खूण स्वतःलाच पटवते म्हणून आवडते. काही कविता त्यांच्या पाठीशी असणाऱ्या अनुभवांच्या सुखद स्मरणासाठी प्रिय होतात, अधिक आपल्याशा वाटतात, तर एखादी कविता अनुभवाचे जे रहस्य तिच्या उरीपोटी सामावून घेते, जपते, ते केवळ तिचे आणि आपलेच आहे या सुखद जाणीवेमुळेही आवडते ! अशा कवितेशी मनाचा एक अति कोमल भावबंध नेहमीसाठीच जोडलेला असतो. कालांतरानेही तो कोमेजत नाही, गळून पडत नाही.

कवितेविषयीचे हे सारे मनोगत ज्या कवितेच्या आधाराने मी सांगते आहे ती माझी सर्वांत आवडती किंवा सगळ्यात प्रिय कविता असे म्हणता येणार नाही; किंवा एवढेच म्हणता येणार नाही. मोकळेपणाने हे सांगायलाच हवे. आज जी कविता निवडावीशी वाटली ती "कॅक्टसफ्लॉवर" या माझ्या संग्रहात आलेली असली तरी त्याआधीच काही वर्षं ती झालेली आहे. जुन्या वह्या काढून शोधले तेव्हा या कवितेखाली जो कालनिर्देश सापडला तो आहे. १७-११-१९७१. माझ्या कवितांना खरे तर मी नावे देत नाही. अनुक्रमणिकेच्या किंवा संपादकांच्या सोयीसाठी ती जेव्हा द्यावी लागतात तेव्हा त्या त्या कवितेची पहिली सबंध किंवा अर्धी ओळच मी शीर्षक म्हणून बहुधा वापरते. या कवितेचे नाव "निद्रेची अफीम" असे घ्यायचे ते याच रीतीने आज ही कविता मी निवडली ती सर्वांत आवडती किंवा सगळ्यांत प्रिय कविता म्हणून नाही हे आत्ताच सांगितले; खरे तर आवडती कविता, प्रिय कविता एवढेच म्हणून मोकळे होण्याइतके हे नाते साधे सोपे नाही. आवडती आणि नावडती अशी वर्गवारी झटकन् करून टाकावी इतके हे कवी-कवितेचे नाते साधे सरळसूत नसते. काही कविता अगदी उत्स्फूर्तपणे एखाद्या विलक्षण क्षणी, मनाच्या आतल्या गाभ्यातून आलेल्या असतात. आपल्या अति नाजुक किंवा आत्यंतिक दाहक अनुभवामधे आणि त्यापोटी उद्भवलेल्या विलक्षण भावस्थितीमधे त्या आणि केवळ त्याच सहभागी असतात. त्या क्षणांच्या, नव्हे त्या जगण्याच्याच साक्षीदार असतात. हे अनुभव आणि त्यानंतरची मनोवस्था जशी विसरता येत नाही तशाच या कविताही.

किंवहुना ते अनुभव, त्या अनुभवामधले आणि नंतरचे आपले क्षण आणि ते सारे मूकपणे शब्दांकित करणाऱ्या या कविता या सगळ्याचे मिळून एक वेगळेच रसायन आपल्या मनात तयार झालेले असते. ही कविता अशा कवितांपैकीच एक. पण तेवढेच नाही. अनेक कारणांनी मला ही माझी एक महत्त्वाची कविता वाटते. अनुभवाच्या, अभिव्यक्तीच्या दृष्टीनेही एक यशस्वी, पूर्ण आणि वैशिष्ट्यपूर्ण कविता वाटते. उत्कट भावनेची तापलेली तार किती ताणता येते, एखाद्या संमिश्र भावस्थितीच्या किती एक पायऱ्या कशा आणि किती पूर्णत्वाने टिपता येतात; शब्द, कल्पना प्रतिमा, लय या साऱ्याचे एक दुर्मिळ रसायन कसे सहजगत्या बनते या सगळ्याची प्रचीती ही कविता मला देते; आज अनेक वर्षे उलटली तरी तितक्याच तीव्रतेने देते म्हणून हीच कविता मला निवडावीशी वाटली.

प्रत्येक कविता कधी, कुठे, कशी झाली हे सारे कवीलाही पुढे नेमके आठवतेच असे नाही. अनेकदा आठवते ते अंधुकपणे, धूसरपणे, अंधारातच एखादी सावली पडावी तसे. काही कवितांचे स्मरण मात्र मनात अगदी स्पष्ट कोरल्यासारखे, पुसता न येणारे असते; असे लख्ख असते की ते मुद्दाम आठवावेही लागत नाही. अर्थात जे जे आठवते ते ते सारे सांगता येतेच असे नाही. खरे तर कवितेच्या आस्वादासाठीही कवीने रसिकाला ते सारे अगदी तपशिलात सांगण्याची आवश्यकता असते असेही नाही. कालांतराने स्वतःचे स्वतःलाच काहीबाही तपशील अगदी अचूक आठवतात तेव्हा एक प्रकारची गंमतही वाटते. अनेकांना आणि मलाही आवडणारी माझी एक प्रेमकविता शनिवारवाड्यापुढच्या मैदानात कुणा वक्त्याचे भाषण ऐकताऐकता हातातल्या छत्रीशी चाळा करीत झाली होती, दिवस पावसाचे होते हे मला आज अनेक वर्षांनंतरही आठवते. आता हा तपशील सांगणे म्हणजे निर्मितिप्रक्रियेचाच एक भाग सांगणे. पण ही निर्मितिप्रक्रिया उलगडून दाखवणे म्हणजे पाण्याबाहेर दिसणारा हिमखंड पाण्याच्या आत किती दडलेला आहे याचा अंदाज बांधण्यासारखेच असते. सगळ्या कवितांच्या जन्मकथा अगदी निश्चित आणि निःशंकपणे सांगता येत नाहीत. मात्र, आयुष्याच्या पुलाखालून कितीतरी पुरांचे पाणी वाहून गेले तरी काही कवितांच्या जन्मकथा नेमक्या कशा आठवतात याचे कधी आश्चर्य वाटते. कधी वाटतही नाही – जे जिवाभावाचे ते स्मरणातही रुजले तर काय नवल ?

आज जी कविता मी निवडली ती कधी, कुठे, कशी झाली याचा सर्व तपशील इतक्या वर्षांनंतही मला स्पष्ट आठवतो. ती तेव्हाची मी माझ्या आजच्या शिणलेल्या डोळ्यांनाही स्वच्छ दिसते– नुसती आठवत नाही. एका लहानशा गावाच्या छोटेखानी स्टेशनवरच्या वेटिंगरूममधे मी बसले होते, परतीच्या गाडीची वाट पाहत. सकाळ कलत असावी; "असावी" असे म्हणते कारण सभोवतीच्या वातावरणाकडे त्या वेळी माझे थोडेही लक्ष असेलसे वाटत नाही. स्वतःपलीकडचे कसलेच भान त्या क्षणी नसावे. वेटिंगरूममधल्या खुर्चीच्या पाठीवर माझी मान टेकली होती, नव्हे कलंडली होती. इतकी मी दमले होते. हा विलक्षण शीण केवळ शरीराचा नव्हता, मनाचाही होता; मनाचाच अधिक होता. रात्र रात्र टकटकीत डोळ्यांनी केलेल्या

जागरणांचा यावा तसा तो शीण होता. तो शीण मनाचा, बुद्धीचा, संवेदनांचा, डोळ्यांचा, डोळ्यांच्या पापण्यांचा, त्या पापणींच्या प्रत्येक केसाचा होता. संज्ञा बधीर झाली होती. पूर येऊन गेल्यावर जमीन धुपून जावी, सारे उजाड व्हावे तसे मन रिते झाले होते. झोप येत नव्हतो, येत होती ती ग्लानी. विलक्षण ग्लानी, निद्रा, झापड, भोषळ या सगळ्यांच्या सीमेवर हेलकावे घेणारी ती एक आत्यंतिक श्रांत अवस्था होती. हा शीण जसा मला गात्रागात्रातून जाणवत होता. तशीच पावलांच्या तळव्यापासून, बोटांपासून वरवर चढणारी ही ग्लानी, ही संधेतून निसटू पाहणारी निद्रा मला कणाकणातून जाणवत होती. शीण फार मोठा होता, पण जे घडून गेले होते तेही फार क्लेशकारक आणि अप्रिय होते. मनाच्या प्रदेशातच उलथापालथ झाली होती, पण ते सारे मला एक चटका आणि शासन देऊन संपलेले होते. जाताजाता माणसांच्या नात्यांविषयीचे, उत्कट भावबंधांविषयीचेही काही कटुसत्य मला शिकवून संपले होते. हा शीण होता त्यानंतरचा. ही अवस्था होती त्यानंतरची. एखाद्या अंमली पदार्थाची नशा चढतचढत जीवाला वेढत असावी तशी ही ग्लानीची नशा जीवाला वेढून टाकत होती. मस्तक बधीरले होते. मन पेंगुळले होते, डोळे जडावले होते. आणि पाण्याच्या तळातून हळूच काही वर यावे तसे शब्द उमटले, "निद्रेची अफीम जीवावर चढते आहे, जडशीळ झालेल्या पापण्यांच्या पखाली उचलता उचलत नाहीत_" कधी बरं पाहिल्या होत्या मी या पाण्याने भरलेल्या जड पखाली ? आता आठवत नाही. तेव्हाही आठवत नसावेच. कधीकाळी क्वचित कुठेतरी त्या पाहिल्या असतील. खरे तर मुद्दाम आठवून काही उल्लेख करावा, उपमा द्यावी, प्रतिमा वापरावी असे कवितेत सहसा होत नाही. खऱ्या कवितेत कधीच होत नाही. जे कवितेत सहजपणे उतरते ते अंतर्मनाच्या तळातून तितक्याच सहजपणे (Irrespective of Everything) वर आलेले असते. आपल्या अंतर्मनाच्या एखाद्या अंधाऱ्या कोपऱ्यात ते नकळताच कुठेतरी जपलेले, कधीतरी साठवलेले किंवा विनासायास साठलेले असते.

तशाच या पखाली. पाण्याने काठोकाठ भरलेल्या. भरून सांडणाऱ्या. कष्टानेच उचलल्या जाणाऱ्या. तेव्हाचे ते डोळे म्हणजे अशा पखालीच झाल्या होत्या. जडशीळ. कष्टानेच उघडता येणाऱ्या. कधीतरी लवकरच त्या रित्या होणार होत्या. पण आज मात्र काठोकाठ भरलेल्याच होत्या. पाण्याने नव्हे. त्यात भरला होता अपार शीण. आदल्या दिवशीच्या क्लेशकारक अनुभवातून जाताना माझे ते सारे ताण आकळणारी जाणीवेची नाडीही वेडावल्यासारखी उडत, धपापत होती. टकटकीत होती. पण फुलाने कोमेजून मान टाकावी तशी आता मात्र ती अर्धमेल्या ग्लानीत पेंगुळली होती. कळे न कळेशीच जागी होती. अजगरासमोर खिळलेल्या भक्ष्याची जी प्रतिमा पुढे येते ती माझ्या एकूण काव्यामध्येच फार वेगळी आणि विलक्षण म्हणून मला जाणवते. "कॅक्टसफ्लॉवर" या संग्रहातल्या माझ्या बहुतेक कवितांना अनुभव-आविष्काराची जी तीक्ष्णता व तीव्रता आहे तिच्यापोटी अशा काही वेगळ्या प्रतिमा अधूनमधून आलेल्या दिसतात–

एरव्ही माझ्या कवितेचे पोत तसे सौम्यच. पण वेगळ्या म्हणून जाणवणाऱ्या

...णांमध्येही ही प्रतिमा अधिकच विलक्षण वाटते. ही प्रतिमा कशी, कुठल्या प्रक्रियेने आली ? सांगता येणार नाही. मग जाणवते की या कवितेच्या पाठीशी असलेला दाहक अनुभवच अनेक पटींनी अधिक धगधगीत होऊन या विलक्षण प्रतिमेमधून कवितेत उतरला आहे. म्हणजे प्रत्यक्ष त्या अनुभवक्षणांमध्येही, स्वतःच स्वतःवर ओढवून घेतलेल्या ज्या वेदनांची पुरती जाण मला आली नव्हती– जी जाण ती बधीरलेली अवस्था ओसरल्यानंतर आली. ती माझ्याहूनही अधिक तीव्रतेने माझ्या कवितेला आली होती, म्हणूनच माझ्या काव्यशैलीला सामान्यतः अनोख्या अशा या प्रतिमेमधून ती शब्दांत उतरली. माझ्या भावजीवनाशी घट्ट जखडलेल्या त्या अनुभवात, त्या प्रसंगात मी स्वतःलाच घायाळ करणारा जो नाहक वाद, जे समर्थन करीत होते, जी कैफियत मांडत होते, प्रश्न विचारत होते त्या कशालाच वस्तुतः उत्तर नव्हते, पर्याय नव्हता. ते अटळच होते. वाच्यार्थानेच स्वतःला व दुसऱ्यालाही अगतिक करणारे होते. कारण अन्य गती खरोखर नव्हतीच. त्या नसलेल्या वाटेचा पाठपुरावा करणे म्हणजे स्वतःलाच अधिक जखमी करून घेण्यासारखे होते. अगदी आरंभी जरी नाही तरी नंतर माझे मलाच ते आतून समजतही होते_ आणि तरीही मी थांबत नव्हते; अति क्लेशकारी आणि अर्थशून्य असा तो विषय संपवीत नव्हते. अंगावर येणाऱ्या प्राणलोटातून बाहेर न पडता सुन्नपणे गुदमरत, कासावीस होत पुढेच जात राहावे तसे माझे झाले होते. ते एक आत्मपीडनच व आत्मताडनच होते. त्या वेदनेचीच अशी नशा माझ्यावर चढली होती आणि मीहून तिच्या पाशात ओढली जात होते. तो एक कैफच होता. उत्तर नसलेल्या प्रश्नाचाच वेडा ध्यास घेतल्याबद्दल स्वतःलाच केलेले ते शासन होते; प्रथम कळत-नकळत अभावितपणे केलेले नंतर कळून सवरून केलेले, करीत राहिलेले. जीवघेणे काही घडून गेले की नंतरच्या असह्य श्रांततेमध्ये कुठलाही relief मनाला फार हवा असतो. केवळ स्वतःला वाचवण्यासाठी त्याखेरीज गत्यंतर नसते. स्वतःवर ओढवून घेतलेल्या त्या प्रसंगातले अश्रू म्हणजे आज केवळ खारे पाणी वाटते आहे. आणि त्यात मिसळते आहे आजच्या सुखाचे गोड पाणी. गोड पाणी नव्हे, ते खरेच गोड असते. गोडे पाणी म्हणजे पिता येण्याजोगे पाणी एवढेच. कालच्या निराशेतल्या अनावर अश्रूंचे आणि नंतरच्या तथाकथित सुखाचे आज हे असे झाले आहे ! understatement मधल्या उपरोधाचा हा कडवट पण अलिप्त स्पर्श आजही मर्मभेदी वाटतो;

आणि तरीही या उपरोधाच्या, अलिप्ततेच्याही तळाशी उरते ते मानवी अगतिकतेचे पर्यायहीन कारुण्य. उद्यांची स्वप्नेही अशीच जखमी होऊन, पराभूत होऊन क्षितिजावर असहाय्यपणे पसरणार आहेत हे आताच समजते आहे पण त्या घायाळ स्वप्नांचे केविलवाणे रक्त अजून तरी क्षितिजावर सांडलेले नाही. अजून ती घटका दूरच आहे. हे रक्तही धगधगते, उष्ण नाही. ते आहे मचूळ. त्याला धगही आणि चवही नाही. जखम आहे म्हणून रक्त आहे एवढेच. आता उरला आहे केवळ हा अपरंपार शीण. त्या थकव्याचीच ही ग्लानी, ही नशा अफूसारखी गात्रागात्रातून जीवावर चढते आहे. आज उरले आहे ते एवढेच. समजते आहे तेही एवढेच_ 'निद्रेची अफीम जीवावर चढते आहे.'

समर्थ कवितेला कवीपेक्षा वेगळे असे स्वतंत्र अस्तित्व आणि व्यक्तिमत्त्वही असते, ते मोठे जिवंत आणि चैतन्यमय असते; त्याच्या स्वतःच्याच काही निष्ठा, काही इमान असते; हे इमान कवीपेक्षाही कवीच्या अनुभवाशी, त्या अनुभवाच्या विशिष्ट प्रकृतीशी असते हे मला तीव्रतेने जाणवून दिले या कवितेने. म्हणून ती महत्त्वाची, कवितेचे नाते अनुभवाशी असले तरी त्याचे केवळ हुवेहूब, तंतोतंत प्रतिबिंब ती आपल्या शब्दांतून दाखवीत नाही. ती अनुभवाचेही संस्करण करते. अनुभवामध्ये असूनही बाह्यात्कारी न दिसणारे अनेक सुप्त घटक, अनेक सूक्ष्म छटा ती आपल्या आविष्कारामधून अधिकच गडद करून आपल्याला दाखवते. अनुभवाला ती अनेक परिमाणे, पैलू देते, अधिक संपन्न व अर्थपूर्ण करते. त्याला जणू नवा जन्म देते. म्हणजे कवितेला अनुभवनिरपेक्ष असे स्वतंत्र अस्तित्वही असतेच आणि कवीच्या व रसिकाच्याही दृष्टीने तेच अधिक चिरस्थायी असते; हे जाणवून दिले या कवितेने म्हणून ती महत्त्वाची.

अनुभवक्षणांमध्ये आपण अनुभवाच्या फार नजीक असल्याने त्याचे जे पूर्णदर्शन आपल्याला होत नाही. ते आपलीच कविता आपल्याला घडवते. त्या अनुभवक्षणांत आपण जे सोसले, भोगले आणि जाणले ते आपल्याहून अधिक आपली कविताच जाणते आणि तीच तेही आपल्याला सांगते. सांगते पण नेहमीच भावविवशतेने सांगत नाही. उपरोधाचा स्पर्श झालेल्या understatement मधून किंवा वरच्या टिपेतल्या एखाद्याच विलक्षण प्रतिमेमधून, अलिप्ततेनेही सांगते. ही अलिप्तता एकरुपतेच्या पोटी जन्मलेली म्हणूनच अधिक सच्ची आणि अर्थपूर्ण, अधिक परिणामकारीही. हे सारे प्रत्यंतर या कवितेमधून मला आज येते. कवीचे व्यक्तिमत्त्व, त्याचे अनुभव आणि ते कमीअधिक समर्थपणे आत्मसात करण्याचे कवीचे सामर्थ्य कवितेच्या पाठीशी असते यात शंका नाही, पण त्याहूनही वेगळे आणि भावात्मक असे जे स्वतंत्र अस्तित्व कवितेला असते. त्या बळावरच कवितेची शब्दकळा, तिच्या ओघात येणारे अलंकार व प्रतिमाही अभावितपणेच आकार घेतात. नेहमीच्या शैलीपेक्षा कधीकधी ते फार वेगळे आणि विलक्षण वाटतात. नेहमीपेक्षा एखाद्या कवितेचा सूर अगदी वरच्या टिपेत लावला जातो, किंवा लागतो तोही यामुळेच. अशा वेळी त्या कवितेची भाषा बाह्यात्कारी साधी, सोपी वाटली तरी ती तशी नसते. एक धगधगता भावाशय तिच्या पोटी साठवलेला असतो. जखमेत साकाळलेल्या रक्तासारखा त्या दारुण अनुभवाचा अर्क तिच्या शब्दाशब्दातून साकळलेला असतो. असे हे कवितेचे रूप अनेकदा आपल्यालाच चकित, स्तिमित करते. या कवितेने माझ्यासाठी हे सारे केले म्हणून ती महत्त्वाची व जवळची. ही कविता मी कागदावर लिहिण्यापूर्वी मनातल्या मनात झाली ती बहुधा काही मिनिटातच. माझी कविता बहुधा नेहमीच अशी अगदी थोड्या वेळातच होते. फक्त तेवढे क्षण मात्र त्या भावतंद्रीत राहता यावे लागते. कवितेवर कसलेच संस्कार मी बहुशः करीत नाही. क्वचित एखादा शब्द वगळणे किंवा बदलणे, ओळीचा क्रम बदलणे एवढेच. तेही एखाद्याच कवितेमध्ये. या कवितेवर तर कोणतेच संस्कार मी केले नाहीत. आरंभीची बरीचशी कविता मी छंदोबद्ध स्वरूपात लिहिली. ही छंदोबद्ध कविता 'आवर्त' या माझ्या पहिल्या संग्रहात दिसते. नंतरची बहुतेक कविता मुक्त आहे.

मुक्तछंदातही नाही पण तिला भावाशयातूनच आलेली काही अंतर्गत लय मात्र निश्चितच आहे. या मुक्त कवितेतही ही आतंरिक लय जाणवेल. अगदी सहजपणे नकळताच या लयीमुळे संपूर्ण कवितेलाच एक कलात्मक घाट लाभला आहे असे आज जाणवते. पहिल्या ओळीची शेवटी आलेली द्विरुक्तीही एक सवय, चूप म्हणून येत नाही. अपरिहार्य होऊन येते.

छोट्या वर्तुळातल्या जाणत्या रसिकांची दाद या कवितेला मिळाली असली तरी कविसंमेलनाच्या मोठ्या मैफिलीमध्ये मी ही कविता सहसा वाचली नाही. कविसंमेलनाच्या मोठ्या कार्यक्रमातून दाद मिळवणाऱ्या कवितांची जात या कवितेपेक्षा वेगळी आहे हे मी जाणते. 'वाहवा' मिळवणाऱ्या कवितांचा दर्जा निकृष्टच असतो असेही नाही. पण सर्वसामान्य श्रोत्यांना तत्काळ स्पर्श करू शकेल, उत्तेजित करू शकेल असे काहीतरी त्या कवितेत असावेच लागते. या कवितेची प्रकृती तशी नाही. ती वाचकाला अंतर्मुख आणि गंभीर करेल पण तिचा ठसा तत्काळ त्याच्या मनावर उमटणार नाही. म्हणूनही ती कविसंमेलनात वाचण्याचे माझ्या मनात कधी आले नाही. ही कविता लिहिली गेली १७-११-१९७१ रोजी आणि 'सत्यकथे'मधून ती प्रसिद्ध झाली ७२च्या सप्टेंबर महिन्यामध्ये. त्यानंतर डिसेंबर १९७९ मध्ये मौज प्रकाशनातर्फे प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'कॅक्टसफ्लॉवर' या संग्रहामध्ये ती समाविष्ट झाली. ही कविता 'सत्यकथे'मध्ये प्रसिद्ध झाल्यानंतर एका अगदी अपरिचित व्यक्तीकडून तिला जी दाद मिळाली ती नेहमीसाठीच माझ्या स्मरणात राहिली आहे. श्री. अशोक नायगावकर यांनी १८-९-७२ या दिवशी रात्री ११ वाजता लिहिलेले या कवितेविषयीचे एक पत्र कसे कोण जाणे, पण माझ्या संग्रही अजूनही आहे. ते सर्वस्वी या कवितेविषयीचेच आहे. श्री. अशोक नायगावकर स्वतः एक कवी आणि काव्यप्रेमी आस्वादक. (माझी त्यांची भेट, ओळख मात्र झालेली नाही) या कवितेच्या आकृतिबंधाची मार्मिक चर्चा आकृती काढून त्यांनी या पत्रात केली आहे. ही कविता आपल्याला व आपल्या मित्रांना कशी भिडली यासंबंधीचे त्यांचेच उद्‌गार उद्‌धृत केलेले बरे. ते या पत्रात म्हणतात, "सत्यकथेच्या' अंकातील 'निद्रेची अफीम जीवावर चढते आहे.' ही कविता खूपच आवडली. कवितेची ओळ ज्या वेळी मनावर सतत ठाम मांडून बसते त्या वेळी त्या कवितेचा घाट कसा आहे याचा शोध घ्यावासा वाटतो.' हा शोध त्यांनी सविस्तर घेतला आहे. नंतर ते म्हणतात, 'निद्रेची अफीम जीवावर चढते आहे.' ही ओळ सबंध कवितेवर सतत पसरत राहते आणि कविता काबीज करते. अंक हाती आल्यापासून तुमच्या या कवितेने मला ग्रासून टाकले आहे. गेले दोन आठवडे मी याच कवितेत आहे. अनुभवाचे एक सुरेख प्रसरण मला या कवितेत जाणवले. स्मरणात 'असणाऱ्या अनेक कवितांमध्ये मला ही कविता लक्षणीय वाटली. एक औचित्यपूर्ण आकृतिबंध तुम्ही दिलात म्हणून Congrats. कविता आभाळावर लिहिल्यासारखी झाली आहे. तुमचे कौतुक किती करावे ? नियती, मानवी अस्तित्व आणि काल यांचे धूसर आणि भयसूचक चक्र या कवितेत आहे. यातली मानवी मनाची अगतिक अवस्था निद्रेची अफीम मुळे स्पष्ट होते. इकडे मुंबईत सर्वांना तुमची ही कविता आवडली. स्वतंत्र कलाकृतीचे यश हेच. असो. निद्रेची अफीम



अनुक्रमणिका







जीवावर चढते आहे ! कळावे लोभ असावा. आपला– अशोक नायगांवकर.'

अशा प्रतिसादाविषयी काय म्हणावे ! खरे तर अशी कविता होते तेव्हाच जे मिळायचे ते मिळून गेलेले असते. सुजाण रसिकाच्या अशा उत्कट व समंजस प्रतिक्रियेनंतर जे मिळालेले असते तेच शतगुणित होते. कवितेने याहून अधिक काय द्यावे ?

**निद्रेची अफीम**

*निद्रेची अफीम जीवावर चढते आहे.*
*जडशीळ झालेल्या पापण्यांच्या पखाली उचलता उचलत नाहीत.*
*पिसादून उडणारी जाणिवेची नाडीही अर्धमेल्या ग्लानीत*
*पेंगुळली आहे.*
*अजगरासमोर खिळलेल्या भक्ष्यासारखे*
*डोळे सताड उघडे राहिले*
*वेदनेच्या पोटात जाताना–*
*हाडांचा चुराडा होतानाही ती हाडे आपलीच आहेत*
*हेही क्षणभर समजलेच नाही.*
*कालच्या खारट अश्रूंत*
*आजच्या सुखाचे गोडे पाणी मिसळते आहे*
*आणि*
*उद्याच्या स्वप्नांचे मचूळ रक्त क्षितिजावर*
*अजून सांडलेले नाही–*
*निद्रेची अफीम जीवावर चढते आहे.*

(अनुराधा पोतदार, पोतदार हॉस्पिटल, गणेशवाडी, पुणे ४.)



अनुक्रमणिका

# पाणकळा

डॉ. सरोजिनी बाबर

श्रावण मागं सरला न भादवा निघाला की, झिरमिरत्या पावसात थोडंफार का होईना भटकून यावं अशी मला लहानपणापासूनची सवय. त्यातून वडिलांच्याबरोबर कधीमधी याच दिवसात महाबळेश्वरला नाहीतर पन्हाळ्याला जाणं झालं की, तिथल्या झिरमिरीला अंगावर झेलीत इकडून तिकडं करताना माझी ब्रह्मानंदी टाळी लागायची. वाटायचं की, आपल्यासारखे श्रीमंत आपणच. तशी वारं प्याल्यागत मी धावायला लागायची न् मग ओठांवर आठवणीतली गीतगंगा अशा थाटात खेळायची की, काय सांगू ? फार मजा वाटायची न् जीव एकदम खुशालीत यायचा.

आमच्या घरच्या शेतातून देखील मग मी कधीमधी असल्या पावसात खूप फिरून यायची. मग घरात कुणी रागावलं तरी पर्वा वाटायची नाही की, आपण उगाच भिजलो अशी खंतही मनात डोकावायची नाही.

असली भिजवणारी भटकंती जशी काय माझ्या अंगवळणीच पडलीय म्हणावी अशा थाटात एक दिवस मी खंड्याळ्याच्या घाटात बराच वेळ गाडी थांबली काही कारणानं– म्हणताना खाली उतरून इकडून तिकडं फिरणं सुरू केलेलं–

आमचा हा प्रवास डेक्कनक्वीन मधला. पुण्याहून मुंबईला निघालेल्या रेल्वेतला. तशी फिरता फिरता अवचितच गार वाऱ्याच्या झोतावर वहातेल्या धुक्याची, ढगांची अंगाभोवती शाल आली तशी एकदम माझे ओठ हालले. गळा सजला न् त्या आजूबाजूच्या सुंदर निसर्गाच्या सहवासात माझी कविता मलाही नकळत सजून गेली_ म्हणताना बिगीबिगीनं गाडीत चढून मी आपल्या जागेवर जाऊन बसले न् पर्समधला कागद काढून घेतला. पेनचं टोपण उघडलं न् एखादं पत्र भराभरा लिहावं तशी गुणगुणत टिपत गेले_

*झिरमिरत्या पावसाचा छंद मला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*ढगांच्या सावलीतली डोंगरजाई*
*घुसळण घालताना लवतेय लई*
*डामडौल तिनं असा दावला मला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*पिंजारल्या कापसाचं झोकात चालणं*

*डोंगराच्या कुशीतून थाटात येणं*
*घोळामधी त्यानं आपल्या घेरली मला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*सुटलेल्या चौकोनी वाऱ्यामधी*
*भिंग भिंग वाजवलं कोणी कधी*
*चालताना वेग त्यानं दिला मला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*टेकतेल्या आभाळानं रंग फेकला*
*बसलाय घडवीत नाना कळा*
*रंगारी कोण असा आला खुळा*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*शिडकावा देताना तोंडावरी*
*एका मागं एक आल्या धावत्या सरी*
*ओलेती अशी त्यांनी केली मला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*टपोऱ्या मोत्यातलं दवाचं रान*
*भुरूभरू कसं हे डोलतंय छान*
*पायाखाली येत त्यानं भुलवली मला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*
*एकेका नवलाची ग पाणकळा*
*खुलविते दाविते शिणगार भला*
*पलाणी पाट त्यातच घोटाळला*
*काय सांगू गंमत त्यातली तुला*

बघता बघता कविता पुरी झाली न् मग मी तिला एका वेगळ्या ढंगातला आपोआपच येत गेलेला स्वरसाज चढवीत बसल्याजागीच अशी गात गेले की, गाडी कधी सुरू झाली ते कळलंच नाही ! झालंच तर गाडीतल्या अवतीभोवतीच्या प्रवाशांनीही त्या वेळी अशी दाद दिली की, त्यातलं पण काही मला उमगलंच नाही–

मला आपलं भान हरपून टाकायला लावलेली ही माझी कविता मला फार आवडते. तिला मिळालेले स्वरही इतके झक्कास की, बोलायचं काम नाही

लोकगीतांचा मला विलोभनीय छंद. त्यामुळे या कवितेची भाषा त्याच वळणावर गेलेली न् स्वरविलासानंही त्यातलाच ढंग उचलेला ना ?

पुण्याच्या साहित्य परिषदेच्या हीरक महोत्सवाच्या वेळी बालगंधर्व रंगमंदिरात भरलेल्या

सभेत साहित्यिकांची इंद्रसभा, चंद्रसभा बसलेली. प्रमुख पाहुणे म्हणून ना. यशवंतराव चव्हाण आलेले. रसिकांनी रंगमंदिर भरून गेलेलं.

तर त्या वेळी मीही कविता अशा झोकात म्हणून दाखविली की, उभ्या रंगमंदिरानं डोक्यावर घेत न् प्रचंड दाद देत मला पार म्हणजे पारच गुदमरून सोडलं ना हो !

मी गातेल्या ढंगातली लय सगळ्या प्रेक्षकांनी टाळी देत साधलेली भली न् त्या तालाला पकडीत मी पण गातेली भली अशी गंमत ! कायमची लक्षात राहावी अशी !

तर सांगायचं म्हणजे आकाशवाणीवरून लोकगीतं गाताना मला ऐकलेल्यांची अशी समजूत झाली की, मी जणू लोकगीतच गातेय त्या वेळी ! खरं ना ?, विचारा कुणाला पण न् घ्या खरं खोटं पारखून !

(डॉ. सरोजिनी बाब्रर, २०९५, सदाशिव पेठ, विजयानगर कॉलनी, पुणे ३०.)

---

# हायकू

शिरीष पै

---

तुमची सर्वांत प्रिय कविता कोणती ?

आतापर्यंत मी असंख्य कविता लिहिल्या. गेली चाळीस वर्षं मी सतत कविता लिहीत आहे. कधी कधी काव्यलेखनात खंड पडलाही असेल. न जमलेल्या, न आवडलेल्या माझ्या कविता मी फाडूनही टाकल्या असतील. खरं सांगायचं तर त्या सर्वच कविता मला प्रिय आहेत. त्यातली एकच कशी निवडू ? काही कवितांच्या बाबतीत तर माझी मनःस्थिती अशी आहे की, एका विशिष्ट कालखंडात लिहिलेल्या त्या कवितांचा सगळा संग्रहच मला प्रिय आहे. तरीपण आता निवड करायचीच तर मी त्यातल्या त्यात माझ्या हायकूंची करीन आणि त्यातला एक हायकू तर मी विशेषच आग्रहानं निवडीन. तो पुढीलप्रमाणे—

*'नको रे धरूस चिमटीत*
*फुलपाखराचं नाजुक अंग*
*दुखतोय पंखावरला रंग'*

ही कविता कधी लिहिली ? वर्ष, मासिक, संग्रह.

१९७५ च्या डिसेंबर महिन्यात मी हा हायकू लिहिला. हा कुठल्याही मासिकातून प्रथम प्रसिद्ध झाला नाही तर माझ्या 'धुवा' ह्या पहिल्या हायकूसंग्रहातूनच १९७९ साली तो प्रथम प्रकाशात आला.



अनुक्रमणिका







या कवितेची पार्श्वभूमी, प्रेरणा, त्या वेळचे वातावरण.

मी हायकू लिहायला सुरुवात केली त्याच्या पाठीमागे थोडासा इतिहास आहे. मला वाटते बहुधा १९६३ साल असावे ते. त्या वेळी माझ्या हातात मूळ जपानी हायकूंचा इंग्रजी अनुवाद केलेल्या हायकूंचा एक सुंदरसा संग्रह पडला सुप्रसिद्ध लेखक विजय तेंडुलकर ह्यांनी तो मला वाचावयाला दिला. त्याचबरोबर त्यांनी मला जपानी संस्कृतीविषयीचं आणखीही एक पुस्तक दिलं. ती दोन्ही पुस्तकं वाचून मी विलक्षण भारावून गेले. विशेषतः जपानी हायकूंनी तर मला वेड लावलं. वाटलं, अशी कविता आपल्याला लिहायला यायला हवी मला अल्पाक्षरी कवितेची पहिल्यापासून आवड होती. पूर्वी मी कणिका लिहिल्याही होत्या. रुबाया हा माझा आवडता काव्यप्रकार. काही उर्दु शेरही मी वाचलेले होते. पण हायकू हा काव्यप्रकार ह्या सर्व काव्यप्रकारांपेक्षा काही निराळाच, माझ्या भावप्रवृत्तींना अधिक जवळचा वाटला. त्याचे प्रमुख कारण म्हणजे जपानी हायकूकारांना वाटत असलेले निसर्गाचे आकर्षण, जे माझ्या रक्तात होते. म्हणूनच मला हायकूचे आकर्षण वाटलं, तो लिहावासा वाटला. पण हायकूच्या सोपेपणामुळे वाचक फसतो. त्याला वाटतं की साधंच तर वर्णन आहे हे ! ह्यात काय विशेष ? हायकू अगदी साधा, सोपा, सहज असतो आणि म्हणूनच लिहावयाला फार अवघड असतो. मला हायकू सहज जमेल असं वाटलं. पण प्रयत्न करूनही तो जमला नाही. सतत बारा वर्षं मला हायकू लिहिता यावा म्हणून मी तळमळले. पण मला तेव्हा हे माहीत नव्हते की हायकू लिहिण्याआधी हायकूवृत्ती जागी व्हावी लागते, हायकू क्षण ओळखता यावा लागतो.

१९७५ सालच्या डिसेंबर महिन्यात अचानक 'मराठा'त संप झाल्याने मी घरीच बसले होते. मन फार विषण्ण होते. एकदम सारं काम बंद झाल्यानं सुन्न अंतःकरणानं सारखी माझ्या खोलीच्या खिडकीपाशी बसून असायची. एकटीच विचार करीत. त्या वेळी एक चमत्कार झाला. माझ्या खिडकीतून बाहेरचा निसर्ग बघता बघता माझ्या वृत्तीत एकदम बदल झाला. बाहेरचं सगळं जग मला अर्थपूर्ण वाटू लागलं. निसर्गात घडणाऱ्या साध्या साध्या घटनातही मला मोठं नाट्य लपलेलं दिसू लागलं. माझं रिकामं पडलेलं मन एकदम समोरच्या सृष्टीशी समरस झालं आणि तिथं घडणाऱ्या घटनांतून मला वेगळीच अर्थप्रतीती येऊ लागली. माझ्या आयुष्यात घडणाऱ्या घटनांपेक्षा मला समोरच्या सृष्टीतील घटना अधिक महत्त्वाच्या वाटू लागल्या कारण त्या प्रत्येक घटनेत कुठं तरी माझ्या अनुभूतीचं प्रतिबिंब पडलेलं होतंच की. उदाहरणार्थ. एखादा कावळा व्याकुळ होऊन कावकाव करायचा आणि त्याच्या त्या व्याकुळपणात मला माझी व्याकुळ मनःस्थिती दिसायची. मग हायकू सुचायचा—

*केव्हापासून करतोय काव काव*
*खिडकीवरला एकाकी कावळा*
*इतका भरून येतो त्याचाही गळा ?*

फुलपाखरावरचा वर उल्लेखिलेला हायकूही एका अतीव सुंदर फुलपाखराला बघूनच सुचला. माझ्या बागेत ते फुलपाखरू आलं होतं. रंगीबेरंगी पंखांचं. एका झाडावर ते क्षणभर

विसावलं आणि पंखांची उघडमीट करीत राहिलं. पूर्वी खंडाळ्याच्या रानात मी फार सुंदर सुंदर फुलपाखरं पाहिलेली होती. एक दोनदा तर मी फुलपाखरांना पकडण्याचा प्रयत्नही केला होता. हाती लागलेलं एक फुलपाखरू दया वाटून सोडूनही दिलं. त्या वेळी त्या फुलपाखराच्या पंखांवरचा रंग माझ्या हाताला लागला होता. फुलपाखराच्या पंखावरचा रंग इतका दाट पण इतका हलकाफुलका असतो की त्याचे कण त्यांना नुसता ओझरता स्पर्श झाला तरी विखरून जातील. माझ्या बागेत आलेलं ते सुंदर फुलपाखरू पाहून माझं काळीज गलबलून गेलं. वाटलं, कुणीतरी त्याला पकडलं, बोटांनी त्यांचे पंख दाबून धरले तर_ किती दुखावले जातील त्याचे पंख_ पंखच नाही तर त्या वरला रंग, इतका दाट आहे तो ! हे रंगीबेरंगी फुलपाखरू म्हणजे कवितेनं काठोकाठ भरून ओसंडणारं कवीचं मन ? की गाढ प्रीतीनं हळुवार झालेलं प्रेयसीचं हृदय ? त्याला कुणी त्याला कुणी धक्का लावू नये, माझ्या आत आत कुणी तरी आक्रंदू लागलं आणि हा हायकू सुचला–

> *'नको रे धरूस चिमटीत*
> *फुलपाखरांचं नाजुक अंग*
> *दुखतोय पंखावरला रंग'*

: तिच्या निर्मितीच्या वेळचे, अनुभवाचे वेगळेपण

: फुलपाखराचा हायकू मी लिहिला ते दिवस माझ्या आयुष्यातले हायकूंचे दिवस होते. म्हणजेच कवितेचे दिवस होते. अशा दिवसांची कवीला फार प्रतीक्षा करावी लागते. आणि हेही तितकंच खरं की, अशा दिवसांत कविता मुद्दाम करावी लागतच नाही. ती आपणहून आपल्या शक्तिनिशी प्रगट होते. एखादा चमत्कार घडावा, तशी साक्षात्कारी सामर्थ्यानं त्या वेळी कविता प्रगट होते. आणि मग ती काही केल्या थांबत नाही. मग सारं जगणं, सारं अनुभवणं, सारा श्वासोच्छवास काव्यात्म होऊन जातो. कशातून, कशीही कविता प्रगट होते आणि सारखी प्रगट होत राहते. फुलपाखराचा हायकू लिहिला तेव्हा हायकू असेच वेगानं एकामागून एक सुचत होते. फुलं, फुलपाखरं, पाखरं, झाडं, आकाश, समुद्र, सृष्टीतील प्रत्येक वस्तू मला अर्थपूर्ण असं काही सुचवीत होती. आणि मुख्य म्हणजे त्या अनुभूतीचं त्वरित हायकूत रूपांतर होत होतं. आपलं मन जागृत असतं तेव्हा ते आपल्या अनुभवातला अर्थ सतत लावीतच असतं. पण म्हणून काही त्यातून कविता निर्माण होत नाही. कविता निर्माण होण्यासाठी मन प्रेमानं खूप दाटून आलेलं असावं लागतं. निदान माझ्या बाबतीत तरी हे सत्य आहे. प्रेमानं तुडुंब भरलेलं मन सारखं वाट पाहत असतं. काहीतरी सुंदर घडेल ह्याची. आणि ती प्रतीक्षेची अवस्था काव्यनिर्मितीला फार उपकारक ठरते.

: लिहिण्याची प्रक्रिया. एका बैठकीत पूर्ण की दीर्घकाळ लागला ? तिच्यावर संस्कार केले का ?

: हा हायकू मला जसा सुचला तसाच जवळजवळ लिहिला गेला. 'नको रे धरूस चिमटीत फुलपाखराचं नाजुक अंग' ही ओळ एकदम स्फुरली. अगदी सहजपणे. पुढची जी ओळ आहे,

'दुखतोय पंखावरला रंग' ती मात्र जराशी जुळवावी लागली. पण जराशीच. त्या साठी फार धडपड करावी लागली नाही. हायकू हा उत्स्फूर्त उद्‌गारासारखा यावा लागतो आणि तो तसाच येतो. पण हायकूलाही त्याचे एक तंत्र आहे. मूळ जपानी भाषेत तो तीन ओळींचा असला तरी त्याला उच्चारांप्रमाणे मात्रांचं, अक्षरांचं बंधन आहे. पहिल्या आणि तिसऱ्या किंवा दुसऱ्या आणि तिसऱ्या ओळीत यमक असावं लागतं. हायकूला पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असतो. पूर्वार्धात जो अनुभव व्यक्त केलेला असतो त्याला उत्तरार्धात अकस्मात एक कलाटणी मिळालेली असते. शुद्ध हायकू हा निसर्गाशी संबंधित असतो. हायकूच्या तंत्राबद्दलचा हा सर्व विचार मी हायकू लिहिण्यापूर्वी केलेला होता. आणि त्या अभ्यासावर आधारूनच मी माझ्या पद्धतीनं मराठी हायकू लिहिला. माझा हायकू हा बहुधा निसर्गात घडलेली नाट्यपूर्ण घटना बघताच स्फुरतो. नंतर त्याच्यावर थोडेफार संस्कार करावेच लागतात. म्हणजे अचूक तीन ओळीत तो उद्‌गार बसवणे, दुसऱ्या-तिसऱ्या किंवा पहिल्या-तिसऱ्या ओळीत यमक साधणे, अत्यंत थोड्या शब्दात शुद्ध चित्र उभे करणे इत्यादी. कधी कधी हे चटकन जमते तर कधी कधी अवघ्या तीन ओळींसाठी आठवडाही खर्ची घालावा लागतो.

: विशिष्ट वृत्त, छंद, शैली, शब्द हे निर्मितीप्रक्रियेत सहजपणे आले की त्यामागे काही चिंतन वा प्रयत्न होते ?

: हायकूबद्दल असं निश्चितपणे सांगता येईल की हायकूअनुभव हा अगदी उत्स्फूर्तपणे आपल्या सहजोद्‌गारासारखा प्रगट होतो. त्या साठी फार जुळवाजुळव करावी लागत नाही. मराठी हायकूला वृत्त, छंद ह्यांचं बंधन नसतं. जपानी भाषा मला येत नसल्यानं जपानी हायकूबद्दल मला काही सांगता येणार नाही. पण मी हायकू वाचला तो इंग्रजी भाषेतून मूळ जपानी हायकूचा आलेला अनुवाद. तो मला रुचला आणि म्हणूनच मी माझा हायकू त्याप्रमाणे वसवला. इंग्रजी हायकूचं तंत्र अवलंबून मी त्याला छंदोबद्ध न करता उद्‌गारासारखा तो मुक्तच ठेवला. तरी पण तो उच्चारीत असताना सहजपणे त्यानं एक लय, एक ताल असावा, यमक साधलं जावं असा प्रयत्न जरूर केला. हायकू हे एक शब्दांतून उभं केलेलं रेखाचित्र असतं. त्याला उपमा, रूपक इत्यादी अलंकार वर्ज्य असतात. हायकू म्हणजे प्रतीक नव्हे की प्रतिमा नव्हे. जे जसं घडलं ते तसं सहज सांगणं. पण शब्द फार मोजून, जपून, तोलून वापरावे लागतात. उदाहरणार्थ आपण एक इंग्रजी हायकू पाहू. बुसन ह्या सुप्रसिद्ध हायकूकाराच्या मूळ जपानी हायकूचा हा अनुवाद आहे.

*A Camelia-flower*
*As it drops, spills the Water*
*From the yester shower.*

हा हायकू तीन ओळींचा आहे. पहिल्या नि तिसऱ्या ओळीत यमक आहे, हे एक शुद्ध निसर्ग चित्र आहे ते एक सहजोद्‌गारात उभं केलं आहे.

ह्या हायकूचा मराठी अनुवाद मी पुढीलप्रमाणे केला होता—

*'कॅमेलियाचं फूल गळून पडतं*
*तेव्हा कालच्या पावसाचं पाणी*
*त्यातून घरंगळतं'*

जसे हायकूतील शब्द तशीच हायकूची शैलीही आपल्या सहज बोलण्यातलीच असावी हे मी आधीच सांगितले. जपानी कवींच्या दृष्टीनं हायकू हा काव्यप्रकारच असा आहे की तो आपल्या साध्या बोलीला अर्थपूर्ण करतो. हायकूच्या सोपेपणालाच लोक फसतात. मुख्यतः टीकाकार. त्यांना वाटतं की ह्यात काय विशेष ? पण हायकूच्या सोपेपणातच त्याची थोरवी आहे. एका सरळ, सहज, साध्या, सोप्या हायकूची मूळं आपल्या जगण्यात किती खोल पोचलेली असतात हे वरवर हायकू वाचणाराला कळत नाही. ज्याचं मन अतिशय संवेदनाक्षम असतं त्यालाच हायकूमधली खोली उमगते. हायकू लिहिताना मी तो सरळ, साधा, सहज आणि सोपा असावा आणि तरीही त्यात गहन अर्थ जाणकाराला सापडावा ह्यासाठी फार यत्न केले. ह्याकरिता मी फार अंतर्मुख झाले. एकटी एकटी झाले. संपूर्णतया हायकूवृत्तीतच मग्न होऊन जगले. हायकूत मुळीच मुळीच अलंकरण येऊ नये ह्यासाठी फार प्रयत्न केले. कल्पनांचे मोह पूर्ण टाळून मी समग्रतेनं वास्तव पातळीवरच उभी राहिले आणि म्हणूनच–

*'नको रे धरूस चिमटीत फुलपाखराचं नाजुक अंग,*
*दुखतोय पंखावरला रंग' असा हायकू लिहू शकले.*

: तिचे जे स्वागत रसिक, टीकाकार इत्यादींनी केले त्याबद्दलचे आपले अनुभव.

: माझे हायकू जेव्हा प्रसिद्ध झाले तेव्हा वाचकांनी त्यांचे स्वागत उत्स्फूर्तपणे केले. माझ्या हायकूंना मुख्य प्रसिद्धी 'मुंबई दूरदर्शन' वरील कार्यक्रमामुळे मिळाली. त्यानंतर सत्यकथा, लोकप्रभा ह्यांनी हायकूंना प्रसिद्धी देण्याचे महत्त्वाचे कार्य केले. लोकप्रभेनं तर हायकू विशेषांकच काढला. पण मला हायकूंच्या लोकप्रियतेची पहिली साक्ष पटली ती मी हायकूंच्या केलेल्या पहिल्या जाहीर वाचनाच्या वेळी. मला कल्पना नव्हती की हायकू वाचताक्षणीच श्रोत्यांच्या मनाला तो इतका भिडेल म्हणून. ज्या ज्या वेळी कविसंमेलनात मी हायकूंचं वाचन करते त्या त्या वेळी माझे हायकू, विशेषतः फुलपाखराचा हायकू तर हमखासच श्रोत्यांना आवडतो. एकदा तर मला एक विलक्षण अनुभव आला. एका कॉलेजच्या उत्सवात एकदा एक कविसंमेलन आयोजिलं होतं. माझ्या आधी मोठे मोठे कवी कविता वाचून गेले. त्यांच्या कविता ते वाचीत असताना श्रोते खूपच दाद देत होते. हसत होते. मधूनच काही वाक्यं बोलत होते, टाळ्या देत होते. ह्या सर्व गदारोळात मी जेव्हा कविता वाचायला उठले तेव्हा बरीच घाबरले होते. भीतभीतच मी हळुवार हायकू वाचायला सुरुवात केली तोच सभागृहात टाचणी पडली तरी ऐकू यावी इतकी असीम शांतता पसरली. माझे सर्व हायकू त्या दंगा करण्यात रंगलेल्या कॉलेजयुवकांनी शांतपणे ऐकून घेतले आणि सगळ्यात शेवटी फुलपाखराचा हायकू मी वाचला तेव्हा त्याला 'अहाहा' ची उत्स्फूर्त दाद सगळ्या बाजूंनी आली.












: सर्वात हीच कविता का प्रिय याचे आपल्या परीने स्पष्टीकरण.

: तसे माझे सर्व हायकू मला प्रिय आहेत. पण फुलपाखराचा हायकू मला फार प्रिय आहे. कारण माझे वेगवेगळे हायकू वेगवेगळ्या श्रोत्यांना वेगवेगळ्या प्रकारे आवडतात. सगळेच हायकू सगळ्या श्रोत्यांवर सारखाच परिणाम करीत नाहीत. पण फुलपाखराचा हायकू ह्याला अपवाद आहे. तो रंगला नाही असा प्रसंगच नाही. शाळेतले वा कॉलेजमधले विद्यार्थी असू देत, महिला मंडळातल्या साध्या गृहिणी असू देत वा साहित्यसंमेलनाचे जाणकार रसिक श्रोते असू देत, तो टाळ्या मिळवून जातोच. कारण तो खरंच मी फार मनापासून लिहिलेला आहे. जगातील सुंदरतेवर सदैव लुब्ध असलेल्या माझ्या कविमनाची साक्ष देणारा हा हायकू आहे.

(शिरीष पै, प्रेमशोभा, केळुसकर मार्ग उत्तर, शिवाजी पार्क, मुंबई २८)

# आषाढी ग झाल्यावरी

योगिनी जोगळेकर

जवळ जवळ दोन तपापूर्वीची गोष्ट आहे. अनंत चतुर्दशीच्या आदल्या दिवशी माझे बार्शीला गणेशोत्सवात गाणे होते. सुलाख्यांकडे उतरले होते. उषाताई सुलाखे कवयित्री; त्यामुळे काव्यशास्त्रविनोदाला उधाण आले होते. अनंत चतुर्दशीला राहण्याचा आग्रह झाला पण मी विनम्रपणे नकार दिला. कारण तीर्थरूप आई बार्शीच्या भगवानाचे दर्शन घेण्यासाठी माझ्याबरोबर आली होती. प्रापंचिक ओढीमुळे तिला परतायचे होते.

सुलाख्यांच्या टांग्यातून स्थानकावर आले तो सुप्रसिद्ध बार्शीलाईट रेल्वे निघून गेली होती. टांगेवाला म्हणाला,

"गाडी चुकली तर बाईंनी माघारी बोलावलं आहे."

लक्षात आले, गाडी चुकविण्याच्या त्यांच्या कटात टांगेवालाही सामील होता. मी संभ्रमित झाले. तोच स्टेशनसमोर 'बार्शी-पंढरपूर' एस. टी. येऊन थडकली. आळंदीची महिन्याची वारी करणारी आई म्हणाली,

"योगिनी, पंढरपूरला जायचं का ? अजून तुझं घडलेलं नाही."

मी लगेच होकार दिला. उषाताईंना निरोपून आम्ही झटकन पंढरपूरच्या एस. टी. त बसलो.

माझ्या आईचा अध्यात्मिक अधिकार मोठा होता. तिच्या कानावरून वर्षानुवर्षे साखरेमहाराजांच्या मठात गीता आणि ज्ञानेश्वरी गेली होती. नानामहाराज साखरे आणि बाबा सरदेशमुख ह्यांच्या ह्या शिष्येने मला बी. ए. ला संस्कृतमध्ये गीता होती त्यातले कितीतरी कूट प्रश्न सोडवून दाखवले होते. दाखले देऊन शिकविले होते.

अशा सात्विक, भाविक, डोळस आईबरोबर पंढरपूरची वारी म्हणजे मला अमृतानुभवच वाटला !

आईने पंढरपूरला उतरताना कानमंत्र दिला—

"योगिनी, पंढरपूरला उतरताना तू वारकऱ्याचे डोळे लावून चल. तरच तुला पंढरपूर उमगेल. नाहीतर दगड काय नि विठोबा काय सारखेच !"

भारावलेल्या मनःस्थितीतच उतरले. उतरल्या उतरल्या आईप्रमाणेच पायतळीची माती भाळी लावली. समोर एकतारीवर कुणी वारकरी अभंग गात होता. आपल्याच तंद्रीत डोळे मिटून ! त्या भक्तीच्या फुंकरीने माझे काव्यकमल एक एक पाकळीने उमलू लागले_

*'आषाढी ग झाल्यावरी*
*जाता पंढरीच्या वाटे*
*दिंडी माजी सांडलेला*
*आर्त अभंग तो भेटे_*

रस्त्याला लागलो तो वाट गुलालबुक्क्यांनी न्हालेली. लगेच पुढची पाकळी उमलली—

*'आषाढी ग झाल्यावरी*
*काय डौल पंढरीचा !*
*वेड्या वाकड्या वाटेला*
*शेला गुलाल-बुक्क्याचा_*

रस्त्याच्या दोन्ही अंगाला हिरवळ दाटली होती. तशी माझी प्रतिभा म्हणाली,

*'आषाढी ग झाल्यावरी*
*फुटे वाळूत हिरवळ*
*तिथे लोळले घोळले*
*कथा कीर्तनाचे जळ_'*

चरण प्रक्षालनासाठी चंद्रभागेवर आलो. तशी आई म्हणते कशी—

"वर्षा ऋतुने नदी फुगलीय ना ?"

मी तंद्रीत उत्तरले,

*"आषाढी ग झाल्यावरी*
*चंद्रभागा धुंद फुंद*
*मेघ भक्तीचे वोळले*
*त्यांचा स्मरुनी आनंद_"*

तोच कुठेतरी तुळशीच्या सुकलेल्या माळा विखुरलेल्या दिसल्या. तसे ओठी आले—

*"आषाढी ग झाल्यावरी*
*माळा तुळशीच्या हिंपुटी !*

*'नाही' म्हणती 'ललाटी'*
*विठ्ठलाची गळाभेटी !"*

पुढे देवळाशी प्रसादाच्या दुकानांशी आलो तर पायाशी मुंग्यांची भलीमोठी रांग. आई म्हणाली, "जपून ग पोरी. खाली मुंग्या आहेत."

मी बेभान होऊन ओरडले, "आई, त्या मुंग्या नाहीत_"

"मग ?"

मी गुणगुणले,

*"आषाढी ग झाल्यावरी, रांगा मुंग्यांच्या भेटती,*
*गतजन्मी वारकरी, आज प्रसाद शोधती_*

गाभाऱ्याशी आलो तशी आई गदगदून म्हणाली,

"यात्रा परतल्याने देवळाचा परिसर कसा उदासवाणा वाटतोय नाही ? विठोबासुद्धा बघ कसा कसनुसा दिसतोय !"

गाभाऱ्यात शिरताना विठ्ठलाची पहिली वहिली नजरभेट घेणारी मी भक्तीत चिंब होऊन गाऊ लागले–

*आषाढी ग झाल्यावरी*
*जाता आज गाभाऱ्यात*
*एक हुंदका ऐकोनी*
*झाले चकित स्तंभित_*
*एका विठ्ठलावाचोनी*
*गाभाऱ्यात कोणी नसे*
*सखे जिवीचे जाताची–*
*देव आज वेडे पिसे_ ! ! !*

असा हा दिव्य साक्षात्कार_

*आषाढी ग झाल्यावरी*
*दिंडी माजी सांडलेला*
*आषाढी ग झाल्यावरी*
*वेड्या-वाकुड्या वाटेला*
*आषाढी ग झाल्यावरी*
*जिथे लोळले घोळले*
*आषाढी ग झाल्यावरी*
*मेघ भक्तीचे वोळले*
*आषाढी ग झाल्यावरी*

*जाता पंढरीच्या वाटे*
*आर्त अभंग तो भेटे_ !*
*काय डौल पंढरीचा*
*शेला गुलाल-बुक्क्याचा !_*
*फुटे वाळूत हिरवळ*
*कथा कीर्तनाचे जळ !_*
*चंद्रभागा धुंद फुंद*
*त्यांचा स्मरुनी आनंद*
*माळा तुळशीच्या हिंपुटी !*

*'नाही !' म्हणती 'ललाटी*
*विठ्ठलाची गळाभेटी ! !'*

*आषाढी ग झाल्यावरी*
*रांगा मुंग्यांच्या भेटती*

*गतजन्मी वारकरी*
*आज प्रसाद शोधती !*

*आषाढी ग झाल्यावरी*
*जाता आज गाभाऱ्यात*

*एक हुंदका ऐकोनी*
*झाले चकित ! स्तंभित*

*एका विठ्ठलावाचोनी*
*गाभाऱ्यात कोणी नसे*

*सखे जिवीचे जाताची*
*देव आज वेडे-पिसे ! ! !*

(योगिनी जोगळेकर, १२९२, सुभाषनगर, पुणे-२)

---

# मला विठ्ठल डसला

मधुकर केचे

---

*जेव्हा कळते संतांच्या*
*वेदनेचा वेद झाला*
*माझ्या जात्यातला जीव*
*पीठ होऊन हासला*
*आता वानवितो वण*
*जपतो मी जखमेला*
*ऐसी देहाची पुण्याई*
*मला विठ्ठल डसला.*

ही कविता ५५-५६ च्या सुमारास झाली. बहुधा छंद अथवा सत्यकथेमध्ये ती आली. 'दिंडी गेली पुढे' या संग्रहात ती घेतली.

बालपणापासून जीवनातल्या सर्वच क्षेत्रांमधला खोटेपणा जाणवत आला. अर्थव्यवहार, राजकारण इ. मध्ये हरामी चालायचीच. खरं म्हणजे मी बेचाळीस साली गाजलेल्या (चिमूर) आष्टीकडचा. निरागस निरक्षर लोकांनी देशाच्या नावानं आत्मबलिदान केलेलं मी पाहिलं आणि त्या पुण्याईचं भांडवल करणारे पुढारीही त्या कोवळ्या मनानं टिपले. हे सारं या साठी की, खोटेपणाची लागण केवढी ते कळावं. श्रद्धाळूंसोबत वयाच्या केवळ पंधराव्या वर्षी पंढरपूरला वऱ्हाडातून पायी गेलो. धर्माच्या नावानं चालणारा दंभ तेथेही भेटला. पण तो दंभ इतर म्हणजे परक्यांनी जोपासला त्याचं इतकं नव्हे. माझ्याही मनात, ज्यावर मी माझी सत्ता



अनुक्रमणिका






गाजवू शकतो त्या माझ्या स्वतःच्या मनातदेखील भक्तीचा खोटेपणा निदान अपुरेपणा असू शकतो याची जाणीव सलू लागली.

*योगायोगाने केवळ रडलो मी संतांसवे*
*अशी चुलत आसवे वरपांगी*

अशी खंत एका ठिकाणी मी व्यक्त करून गेलो. खऱ्या व्यथेने कण्हणारी, त्या दुःखाच्या सच्चेपणामुळे कण्हण्याचं समाधान मिळवणारी मीरा माझ्यासमोर होती. तिचा मी अक्षरशः हेवा करीत होतो. ओल्या व्यथेला साजेसा मार एक तरी घाव । वाहो माझाही गौरव फुटतःना अशी इच्छा मी बोलत असताना व्यथेची परंतु करू नये कीव । भाव तैसा घाव नशिबात असं म्हणण्याची पाळी आली.

कुठंतरी खरं दुःख प्रगट करणं हाच एक छंद होऊन बसला. तुकारामाची व्यथा रंगत असताना आपला जन्म का नाही झाला ? आता पक्वान्न वर्णनं सांगत त्या उष्ट्या पत्रावळी मी गोळा करतोय. का रे अशी थट्टा भुकेल्या जीवाची । भूक काय माझी भूक नोहे ?

आपली तळमळ अपुरी, उपरी आहे या जाणिवेतून कितीक ओळी झरत राहिल्या. मनासमोर संत कबीर होता. 'दो पाटन के बीच में साबत बचा न कोय' असं आक्रंदत जात्याच्या दोन् पाळ्यांकडे पाहणारा. तोच मग स्वामी विवेकानंद होऊन एकांतात हमसून हमसून रडताना व What man has made of man या ओळीच्या जखमा भोगताना दिसला.

*माझा जात्यातला जीव*
*पीठ होऊन हासला*

या ओळी आपसूक उतरल्या. आपण जर असं कबीराच्या कणवेइतकं भरडलो गेलो तर धन्य होऊ अशी आशा त्यात होती.

विवेकानंदानं एकांतात रडून जी व्यथामूर्ती उभी केली तिच्याही पेक्षा जास्त प्रभावी आकृती पवहारीबावा या व्यक्तीच्या चित्रणात उभारली. त्या बावांना साप चावला तर ते म्हणाले, 'माझा सखा चुंबून गेला !'.

मीरेचा विष प्याला, कबीराचं जातं याहूनही ही प्रतिमा प्रभावी होती. त्या अस्सल इजेची कास धरीतच ओळी आल्या–

*ऐसी देहाची पुण्याई*
*मला* विठ्ठल डसला

ही व अशा अभंगांची रचना मी करीत होतो तेव्हा मराठीत नववाङ्मय जरासा विसावा घेत होतं. मर्ढेकरांच्या भरघोस देण्यानंतर, पाडगांवकर, बापट, बोरकर, करंदीकर ही मंडळी ऐन बहरात होती. अशा वेळी कदाचित वेगळेपणा, रुचिपालट म्हणून या अभंगांचं कौतुक झालं असेल. खऱ्या व्यथेची तहान सांगणाऱ्या त्या रचनांची पु. य. देशपांडे, दिलीप चित्रे इ. नी पाठ थोपटली. आरती प्रभूंनी तर मौजेचं एक पान माझ्यावर लिहिलं. नसताना येथे तुझा मुळी भास



अनुक्रमणिका






. साच्याविना रस ओतू कोठे ? ही व्यथा तिच्यात होती.

विषयाचं वेगळेपण, अभंग हे तेव्हा कोणी हात न लावेलेलं वृत्त ! तेवढ्या कारणांनी माझ्याकडे रसिकांचं लक्ष वेधलंच; पण त्या रचनांमध्ये अभंग हे वृत्त न राहता वृत्ती झाल्याचा निर्वाळाही अनेक मित्रांनी दिला.

काही कौतुकं मात्र वरलिया अंगाची झाली. विठ्ठल डसणं ही कल्पना अर्थाऐवजी सौंदर्यच जास्त मिरवून गेली. आणि 'वेदनेचा वेद' ही तर सरळ सरळ शब्दांची खेळी ठरली. हा जरा कारागिरीचा भाग असेलही; पण ती कारागिरीही मुद्दाम करावी लागली नाही. 'सरण बुडवणे' चं 'विठ्ठल डसणे' झालं त्याच सहजपणानं वेदना आणि वेद यांचं नातं जुळलं.

लोकांना 'चुलत आसवे' ही कल्पना आवडली होती तसेच हे वेद आणि वेदना आवडले. दारव्हेकरांनी तर 'वेदनेचा वेद' या नावाचं एक नाटकच लिहून टाकलं. त्यात ही रचना म्हटली जाते.

मालवण संमेलनात ही रचना म्हटली तेव्हा बोरकरांनी मला मंचावर अक्षरशः उचलून घेतलं. शिरीषताईंनी आचार्य अत्र्यांसमोर उभं करून त्या ओळी म्हणायला लावल्या.

प्रा. नातूबाईंचं 'वेदनेचा वेध' हे पुस्तक पाहिलं. त्यांनी मला एम.ए. ला शिकवलं आहे. त्यांचं शीर्षक कुठंतरी 'वेदनेच्या वेदा'शी जवळीक करीत आहेसं वाटलं आणि धन्य झालो.

वेदना प्रगट करण्याचं काहीसं समाधान या कवितेनं मला दिलं म्हणून ती लाडकी.

(मधुकर केचे, राठीनगर, अमरावती ४४४६०३)

# पागल पीर सुटे

पंडित आवळीकर

एखाद्या कलावंताला त्याच्या कलाकृतींपैकी सर्वात अधिक प्रिय कलाकृती कोणती आहे हे विचारल्यावर हे सांगणे अवघड आहे आणि 'आपल्या अपत्यांपैकी एखादे सर्वात प्रिय म्हणून वेगळे काढण्याइतके गुंतागुंतीचे आहे' असे उत्तर देण्याची आपल्याकडे प्रथा आहे. कविता आणि कवी यांचा आजवर मानला गेलेला जन्यजनक संबंध वेगळ्या दृष्टींनी तपासून घेतला पाहिजे. जन्य आणि जनक यांचे 'द्वैत' फेडणारे 'अद्वैत' : 'जनक'च 'जीत' म्हणून अवतरणे असे या संबंधाचे स्वरूप आहे. कविता जन्मते तेव्हा कवी(च) पुन्हा जन्मत असतो : प्रत्येक कविता ही कवीचा एकेक पुनर्जन्मच होय. जी कविता केवळ त्याचा पुनर्जन्म नसते; तर त्याचा जास्तीत जास्त 'पूर्ण' जन्म असते : आपल्याकडे त्यालाच 'प्रत्यक्ष' करीत असते ती कविता स्वतः कवीला सर्वांत प्रिय वाटणे स्वाभाविक ठरावे. माझ्या सर्वांत प्रिय कवितेच्या



अनुक्रमणिका






जन्माची कथा ही म्हणूनच माझ्या जन्माची कथा आहे.

१९४३ मध्ये माझ्या वयाच्या बाराव्या वर्षी माझ्या वडिलांचा मृत्यू झाला आणि त्या दुःखातून माझ्या कवितेचा जन्म झाला. ४३-४८ या कालखंडात कोल्हापूरमधील ब्रँच राजाराम हायस्कूलचा विद्यार्थी असताना '(बालकवी) शांताग्रज' या नावानं (कुसुमाग्रजांचा हा 'नाम' महिमा) मी शे-दोनशे कविता लिहिल्या : त्या चोपड्या परवापरवापर्यंत होत्या ! गिरीश, ग. दि. माडगूळकर, (पुण्यात गेले असता) यशवंत, आचार्य भागवत यांनी त्या 'दृष्टीपूत'ही केल्या. माझ्या शाळकरी दिवसांत थोरले माडगूळकर कोल्हापुरात असायचे : 'रामजोशी' बाहेर येण्यापूर्वीचा तो काळ. 'काय कविराज ?' म्हणून प्रेमाने प्रोत्साहन द्यायचे. माझ्या आत्यांचे पती रं. कृ. चिंचलीकर सुट्टीत आवळीला येत तेव्हा आमच्या चोपड्यांना गाथांचे महत्त्व यायचे. १९४८ मध्ये मी राजाराम कॉलेजमध्ये गेलो. तेव्हा माधवराव पटवर्धन देहाने कॉलेजमध्ये नव्हते : पण माझ्यासारख्याला अजून मनाने ते तेथे वावरत आहेत असे वाटायचे. त्यांचे श्वासोच्छवासच त्यांच्या कवितांच्या रूपाने आम्हाला धीर द्यायचे. पुढे मनमोहन, बोरकर यांचा सहवास, लोभ लाभला, कवितेवर त्यांचे खोल संस्कार झाले.

४३-९० या चार तपांमध्ये बरी-वाईट कविता लिहिली. 'स्वप्नवन्ती' (५२) 'दीपराग' (५३) 'प्रणयिनी' (६६) आणि 'श्रेयसी' (७८) हे कवितासंग्रह 'मुद्रित' झाले. खऱ्या अर्थाने 'प्रकाशित' झाले नाहीत : 'प्रसिद्ध' तर झालेच नाहीत ! अनेक कारणांनी : मुख्य म्हणजे दुर्लक्ष. त्यातही स्वतःचे आणि नंतर समीक्षकांचे_

आजवरच्या माझ्या कवितांपैकी मला सर्वात प्रिय असलेली कविता म्हणजे 'पागल पीर सुटे'. या कवितेच्या जन्माची तिथी-नक्षत्र-वार नोंद माझ्याकडे नाही. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या दिवाळी १९८६ च्या अंकात 'आजची गझल' मध्ये (पृ.७०) ही कविता प्रसिद्ध झालेली आहे. याच वर्षात ती लिहिली गेली एवढे आठवते.

या कवितेची जन्म 'तारीख' आठवली नाही तरी 'दिवस' आठवतो. नेहमीसारखाच सकाळी लौकर उठून विद्यापीठ ग्रंथालयाच्या वाटेने दूरवर फिरायला गेलो होतो : निलगिरींच्या हिरवाईत हरवलो होतो. (हा धारवाडी अनुभव जी. एं. खेरीज कुणाला (आ) कळायचा नाही.) सकाळपासूनच मन बेचैन होते : आतल्या आत आक्रंदत होते. जीव की प्राण असणाऱ्या 'दूरस्थ' 'श्रेयसी'ची भेट चुकली होती : मुकली होती. तिच्या उराउरी भेटीचे सुख दूरच राहिले होते. अपेक्षेला बाजूला सारून उपेक्षेने तीर मारल्याच्या वेदना होत होत्या.

गुणगुणत चाललो होतो. एकंदर सूर नुसता 'रुद्ध' नव्हता : 'विद्ध' वाटत होता. उपेक्षेचा तीर उरात रुतल्याने आणि धीर सुटला होता. सगळे जग अंधारल्यासारखे वाटत होते : एरव्ही 'सोनेरी' वाटणारे जग_ आणि डोळ्यांना धार लागली होती.

एरव्ही पायांखालच्या वाटेवरली तांबड 'माती' माझी 'ज्योती'शी नाती जोडायची. ज्योती_ बाह्यतः वयस्क वाटायला लागणाऱ्या निसर्गात 'इंडियन समर' फुलवणारी, रागिणी-अनुरागिणी, विलासिनी अशी 'प्रीतिज्योती'_ तांब्यांच्या भाषेत ही 'प्रीतिज्योती' :



अनुक्रमणिका







माझ्या मनःकोशात 'श्रेयसी' प्रीतिभक्तीच्या, विविध नात्यांच्या, लौकिक अलौकिकाच्या पातळ्यांवरील आदिम, मध्यम आणि अंतिम जीवनशक्ती– तिचीच भेट चुकली. तिने चुकवली ? खरेच उपेक्षा केली ? 'तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला' अशा निष्ठेची कदर केली नांही ? मग कयामतच आली म्हणायची ? माझी परतीची वाटचाल सुरू झाली होती. ग्रंथालय झाडीत लय पावले. 'ग्रंथ' आटोपला या संशयाची 'ग्रंथी' सुटली– कशी ? चमत्कारच– बांधलेली पावले मोकळी झाली : पायातल्या साखळ्या (की मणामणांच्या बेड्या ?) सुटल्या. जंजीर सुटून तिथे मीरेचे 'घुंगरू' नाचू लागले. ही 'करामत' नव्हे तर काय ?

समोर ते प्रिय-पवित्र 'स्थान' दिसायला लागल्यावर जिकीर-फिकीर सगळी संपली. चुकल्या पीरासारखा मशिदीत असलेला फकीर 'गैबी' बनून गेला. आणि मशिदीतली धुनी विझवून हा पागल पीर तिथून निसटला : कलंदर अवलिया झाला. बावनकशी– अगदी 'सफा' सूफी झाला. 'धुनी' विझवली : तरी 'धून' घुमवत अमीर बनून घुमत राहिला.

गुणगुणत गुणगुणत मी घरी आलो : सबंध कविता एक 'धून' बनून माझ्याच मनात-कानांत घुमत राहिली होती. माझ्यातलेच, माझ्या अस्तित्वाचेच अविभाज्य अंग असणारे काफिर, फकीर, गैबी, पीर, अवलिया, सूफिया हे सारे 'अमीर' बनून अगदी एकवटून घुमत राहिले होते. कागदावर 'अक्षर'रूप धारण करीत होते. जंजीर मुके होऊन, घुंगरू 'स'शब्द होत होते.

'पागल पीर सुटे' ही कविता जन्माला आली होती : आणि मीही कोणत्याही अमिरातीला मागे सारणारा अमीर म्हणून नव्याने जन्माला आलो होतो. मी खिडकीतून बाहेर पाहिले : 'ज्योती केव्हाच प्रकटली होती : प्रकाशत होती. अंधेरे जग पुन्हा सुनहरे झाले होते. आणि 'श्रेयसी'ने मला केव्हाच उराउरी भेट दिली होती : कधीच ताटातुटी नसणारी भेट– ती जवळच होती हे सत्य होते : 'दूर झाली' हा भ्रम होता. हा भ्रम हेच या पीराचे 'पागल'पण होते– नावाच्या 'पंडिता'चे शहाणपण असेच असावयाचे !

ही कविता मला सर्वांत अधिक प्रिय आहे : कारण तिच्यात मी आणि माझी 'श्रेयसी' (अमूर्त + मूर्त) यांचे अद्वैत माझ्या 'पूर्ण'जन्माचे रूप घेऊन स'जीव' झाले आहे. श्रेयसी ही माझी केवळ एक संकल्पना नाही : चिरचिंतनाचे अधिष्ठान असलेली, प्रीती आणि भक्ती; प्रेयस आणि श्रेयस; भुक्ती आणि मुक्ती यांची एकरस अशी ती माझी जीवनानुभूती आहे : जीवनशक्ती (Vital Energy) आहे.

गेली काही वर्षे मी मनाने 'सूफी' होत चाललो आहे : तो खराखुरा प्रीतिपंथ आहे : भक्तिपथ आहे. साधा पंथ नव्हे : 'पंथराजु' आहे. परमकारुणिक निजामुद्दिन अवलिया यांचा मी अनुग्रहीत आहे. लहानपणापासून आमच्या आवळीशेजारच्या 'गैबी'चे अंतर्धान (गायब) पावणे आणि प्रकटणे मी अनुभवले आहे. पीर आणि फकीर यांनी फार पूर्वीपासूनच माझ्या मनाची मशीद करून ठेवली आहे. या कवितेची यावनी शब्दकळा ही अशी तिच्यातून व्यक्त होणाऱ्या अनुभूतीशी इमान राखणारी आहे. 'चिश्त'सारखा शब्द 'चिश्ती'ची आठवण करून



अनुक्रमणिका







देणारा आहे : पण 'चिश्ती' ह्या रशियन शब्दाचा अर्थ 'शुद्ध' : म्हणजेच 'सूफी' मधील 'सफा' (ई) माझ्या मनात होता.

या कवितेच्या निर्मितीमागे कसलाच प्रयत्न नव्हता : चिंतन असेल ते अबोध मनात. ही कविता प्रथम लिहिली गेली नाही : आधी ती वेगळ्या अर्थाने 'कंठगत' होती : नंतर 'लिपिबद्ध' झाली. तिला उत्स्फूर्त म्हणण्यापेक्षा 'सहजा' : 'सह'जा : सहज जन्मलेली आणि (माझ्या) सह जन्मलेली अशी एका 'उन्मनी' मधील निर्मिती म्हणता येईल. तिच्यातील नादावर बोरकरांचा आणि शब्दांवर माधव ज्युलियन यांचा 'स्वभाव' प्रभाव आहे याची मला बिलकुल खंत वाटत नाही. नेहमीप्रमाणेच ही कविता जशीच्या तशी कसलेही संस्कार न करता 'अक्षरा'च्या स्वाधीन झाली आहे. आता या कवितेच्या स्वागताबाबत : अजून ते व्हावयाचे आहे. होईल अशी आशा आहे. 'म.सा.पत्रिके'त ही कविता छापली जात असताना : डॉ. गं. ना. जोगळेकर आणि मी भेटलो. (अंक बाहेर यायचा होता.) जोगळेकरांनी ही कविता मला सबंध पाठ म्हणून दाखवली. त्यांनी तिचे मुद्रित तपासले होते. हा अनुभव कळता एकूण कवितेच्या स्वागताचा (मराठीतील) प्रकार वेगळा तरी किंवा दुर्मिळ तरी_ असो. खरे म्हणजे नसो !

पाग़ल पीर सुटे

*भेट उराउरि राहुनिया दुरि*
*कुटून तीर सुटे*
*थेट उरामधि विद्ध सुरामधि*
*रुतून धीर सुटे*
*जगत् सुनहरे हो अंधेरे*
*नयनां नीर सुटे*
*हाय ! कयामत_ काय करामत !*
*पग-जंजीर सुटे*
*तौबा तौबा ! समोर काबा_*
*जिक्र-फिकीर सुटे*
*काफिर मी, पण गैबी होऊन*
*एक फकीर सुटे*
*विझवून धुनी मशिदीमधुनी*
*पागल पीर सुटे*
*मस्त अवलिया चिश्त सुफिया*
*घुमत अमीर सुटे*

(डॉ. पंडित आवळीकर बी-२, कर्नाटक युनिव्हर्सिटी, धारवाड ३.)

# 'तेवढंच जिवंतपण'

सरिता पदकी

माझ्या कवितांपैकी माझी सगळ्यात आवडती कविता कोणती ? या प्रश्नाला थोडं राजकारणी चातुर्य वापरून उत्तर देता येईल की, असं स्वतःच्याच कवितांत डावं-उजवं करणं मला नाही जमणार. आईला जशी आपली सगळीच मुलं सारखीच आवडतात तशा मला– किंवा नम्रता धरून असं म्हणता येईल की माझी सगळ्यात आवडती कविता अजून माझ्या हातून लिहूनच व्हायची आहे.

ही अशी उत्तरं सुचायचं कारण मला माझी एखादी कविता इतरांहून अधिक आवडते असं नाही. ज्या कविता मला बऱ्या जमल्या, मला जे उत्कटपणे सांगावंसं वाटत होतं ते ज्यात सांगितलं गेलं असं मला वाटतं, अशा माझ्या काही कविता आहेत. त्या मला बाकीच्या कवितांपेक्षा आपसूकच अधिक आवडतात. त्यातलीच ही एक कविता आहे– 'तेवढंच जिवंतपण !'

*ओहोऽ*
*केवढा स्वच्छ हा दिवाणखाना*
*अगदी धूलिकणविरहित,*
*मुक्या घंटांच्या माळा जडवलेला*
*हँडिक्राफ्टचा सोफासेट*
*त्याखाली मखमली गालिचा*
*ज्यावर चालणाऱ्या पावलांना*
*गुलाबाच्या पाकळ्याही रुताव्या,*
*गालिचावर सुस्तावलेली*
*केसाळ पांढरी धुप्प श्वानिका,*
*भिंतींवर क्रिटिकपसंत चित्रपट्टिका,*
*खिडक्यांना चिपकलेले घोळदार रेशमी पडदे,*
*ध्वनिपेटिकेत निमूट*
*समग्र भीमसेन आणि रविशंकर.*

*या साऱ्याची सुशोभित मालकीण*











*शोल्डरकट केस, ब्लाउझ स्लीव्हलेस*
*इम्पोर्टेड साडी*
*ओठावर लाल स्मिताची नेटकी घडी,*
*तिनं सुबकपणे पुढे केलेल्या ग्लासातलं*
*सरबत हिनकळलं*
*– तेवढंच जिवंतपण त्या दिवाणखान्यात !*

कवितालेखनाचं नक्की वर्ष आठवत नाही पण १९८० च्या आसपास ती 'स्त्री' मासिकात प्रकाशित झालेली आहे.

ऐंशी साल आठवलं पंचाहत्तर सालावरून. त्या वर्षी माझ्या मनात असलेली काही स्त्रियांची शब्दचित्रं कवितात उतरली होती. या स्त्रिया मोलमजुरी करणाऱ्या होत्या, लग्न जमत नाही म्हणून मराठी घेऊन एम.ए. करणाऱ्या होत्या, स्त्रीमुक्तिविषयक गप्पा मारून घरातल्याच नोकर स्त्रियांवर अन्याय करणाऱ्या होत्या. स्त्रियांची नाना रूपं मनात ठसलेली होती. त्यांची कवितारूपानं व्यक्त व्हायची मागणीही मनात ठसठसत होती.

आमच्या घराच्या मागच्या अंगणात एका विगार कुटुंबाची अत्यंत दरिद्री झोपडी होती. भर पावसाळ्याचे दिवस होते आणि त्या बाईचे नऊ महिने भरले होते. त्या बाईशी माझं येता-जाता संभाषण होई. एके दिवशी ती दिसेना तेव्हा मी आमच्या मोलकरणीजवळ तिची चौकशी केली. तिनं बोट दाखवून जे माझ्या नजरेला आणलं त्यानं माझ्यावर जणू वीज कोसळली.

नऊ महिने भरलेली ती बाई आदल्या दिवशी त्या पावसाचं पाणी साठलेल्या झोपडीतच बाळंतीण झाली होती. आपल्या नवजात अर्भकाला कुत्र्यामांजरांनी खाऊ नये म्हणून तिनं झोपडीच्या दाराला एक पोतं लावलं होतं आणि त्यावर ते उडू नये म्हणून दगड ठेवले होते आणि ती स्वतः–

ती स्वतः आमच्यासमोरच बांधकाम चालू असलेल्या इमारतीच्या वरच्या मजल्यावर मजुरीला गेली होती. विटांची घमेली डोक्यावर घेऊन जिना चढून जाताना मी तिला पाहिली आणि अतिशय ढवळून निघाले. संताप, अगतिकता, चीड, करुणा काय काय दाटून आलं माझ्या मनात. तो सबंध दिवस मी अत्यंत प्रक्षुब्ध मनःस्थितीत घालवला. त्या बाईला ती परत आल्यावर मी काही खायलाप्यायला आणि कपडे दिले, पण ते तेवढंच, अत्यंत अपुरं.

त्या प्रक्षोभातून मोकळी झाले आणि एकामागून एक अशी सात स्त्रीदर्शनं निर्माण झाली. ती श्रीमती विद्या बाळ यांच्याकडे पाठवली. ते स्त्रीवर्ष होतं. (हे मला आधी माहीत नव्हतं.) ऑगस्टच्या अंकात त्या साती कविता छापायचं विद्याताईंनी ठरवलं.

आणि इथं एक आणीबाणीशी छोटीशी झुंज झाली. त्या झुंजीची हकीगत मला श्री. मुकुंदराव किर्लोस्कर यांच्याकडून नंतर कळली म्हणजे मी त्या लढाईत स्वतः भाग घेतला











नव्हता हे उघडच आहे.

तर केव्हातरी भेट झाल्यावर मुकुंदरावांनी सांगितलं की त्या वेळी प्रत्येक मासिकाच्या (आणि इतर नियतकालिकांच्याही) कचेरीत एक पोलीस अधिकारी येऊन बसत असे त्याप्रमाणे किर्लोस्करच्या कचेरीतही बसला होता. त्यानं काय छापताय ? म्हणून माझ्या कवितांचा जुडगा हातात घेतला, वाचला आणि सांगितलं की या कविता तुम्हाला छापता येणार नाहीत. का म्हणून विचारल्यावर खरं तर उत्तर न देण्याचा शिरस्ता असूनही उत्तर मिळालं की यात दारिद्र्याचं वर्णन आहे आणि आपल्या भारतात दारिद्र्य आहे ही गोष्ट या कवितांमुळे सगळ्यांना कळेल ! !

या उत्तरावर मुकुंदराव चिडले. मला वाटतं की ते आणखीही वरच्या अधिकाऱ्यांपर्यंत जाऊन भांडले. खुद्द इंदिरा गांधींपर्यंतही जायची त्यांनी धमकी दिली तेव्हा त्या कविता सुटल्या आणि सगळ्या एका अंकात छापून आल्या. सुभाष अवचटांच्या चित्रानिशी.

कविता म्हणून ही दर्शनं कशी आहेत हे मला अजून उमगलेलं नाही. पण प्रसिद्ध झाल्यावर ती बरीच गाजली. फार थोड्यांनी त्यातल्या काही शब्दांना नाकं मुरडली पण एकूण त्या कविता बऱ्याच लोकांना आवडल्या. विशेषतः स्त्री चळवळीतल्या मुलींनी त्या उचलून धरल्या. त्यांची पोस्टर्स केली. पुढे मी त्या कवितांचं इंग्रजीत केलेलं भाषांतरही काही परदेशी मैत्रिणींना आवडलं.

ज्याला सामाजिक आशयाची कविता असं एक ढोबळ नाव दिलं जातं अशी तुरळक कविता मी लेखनाच्या सुरुवातीच्या काळात लिहिलेली होती.

*सात रेशमी पडद्यांआड*
*आहे आमची माणुसकी*
*हालचाल तिची मंद रेखीव*
*हसणे ओठात मोहक आखीव*

अशा त्यातल्या काही ओळी आठवतात. पण सामाजिक आशयाच्या कविता ठोसपणे माझ्याहातनं लिहिल्या गेल्या त्या या सात कवितांच्या वेळीच.

त्या यशाचा प्रभाव मनावर राहूनच की काय मी काही तशा कविता लिहीत गेले. त्यातलीच वर उल्लेखिलेली 'तेवढंच जिवंतपण'.

उघडच आहे की ही कविता प्रत्यक्ष अनुभवावर आधारलेली आहे. पण हा एकाच दिवाणखान्यातला अनुभव मात्र नाही. अनेक सुसज्ज घरातल्या शोभिवंत मालकिणींबद्दलचा हा अनुभव आहे. स्वतःला घरातल्या इतर वस्तूंसारखीच एक शोभेची वस्तू मानण्यात त्यांना धन्यता वाटते. सजावटीच्या रूढ कल्पना अंमलात आणताना त्या औचित्याचा थोडाही विचार करीत नाहीत. प्रचंड अंतर्गत पोकळी असल्यानं त्या संभाषणात भागही घेऊ शकत नाहीत. त्या फक्त नेटकं आणि मोजकं हसतात.



अनुक्रमणिका







यातलं घर हे एकच घर नाही. तरी माझ्या सुदैवानं ( !) ज्या दिवाणखान्याचं वर्णन या कवितेत आहे तो मला एकाच घरात मिळाला. फक्त एका घरात असलेली पांढरीधुप श्वानिका मी त्या गालिच्यावर नेऊन ठेवली.

आमचे एक परिचित होते. आपल्याला गाण्याची आवड आहे असं मिरवण्यात त्यांना मोठं भूषण वाटे. आपल्याकडे समग्र भीमसेन आणि रविशंकर आहे हे ते आवर्जून सांगत. पण आम्ही कधीही त्यांच्या घरातून संगीताचे स्वर ऐकले नाहीत. ही गोष्टही या कवितेत चपखल बसली.

कवितेची नायिकाही तिच्यासारख्या अनेकजणींचं मिश्रण आहे. पण तिनं दिलेला अनुभव हा अगदी एकसंध आहे.

एकदा सुचल्यावर ही कविता एका बैठकीत लिहून झाली. कुठे एखादाच शब्द बदलला असला तर !

काही कविसंमेलनांतून मी ही वाचून दाखवली. वास्तविक सुरुवातीपासून काही शेवटाची कल्पना येत नाही. पण लोक सारं वर्णन ऐकून घेतात आणि शेवटच्या कल्पनेला उत्स्फूर्त दाद देतात असा अनुभव अनेकदा आलेला आहे. कविसंमेलनांतून ही कविता उचलून धरली जाते. सुप्रसिद्ध कवयित्री अरुणा ढेरे यांनी मला आवडलेल्या कविता असा जाहीर कार्यक्रम केला, त्यातही त्यांनी हिचा अंतर्भाव केला आहे.

मला माझी ही कविता का आवडते ? सगळंच काही सांगायला जमणार नाही. पण असं वाटतं की मला माझा अनुभव योग्य शब्दात पकडता आलाय. सर्व सुखसोयी उपलब्ध असूनही निर्जीव जीवन जगणाऱ्या स्त्रियांबद्दल मला वाटणारा खेद आणि चीड या कवितेत परिणामकारकपणे व्यक्त झाला आहे. आणि तो वाचकांपर्यंत पोचतो आहे याचा सुखद पडताळाही मला आलेला आहे.

(सरिता पदकी. जोग ब्लॉक्स, कर्वे रोड, पुणे ४)











# दिवे लागले रे

शंकर रामाणी

'दिवे लागले रे' या कवितेची जन्मतारीख आहे : पंधरा जुलै, १९७०. त्या दिवशी रात्री मला ती कविता 'आली'. (मला कविता येते असे मी नेहमीच म्हणतो.)

कोणतीही कलाकृती हा त्या कलावंताचा 'अनुभव' असतो. त्याच्या अंतर्मनात रुजलेल्या, पोसलेल्या अनुभवाची अभिव्यक्ती कोणत्याही क्षणी स्थलकाळाचे भान विसरून, होऊ शकते. अनेकदा तशी ती होतेही.

'दिवे लागले'च्या जन्मकाळी एक अकल्पित घटना घडली : माझ्या पहिल्या दिवंगत पत्नीचा हृदयविकाराचा आजार अचानक बळावला. परिणामी फॅमिली डॉक्टरांच्या सल्ल्याने तिला तातडीने सरकारी हॉस्पिटलमध्ये नेण्याची व्यवस्था करावी लागली. परंतु तशा त्या जीवघेण्या धावपळीतही हॉस्पिटलला फोन करून अँब्युलन्स येईपर्यंतच्या पंधरा-वीस मिनिटांच्या अवधीत, टेबलावरच्या हाताशी आलेल्या कोऱ्या कागदाच्या चिटोऱ्यावर स्फुरलेल्या ओळींची भराभर नोंद करून, येणाऱ्या कवितेचे 'स्वागत' केल्याशिवाय मला राहवले नाही. कविता पूर्ण झाली आणि निर्मितीचा अपूर्व क्षण एखाद्या कठीण प्रसंगावरही मात करू शकतो याचा विलक्षण अनुभव मला आला. विशिष्ट वृत्त कवितेच्या निर्मितिप्रक्रियेत सहजपणे आले.

काही दिवसांनी कविता 'सत्यकथे'कडे पाठवून दिली व ती फार आवडल्याचे कार्यकारी संपादक राम पटवर्धन यांनी लगेच कळविले. 'सत्यकथेच्या' १९७० च्या दिवाळी अंकात कविता प्रसिद्ध झाली. नंतर अनेकांनी ती आवडल्याचे आवर्जून समक्ष भेटीत सांगितले. सुप्रसिद्ध कोकणी कवी र. वि. पंडित यांनी सविस्तर पत्र लिहून कवितेचे अमाप कौतुक केले. महाराष्ट्रातील साक्षेपी रसिकांनी कवितेला दाद दिली असेल नसेल ही. काही कल्पना नाही.

मला स्वतःला अत्यंत प्रिय वाटणाऱ्या माझ्या काही कवितांपैकी 'दिवे लागले रे' ही एक आहे. नेमक्या शब्दांत माझ्या स्वतःचा जीवनानुभव ती उत्कटपणे व्यक्त करून जाते असे मला वाटते.

**दिवे लागले रे**

*दिवे लागले रे, दिवे लागले रे.*
*तमाच्या तळाशी दिवे लागले;*

*दिंडीच्या दिशा खोल तेजाळताना*
*कुणी जागले रे ? कुणी जागले ?*
*रित्या ओंजळी दाटली पुष्पवृष्टी*
*असे झाड पैलाड पान्हावले;*
*तिथे मोकळा मी मला हुंगिताना*
*उरी गंध कल्लोळुनी फाकले_*
*उभ्या रोमरोमातुनी चैत्रवाटा*
*कुणी देहयात्रेत या गुंतले ?*
*आरक्त त्याच्या कृपेच्या कडा अन्*
*उषःसूक्त ओठात ओथंबले_*

(शंकर रामाणी. ३०७, रॉय रोड, टिळकवाडी, बेळगाव ६)

# बरसाली

श्रीधर शनवारे

*बरसाली, ए रोडसाइड स्टेशन*
*हिअर इज द सेंट्रल पॉइंट ऑफ द नेशन.*

*रुळावरच्या पानकिड्यांना चिरडीत*
*शस्त्राला धार लावणाऱ्या चाकासारखा*
*कीच् कीच् असा आवाज करीत धावणाऱ्या*
*पॅसेंजरचे थांबणे, अंधाऱ्या संध्याकाळी;*
*माझ्या अनपेक्षित उतरत्या पावलांना स्वीकारण्याची*
*इथल्या साऱ्यांची टाळाटाळी.*

*अंतर्बाह्य कुट्टकाळ्या*
*पाठमोऱ्या हलत्या गाडीकडे पाहात*
*मी उभा, एकटा.*
*पण तसा एकटाही नव्हे, सोबत रपाट पाऊस,*

*दुसरा थर चढत असलेला काळोख,*
*जंगलजिवाणूंचा संमिश्र साल-काढला स्वर,*
*स्टेशनसमोरच्या फुटक्या दिव्याची*
*बाहेर आलेली टोकदार काच,*
*भुतासारखा पायऱ्या उतरत असलेला केबिनमन,*
*बॉल टोकन पोचवण्यात ओला झालेला*
*चोळामोळा दाढीचा पॉइंटमन,*
*आणि ऑफिसकडे वळलेला*
*हँडलँपवाला*
*पिसाट उंचीचा स्टेशनमास्तर.*
*"मास्तरसाहेब, मी_"*
*"इथे रात्री झोपायची सोय नाही.*
*खानाबदोश पलीकडे उतरले आहेत*
*त्यांच्या शेजारी झोपायला हरकत नाही."*
*बरसाली, ए रोडसाइड स्टेशन*
*हिअर इज द सेंट्रल पॉइंट ऑफ द नेशन !*

*"यहां नही, उधर सोवो !"*
*तेंदूपत्त्याची बिडी पीत*
*वाडग्यात ससा शिजवत असलेल्या*
*खानाबदोश म्हातारीचा आवाज.*
*खजुराच्या पानांच्या अर्धविणल्या चटया बाजूला.*
*मजबूत गुडगुडीभोवती बसलेले चार दणकट पुरुष.*
*डवलबारच्या तीन बंदुकी आडव्याउभ्या.*
*"उधर नही ! उधर ! !"*
*सहांपैकी कुठल्या तरी एका नळीतून निघाल्यासारखा*
*लक्षवेधी हुकूम.*

*घाबरल्या नजरेला चुकून दिसलेली*
*कोपऱ्यातली विणल्या हातांची काळी तरुणी.*
*खानाबदोशी औषधी झोऱ्यावर तिनं सांडलेले*
*निवडक अरण्य.*

झोऱ्यात– आणि तिच्यातही
जडीबुटीचे, शिलाजिताचे,
हवासनाच्या तेलाचे बुधले;
चिडीच्या प्रकाशात
तुटलेल्या कमिज-बटनांखालचे
बेपर्वा तारुण्य उधळे.
शेजारी हातभर लांबीची लखलखती कुकरी.
तिच्यातून उसळणाऱ्या रक्ताच्या फवाऱ्यात
सारी रात्र लाल लाल;
म्हातारीचा आवाज–
"अरी ओऽ, निकाल वो दुसरे खरगोश की खाल."
बरसाली, ए रोडसाइड स्टेशनं
हिअर इज द सेंट्रल पॉइंट ऑफ द नेशन !

रात्री टाकलेली आपली गोधडी
आपल्या हाताने काढून घेत
खानाबदोशने मला जागवले
तेव्हा मी थक्क !.!
सारे काही विसरून जाणारी ही पहाट.
समोरच्या व्याघ्रगुहेवरून टिप् टिप् टपकणारे
निळेसावळे थेंब.
पोपटपिसांची जन्मस्थाने अशा चौफेर टेकड्या.
राहू की जाऊ विचारणारा
आभाळभर तरंगता, श्यामल, लाघवी पाऊस.
रात्रभर टेकून उडून चाललेल्या
कस्तुरी पाखरांच्या थव्यासारखी हवा_

समोरच्या उभ्या पॅसेंजरमध्ये
भटकता पाय ठेवला.
तेव्हा
धावत जवळ येत
स्टेशनमास्तर हात दाबत म्हणाला,

*"माफ करा. काल मला वाटले-"*
*आणि गाडी सुटली !*

*लेहेंग्याने भगोने पुसता पुसता*
*कुणब्यातून हसणाऱ्या खानाबदोश म्हातारीचे*
*सोन्याचे दात_*
*केबिनमधून सांधे जोडणाऱ्या शेख कादरची*
*गोड जांभळे विकणारी पोर_*
*आणि स्टेशनच्या ऑफ साइडला हालत असलेली निळ्या हातातली हिरवी झेंडी*

*बरसाली, ए रोडसाइड स्टेशन*
*हिअर इज द सेंट्रल पॉइंट ऑफ माय नेशन !*

प्रिय श्री. शंकर सारडा,

तुमच्या पत्रात तुम्ही विचारलेल्यां प्रश्नांच्या अनुषंगानेच उत्तरे लिहितो–

प्र.१ : ही कविता कधी लिहिली ? वर्ष, मासिक, संग्रह.

उत्तर : ही कविता १९७६ सालच्या जुलै महिन्यात लिहिली. पुढे ती 'युगवाणी'च्या ७६ सालच्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली. १९७८ साली 'आतून बंद बेट' हा माझा दुसरा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. त्यात ही कविता समाविष्ट केली गेली.

प्र.२ : या कवितेची पार्श्वभूमी, प्रेरणा, त्यावेळचे वातावरण ?

उत्तर : माझे सासर मध्यप्रदेशात आहे– बैतूल. नागपूर-इटारसी मार्गावरचे हे जिल्ह्याचे गाव. बैतूलच्या आधी जे स्टेशन लागते ते बरसाली. पण बरसालीला मेल किंवा एक्सप्रेस थांबत नाही. फक्त पॅसेंजर थांबते.

खूप दिवसांपासून सौ. कविताचा मला आग्रह होता की, कधीतरी मी बैतूलला जाताना बरसालीला थांबावे. हे गाव निसर्गाच्या कोंदणात वसलेले असल्यामुळे तिचा तसा आग्रह होता. बरसाली पाहिली तर मला एखादी निसर्गसुंदर कविता सुचेल, असेही तिच्या मनात कदाचित असेल.

आणि १९७६ च्या जुलैमध्ये बैतूलला जाण्याचा योग येताच मी ठरवून टाकले की या वेळी बरसालीला उतरायचे. त्यामुळे या वेळी मी मुद्दाम पॅसेंजरने प्रवासाला निघालो.

बरसाली आली तेव्हा संध्याकाळ व्हायला आली होती. पाऊस पडत होता. मी त्या लहानशा स्टेशनवर उतरलो. भोवताल पाहिले तर वा ! चारही बाजूंनी हिरव्याकंच पर्वतरांगा आणि मधे असलेले हे लहानसे स्टेशन; कलशातल्या आंब्याच्या पानांमध्ये नारळ ठेवावा तसे.










त्या वातावरणात चांगला तास-सव्वातास मी भटकत होतो. गुडुप्प अंधार होईपर्यंत तिथला निसर्ग सर्वांगात साठवत होतो आणि तरीही आपल्याला काव्याची स्फूर्ती वगैरे होते आहे असे मला मुळीच वाटत नव्हते.

तेवढ्यात स्टेशनमास्तरने मला सांगितले की बरसाली हा भारताचा मध्यबिंदू आहे, आणि तशी एक पाटीही पहाडीवर लिहिलेली आहे की, 'हिअर इज द सेंट्रल पॉइंट ऑफ द नेशन.'

हे मी ऐकले मात्र आणि सारे चित्रच पालटले. भारताचा मध्यबिंदू हा संदर्भ घेऊन माझे डोळे आता तिथली प्रत्येक गोष्ट न्याहाळू लागले. आणि आतून निःशब्द कविता मला ढुसण्या मारू लागली.

प्रत्यक्ष कविता मात्र नागपूरला आल्यावर लिहिली.

प्र.३ : तिच्या निर्मितीच्या वेळचे, अनुभवाचे वेगळेपण ?

उत्तर : ही कविता लिहिताना असे वाटत होते की जणू काही आपण बरसालीच्या डोळ्यांत सारा भारतच पाहतो आहोत. त्यापूर्वी स्थलचित्रणात्मक कविता मी बऱ्याच लिहिल्या होत्या. पण मातीचा रेटा घेऊन दिगंतात भरारी मारणाऱ्या गरुडासारखे, मला यापूर्वी कधी वाटले नव्हते.

प्र.४ : लिहिण्याची प्रक्रिया, एका बैठकीत पूर्ण की दीर्घ काळ लागला ? तिच्यावर संस्कार केले काय ?

उत्तर : नेमका दिवस आठवत नाही, पण ज्या दिवशी ही कविता लिहिली तो सुटीचा दिवस नव्हता, एवढे नक्की आठवते.

नेहमीसारखा मी सकाळी पाचला उठलो. सहापर्यंत सारे आटोपून मी माझ्या अभ्यासिकेत आलो. 'बरसाली' मला सुचू लागली. १५-२० ओळी मी लिहिल्या असतील. तेवढ्यात सौ. कविताने मला कॉलेजमध्ये जाण्याची आठवण करून दिली. माझे कॉलेज सकाळी ७ ला सुरू होते. मी तिला सुटीसाठी कॉलेजला फोन करायला सांगितले व पुन्हा कविता लिहायला लागलो.

त्या दिवशी दुपारी दीड वाजता मी जेवलो. तोपर्यंत कविताच लिहीत होतो.

कविता पूर्ण झाल्यावर त्या दिवशी व दुसऱ्या दिवशी मी त्या कवितेकडे पाहिलेच नाही.

तिसऱ्या दिवशी तिच्यात काही जुजबी फेरबदल केले. पुन्हा एक दिवस मध्ये गेला. पाचव्या दिवशी मी त्या कवितेकडे शक्य तेवढ्या तटस्थपणे निरखून पाहिले. प्रसन्न होऊन मी कवितेची फेअर कॉपी केली व ती माझ्या कवितांच्या फाईलला लावून दिली. 'बरसाली'ची लेखनप्रक्रिया इथे सफल संपूर्ण झाली.

प्र.५ : विशिष्ट वृत्त, छंद, शैली, शब्द हे निर्मितिप्रक्रियेत सहजपणे आले की त्यामागे काही चिंतन वा प्रयत्न होते ?

उत्तर : या प्रश्नाच्या अनुषंगाने एक प्रसंग आठवतो. १९७९ साली प्रजासत्ताक










दिनानिमित्त दिल्लीला झालेल्या सर्वभाषा कविसंमेलनात मी 'बरसाली' ही कविता वाचली. त्यानंतर काही दिवसांनी 'महाराष्ट्र टाइम्स' मध्ये एक पत्र प्रसिद्ध झाले. त्या पत्रलेखकाने संतापून असे लिहिले होते की, 'श्रीधर शनवारे हे दिल्लीला मराठी भाषेचे प्रतिनिधित्व करायला गेले असताना त्यांनी इंग्रजी ओळींपासून प्रारंभ असलेली मराठी कविता का म्हटली ?'

त्या वेळी या आक्षेपाला मी उत्तर दिले नाही. वस्तुस्थिती अशी आहे की, 'हिअर इज द सेंट्रल पॉइंट ऑफ द नेशन' अशी पाटी तिथे इंग्रजीतच आहे. तिचे कृत्रिमपणे मराठीत भाषांतर करावे असे मला वाटले नाही. या कवितेत खानाबदोशाच्या तोंडी हिंदी भाषा आलेली आहे. कारण ते हिंदीतच बोलतात. ही स्वाभाविकता बिघडवावी असा विचार माझ्या मनाला मुळात शिवलाच नाही.

या स्पष्टीकरणातून तुमच्या प्रश्नाचे उत्तर येऊन गेलेले आहे असे मला वाटते. ही कविता लिहीत असताना या कवितेने ज्या छंदाची, शैलीची आणि शब्दांची माझ्याकडून अपेक्षा केली त्या अपेक्षांची माझ्या परीने मी पूर्ती करत गेलो.

प्र. ६ : तिचे जे स्वागत रसिक, टीकाकार इ. नी केले त्याबद्दलचे आपले अनुभव ?

उत्तर : (१) ही कविता प्रसिद्ध झाल्यावर सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. द.भि. कुलकर्णी यांचे मला पत्र आले–

"'युगवाणी' च्या दिवाळी अंकातील तुमची 'बरसाली' ही कविता एकदम आवडली. अभिनंदन ! तिच्यातील स्पंदनशील वातावरण, प्रतिमा व्यूहांतून साधलेले मनोविश्लेषण आणि या साऱ्याला आधारभूत असे पुनरावृत्त, विकसनशील वैचारिक संसूचन हे सारेच विलोभनीय आहे."

(२) 'बरसाली'च्या संबंधात नटवर्य कै. सतीश दुभाषी यांची दोन पत्रे–

(I) "तुम्ही खरंच छान लिहिता. कसं काय जमतं ते ? तुमच्या प्रेमात पडलो ते बरसाली– Central point of the nation– मुळे. खूप मोठे आहात."

(II) "तब्येत वरून बरी वाटली तरी आतून काही खरं नाही. कधी 'फ्यूज' उडेल कुणास ठाऊक. तो उडण्यापूर्वी एकदा कुठल्या तरी गूढ संध्याकाळी 'बरसाली' ला जाऊन यायची फार इच्छा आहे."

(३) एके दिवशी अनपेक्षितपणे कविवर्य अनिलांचा मला फोन आला– "अहो शनवारे, मी तुमच्या 'बरसाली'ला मुद्दाम जाऊन आलो. जागोजागी तुमच्या कवितेचा प्रत्यय येत होता. पण एकच गडबड झाली हं ! तुमची ती खानाबदोश मंडळी कुठे दिसली नाही ! !" (आणि स्वतःच्या विनोदावर हास्य.)

(४) 'बरसाली' दिल्लीला सादर केल्यानंतर त्या कार्यक्रमाचा वृत्तांत दिल्लीचे जेष्ठ पत्रकार श्री. मो.ग. तपस्वी यांनी नागपूरच्या 'तरुण भारता'त प्रसिद्ध केला–

"यंदाचा प्रजासत्ताक सोहळा, संचलनाव्यतिरिक्तच्या कार्यक्रमात, कुणा एका व्यक्तीने



अनुक्रमणिका







गाजविला असेल तर नागपूरचे कवी श्रीधर शनवारे यांनी. सालाबादाप्रमाणे यंदाही आकाशवाणीने सर्वभाषा-कविसंमेलनाचा कार्यक्रम योजला होता. या कार्यक्रमात मराठी कविता सादर करण्यासाठी मानाचे पान शनवारे यांना देण्यात आले होते. या संमेलनात 'बरसाली' ही कविता सादर करून त्यांनी उपस्थितांकडून जी प्रशंसा प्राप्त केली, त्यांच्याकडून जे कौतुक मिळविले आणि समकालीन कविवृंदाकडून जी वाहवा प्राप्त केली, ते सर्व मराठी मनाला अभिमान वाटावे असेच होते_"

(५) 'आतून बंद बेट' या संग्रहावर ज्यांनी ज्यांनी लिहिले त्या सर्वांनी 'बरसाली'चा भरभरून भलावण केली. त्या सगळयांच्या नोंदी येथे करणे शक्य नाही येथे करणे शक्य नाही, व आवश्यकही नाही.

प्र.७ : तुमची सर्वांत प्रिय कविता हीच का ?

उत्तर : एखाद्या यशस्वी कवितेकडून आपण ज्या म्हणून वाङ्मयान अपेक्षा करतो त्या बऱ्याच प्रमाणात ही कविता पूर्ण करते म्हणून माझी ही सर्वाधिक आवडती कविता आहे.

यापेक्षा अधिक सविस्तर लिहिणे म्हणजे आत्मस्तुतीच्या प्रांतात पाय टाकल्या सारखे होईल.

म्हणून एवढेच पुरे.

—श्रीधर शनवारे, 'राधेय', गोकुळ पेठ, नागपूर ४४० ०१०.

---

# थांगअथांग

**केशव मेश्राम**

---

*जेव्हा स्वतःच्याच मनाचा थांग लागत नाही*
*आपणच आपल्याला आपल्याच प्राणाची भीकही मागत नाही,*
*काळयागिळया रात्रीतही वाटत नाही जिवाला भीती,*
*चिमूटभर वाळू कवटाळून सुसाट धावावे ही कोणती रीती ?*
*मायबापांनी सांडले त्यांनी केला हिशेब तरी कोणता ?*
*मीच नागवले चौबाजूंनी मला होणार तरी कोण त्राता ?*
*संसार मीच मांडला मीच पेरले सुरुंग अस्वस्थ क्षणांचे,*
*कुट्ट काजळावर अंदाजानेच गिरवले चित्र मेलेल्या किरणांचे.*
*_तर अकाली अंदाजांनाच असतो गर्भपाताचा शाप,*












*सगळीकडली काटेरी चाके आली गळ्याभोवती आपोआप,*
*क्षितिज पूर्ण नांगरूनही सुरम्य चांदणी लुकलुकत नाही*
*उकरलेल्या ओल्या ढेकळांचेच लेप लागले मनालाही– देहालाही.*
*गोफणीने फेकल्या दगडांसारखे आप्तेष्टांतून फेकून दिले,*
*मनाच्या बंद सरोवरातून आत्मरंगाचे पाणी आले,*
*मनाच्या काठाकाठानेच फिरतच गेलो दूर डोळ्याआड,*
*ठोठावूनही काही उघडलेच नाही– अस्तित्वाच्या दडलो आड*
*कुठूनही पाहिले तरी. कळलेच नाही कोणते रूप कोणते विरूप ?*
*कोण्याही रस्त्याला गेले तरी– चालायचे असतेच उरलेले खूप खूप,*
*कोऱ्या रेशमी तागासारखे झुळझुळत मन कुठलेही उलगडत नाही,*
*विश्व अथांग दुःख अथांग प्रश्न अथांग मनाचा थांग लागतच नाही.*

आपली सर्वांत प्रिय कविता कोणती ? हाच मला वाटते, एक अवघड प्रश्न आहे. कारण चार दशके मी कविता लिहितो आहे. त्यातील पंचवीस-तीस वर्षे जाणतेपणाने लिहितो आहे. 'उत्खनन', 'जुगलबंदी', 'अकस्मात' आणि 'चरित' असे चार कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. बऱ्याच कविता मी लिहिल्या आहेत.

खूप मुले-लेकरे असली, आपलीच सगळी असली तरी त्यातून एका कुणाचा निर्देश करणे, जसे कठीण जाते; तसेच ह्या वरील प्रश्नाने माझे केले आहे. तरीही त्यातून कोणतीतरी एखादी कविता ही प्रिय कविता असणार, हे देखील तर्कसुसंगत असेच असते. त्यामुळे एक कोणतीतरी कविता निर्देशित करणे, क्रमप्राप्त आहे; हे मलाही मान्यच आहे.

स्पष्ट सांगायचे झाले तर मला आणि अनेकांना अवघ्यांना आवडेल अशी, एखादी कविता कदाचित ह्या दशकात, माझ्याकडून लिहिली जाण्याची अधिक संभाव्यता मला वाटते. पण अशा रीतीने काही सांगणे, म्हणजे 'अगा जे घडलेचि नाही', त्याबद्दलच बोलल्यासारखे होईल. पण हे तरी खरेच आहे.

तसे १९८५ हे वर्ष मला कविता लेखनाच्या दृष्टीने खूप समाधान देणारे गेले. ह्यावर्षी बऱ्याच चांगल्या, वैविध्यपूर्ण आणि तरल पण सकस कविता मला सुचल्या असे मला वाटते.

विशेषतः जून ते आक्टोबर याच कालखंडात मला अधिक कविता सुचतात असे मला माझ्याच वह्यातील कवितांकडे बारकाईने पाहताना जाणवते. एक तर पावसाचे दिवस असतात. मन आंतरिक उत्साहाने निथळत असते. धारा कोसळत असतात. पाण्याचे लोट आपल्या मस्तीत मिळेल तेवढा प्रवास करीत अनेकरंगी बनून पळत असतात. सर्वत्र हिरवेपण असते. मनातल्या एकान्तात साठलेली अनेकानेक बीजे आतून उसळू पाहतात. आपण आपले असतोही आणि नसतोही. तसे निसर्गाच्या यच्चयावत रूपाशी नाते जुळते. कधी ते सुसंगतीचे असते कधी विरोधाचे. कधी बाहेरच्या हिरवेपणाने मनाला आग लागते. कधी मनातली हिरवी

किमया बाह्य कुंदपणाला कवेत घेते. एक थेंबही अंगावर न घेता, केव्हा चिंब भिजता येते. तर केव्हा सचैल हुडहुडत असूनही अंतःकरण आतून धगधगत असते. कितीतरी कविता रूपे या पाचच महिन्यांत मला दमवून आकर्षून सोडतात.

'थांगअथांग' ह्या शीर्षकाची ५ ऑगस्ट १९८५ ला लिहिलेली आणि लक्ष्मण माने यांच्या 'बंद दरवाजा' १९८५ च्या दिवाळी अंकात, प्रकाशित झालेली आणि माझ्या 'चरित' ह्या चौथ्या कवितासंग्रहात पृष्ठ 'चोवीस'वर संगृहित केलेली क्रमांक 'बावीस'ची कविता ही माझी सर्वांत प्रिय कविता होय.

खूप वर्षे मी मुंबईत वावरतो आहे. विदर्भातून शिकण्यासाठी व रेल्वेखात्यात नोकरीला लागल्यापासून, तो शिक्षक-प्राध्यापकाचा पेशा स्वीकारेपर्यंत मुंबईचेच संस्कार आहेत. साहित्याच्या, पत्रकारितेच्या लेखनाच्या क्षेत्रात नसलेली, कितीतरी खऱ्या अर्थाने मोठ्या मनाची सुसंस्कृत व रसिक माणसे मी पाहिली आहेत. आणि खूप मिळवूनही अत्यंत कंगाल व बकाल मनाचे प्रकाशक, लेखक, पत्रकार, कलावंतही मी जवळून अनुभवले आहेत. मोठ्या माणसांपुढे लाचार होणारे, गोंडा घोळणारे, राजकारणी लोकांना लक्षात यावे म्हणून, काय वाटेल ते करून खोटा कांगावा करणारे विलंदरही मला माहीत आहेत. प्रत्येकांच्या टोळ्या आहेत. जाती-पोटजातींचे, प्रदेश-विभागाचे गट आहेत. हिशेब आहेत. साहित्य संमेलन भरवू पाहणाऱ्या धूर्तांपासून तो परिषदा भरवणाऱ्या स्वयंमन्य पोटभरू लोकांपर्यंत सगळ्यांचे व्यवहार, मी डोळसपणे पाहिलेत. साहित्य संघातही पाहिलेत.

तसेच दलित संपादक साहित्यिकांचेही स्वार्थी दूरगामी उद्योग मी बघतो. त्यांचे मिरवेपण-अहंकारही पाहतो. पैसे खाण्यापचवण्याचे उद्योग तर विविध रूपास्वरूपात दिसतात. तरी कधी शिरस्ता म्हणून, कधी भीड म्हणून, कधी उगाचच का 'लिहा-बोला मरू द्या.' म्हणत मी सगळ्यात मिसळतो. ह्यात विद्यापीठे आहेत. विविध सरकारी, बिनसरकारी, उपसमित्या, समित्या आहेत. कुणाच्या हातात पेपरांचे कोलित आहे, कुणाकडे उपद्रव-मूल्य आहे, कुणाकडे माणसे भुंकवण्याची शक्ती आहे, कुणाकडे खरी खोटी निनावी-धमकीची-अश्लील पत्रे खरडवून घेण्याची गुंडशक्ती आहे. आणि द्रव व द्रव्यशक्ती हे तर त्यांचे लखलखते शस्त्र आहे. अशांच्या गर्दी घोळक्यात, का आपण वावरतो-मिसळतो ? हा माझाच मला फटकारा असतो. माझ्याच मनाच्या काठाकाठाने मी एखाद्या किड्यासारखा हिंडतो.

थोड्या कळत्या वयापासून दहा-अकरापासूनच आई-वडिलांपासून दूर राहिलो. नात्यांच्या म्हणणाऱ्या माणसात परका हरकामी नोकर बनून वावरलो. कुणाबद्दलच मनात खूप आस्था माया ममता नसतानाही, निसर्ग नियमाप्रमाणे, संसाराच्या चक्राअपघातात प्रेमाब्रिमातही पडलो. सगळे घडत होते. पण मन फुलत नव्हते. खूप आनंदी व्हावे, उमलून उरभरून खळखळावे, असा उत्कट कधी अनुभवच मनाने घेतला नाही. अंधारात निरुद्देश काजवा टिमटिमावा, तसा मनीच्या अंधाराचा, हवे नकोचा थांग लागलाच नाही..

संतमहंतांच्या सारखे निर्विकारपण अनुभवणे शक्यच नव्हते. आणि हुशार व्यावहारिक



अनुक्रमणिका







प्रापंचिक गणितेही मांडता आली नाहीत. शेकडो वेळा माणसे आली. राहिली. जेवली. माझ्याच मूर्खपणाच्या खऱ्याखोट्या चिंध्या धांदोट्या उडवून गेली. आत विव्हळ-जखमी होण्यापलिकडे, नव्याने नवी चूक करण्यापलिकडे फार जमले नाही.

काय शोधतो आपण ? काय शोधतो माणूस ? का जमवतो माणसे-नातलग ? का जातो लग्नाप्रेताला ? असे अनंत प्रश्न विचारीतच, मला प्रश्नांनीच वेटोळे घातल्याचा प्रत्यय येतो.

कुठल्याही वाटेने-रस्त्याने गेले तरी पुढे असतो एक बंद पहाडपर्वत. आणि त्यापुढेही असते आणखी एक नवी वाट. ही कधी मनातून फुटते. मनातच फुटते. वेगळेपण शोधता शोधता मनही फाटते. मनाचे जगण्याचे आपल्या आणि समग्रांच्या अस्तित्वाचेच कोरेपण, ह्या प्रश्नांनी झाकोळून टाकले आहे. काय अफाट आहे ? काय अथांग आहे ? माणूस की अपेक्षा ? इच्छाशक्ती की आसक्ती, त्यागोत्कटता की भोगसंतृप्ती ? ती तरी अंतिम की तोही भासच ? आपण कोणीतरी, कोणाचे तरी, कोणासाठी तरी कशासाठी तरी असतो जगतो ? ह्या सगळ्या गुंत्यातून ही कविता आली आहे.

कविता लिहिताना बाहेर प्रचंड पाऊस होता. घरामागल्या कळकांच्या झाडांवर त्याचा एक उत्तप्त सू: लागला होता. पूर्वीच्या काळी एखादा नरबळी देताना, जसे ढोल वडवले जात, तसा तो आवाज वाटत होता. दुसऱ्या खोलीत बायको-मुले झोपली होती. फॅन घुमून घुमून फिरत होता. दूर कुठे तरी कुत्रे रडत होते. माझे बहुतेक लेखन हे रात्री ११-११ ॥ ते कधी पहाटे ५-५ ॥ पर्यंत चालते. कधी एकच कविता एवढा वेळ पुरते. कधी कथेचा अनुभव पुरतो. केव्हा एखाद्या कादंबरिकेच्या पूर्तीलाही हा समय पुरे होतो. 'थांग अथांग' ही कविता ४/५ ऑगस्टच्या मावळत्या-उगवत्या रात्रीचे वजन घेऊन सुचली.

ही कविता मुक्तरचना पद्धतीने लिहिली. मला सहजगत्या अन्त्ययमक सुचते. कधी पहिली ओळ दुसरीशी आणि तिसरी चौथीशी एकरूप होत येते. ह्या कवितेची बैठक दीर्घ होती. पण तरी ती एकाच बैठकीत पूर्ण झाली. आतून सुचलेल्या शब्दांची तेथेच पुनर्रचना किंवा व्यवस्थापन करण्याचे काम तेवढे करावे लागले. मनात जे साचलेले अडलेले असते त्यासाठी लेखनाभिव्यक्तीचा प्रयत्न असतो. जे उत्स्फूर्त वाटते त्यामागेही चिंतनाचे पाठबळ असतेच. आता आपले हे चिंतन, किती मूलगामी व सर्वस्पर्शी उतरले आहे; याचा निर्वाळा, पुढे केव्हातरी मिळण्याची अपेक्षा धरायची.

समीक्षक-टीकाकार किंवा सहवाचक यांच्या प्रतिक्रिया विचारायला मी कधीही जात नाही. प्रकाशक पुस्तके प्रकाशित करतात. वेगवेगळ्या ठिकाणी वाटले तर अभिप्रायाला पाठवतात. एक दोन-चार निवडक मित्रांना मी कधीतरी अपवादानेच पाठवतो. वाचकांची पत्रे-प्रतिक्रिया येतात. पण त्याबाबत मला खूप जागरूक राहावे असे वाटले नाही. काही परिचितांनी व विद्यार्थ्यांनी एम.ए. संशोधनशास्त्राच्या पेपर्ससाठी, काहींनी एम. फिलच्या अभ्यासासाठी तर एक-दोन अन्य विद्यापीठांतील संशोधक विद्यार्थ्यांनी संशोधनासाठी लेखक म्हणून माझी निवड त्यांच्या मार्गदर्शकाच्या सल्ल्याने केली आहे. त्यांनी मागितले तर



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



पोस्टाने काही माहिती पाठविण्याचे काम तेवढे मी केले आहे.

माझ्या कवितेवर हरीश खंडेराव, सुधाकर गायकवाड इत्यादिकांनी जरा विस्ताराने लिहिले आहे. एक-दोन मधल्या ताकदीच्या समीक्षकांनी वि.स. जोग आणि प्रा. म.सु. पाटील यांनीही लिहिले आहे. डॉ. ललिता कुंभोजकर यांनीही परामर्श घेतला आहे. पण जोग यांनी मार्क्सवादी समीक्षा केंद्रस्थानी मानली आहे. प्रा. म. सु. पाटील पक्षपाती समीक्षक प्राध्यापक आहेत. ते यशवंत मनोहर यांच्या कवितेचे ज्या कारणामुळे फार समर्थन करतात नेमके त्याच कारणामुळे माझ्यावर हल्ला करतात. हल्ला करायला हरकत नाही. ते स्वातंत्र्य आहेच. पण आत्मविरोधी भूमिका असणाऱ्या समीक्षकाला काय म्हणायचे ?

खूप लेखक कवींच्या आणि समीक्षकांच्या संबंधांबद्दल व तत्सम प्रसिद्धी प्रकारांबद्दल जे अनुभवाने जाणवते ते स्पष्ट लिहायला हवे. माझ्या अन्य लेखांमध्येही, यातील काही गोष्टी मी नोंदविल्या आहेत. मराठी समीक्षकांचे वाचन अत्यंत मर्यादित आहे. त्यांच्या चांगले-वाईट अशा तयार फूटपट्ट्या आहेत. मौज गटाचा, पॉप्युलरचा, मॅजेस्टिकचा, श्रीविद्याचा लेखक वगैरे असला, की 'फारच थोर ग्रंथाली तर ग्रेटच. ह्यापलिकडे ते फार जात नाहीत. येणारी ६०% टक्के पुस्तके रंजनपर किंवा दुय्यमच असली तरी काही, वेगळीही असू शकतात. ती मिळवून वाचलीच पाहिजेत; असे दिसत नाही. कुणी भेट पाठविले. मग चार-सहा वेळा चकरा मारल्या, फोनने संपर्क साधला, निरोप पाठविले, की मग हे लिहिणार. ह्या चक्राने जाणारेही, कितीतरी 'नामवंत' होत जाणारे, मला खूप जवळून परिचयाचे आहेत. त्यामुळे ह्याबाबत कदाचित नको तितका 'उदास' असणेही शक्य आहे. पण मी स्वतःला टोळीवाला किंवा कंपू गटवाला मानत. म्हणवत नाही. मनालाच ते भावत नाही. त्यामुळे हा भाग अप्रस्तुत ठरावा.

ही कविता, ज्या कथासाहित्य कवितांची मध्यमवर्ग, वरिष्ठ मध्यमवर्ग व दूरदर्शन रेडिओ वगैरेंचा चाहता आसुसून वाट पाहतो. तरफदारी करतो. वेगवेगळ्या हेतूने यंत्रणाही ज्यात गुंतल्या, गुरफटलेल्या असतात त्या प्रकाराची ही कविता नाही. प्रत्येक संसारी, अनुभवी व्यक्तीला प्रतीत होणारा हा सनातन अनुभव आहे. म्हटले तर संपूर्ण माझा स्वतःचा व्यक्तिगत. त्यामुळेच समावेशकही. म्हणून 'थांगअथांग' ही कविता मला विशेष आवडते. त्यातील प्रतीक प्रतिमाची सहज आंतरलय आणि मोकळे आविष्करण ह्याच्या एकात्मतेमुळे ही कविता माझी एक आवडती कविता आहे.

—केशव मेश्राम, ४. फुलराणी, साहित्य सहवास, बांद्रा पूर्व, मुंबई ५१



अनुक्रमणिका







# बैल : एक 'अमृतानुभव'

वसंत सावंत

**बैल**

*सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून*
*डुरकत फिरणारा एक कलंदर बैल*
*उभ्या शिंगाचा*
*कोल्या रंगाचा*
*मस्तीला आलेला*
*घळणीच्या लाल मातीत खळणीस येणारा*
*चौखूर उधळतो आहे माझ्या रक्ताच्या कणाकणांवर !*
*उभे आकाश पितात*
*त्याचे नशावाज डोळे*
*लसलसते उग्र मस्तकी*
*वज्राचे बेगुमान पाणी*
*डोईवर चंद्रमा फलकता*
*कराल दाढांना पुरत नाही*
*हिरवे लुसलुशीत गवत*
*त्याची मातीशी मस्ती*
*मातीच होते मस्ती त्याच्या संगमांत*
*हुस्कारात प्रणव_ॐ कार_*
*वर्शिड घोळवीत बाहुबल अजमावणारी त्याची खानदानी चाल*
*आदब,*
*रिमझिमत असते या मनात*
*बैल : पिढ्यापिढ्यांचा पोशिंदा माझा*
*शक्तीचा सम्राट*
*माझ्या रक्तामधून, शब्दांमधून*
*उसळत राहते रोज*
*एक अनाम शक्तीची लाट*

*बैल*

('स्वस्तिक'– ति.आ.पृ.६०)

संपादकांनी, प्रसिद्ध वा अप्रकाशित कवितांपैकी आपली सर्वांत प्रिय कविता तिच्या जन्मकथेसह मागितली आहे. आजवर लिहिलेल्या माझ्या सर्व कविता मला प्रिय आहेत. असणार. पण जाणकार रसिकांच्या मतांचा हवाला घेतल्यास माझ्या या 'बैल' कवितेबद्दल मी लिहिणे नाही म्हटले तरी बरेचसे आत्मप्रौढीचे होणार. रसिक वाचकांची क्षमा मागून पुढील मजकूर लिहित आहे.

आज माझ्या हाती 'स्वस्तिक' या माझ्या पहिल्या गाजलेल्या, 'केशवसुत पारितोषिक'-विजेत्या कविता संग्रहाची तिसरी आवृत्ती आहे. 'देवराई' हा नवा संग्रह छपाई पूर्ण हाती यायला झाला आहे. 'स्वस्तिक' 'उगवाई' आणि 'देवराई' या सर्व संग्रहातील अनके कविता वेळोवेळी रसिकांच्या आदराला प्राप्त झाल्या आहेत. त्यात मी 'बैल' कवितेवर लिहावे असे वाटले, याचे प्रमुख कारण, 'बैल आणि इतर कविता' असे नाव पहिल्या संग्रहाला द्यावे असे माझे व कविमित्र मनोहर नाईक यांचे एक खास मत होते. श्री. रामदास भटकळांनी, 'नवे कवीः नवे कविता' या मालेसाठी जेव्हा माझी निवड केली; तेव्हा मूळ वहीचे जे 'स्वस्तिक' नाव होते तेच कविता संग्रहाचे नाव म्हणून अन्यत्र छापल्याने 'स्वस्तिक' हेच नाव संग्रहास दिले गेले. त्याने माझे काही नुकसान झाले नाही. उलट ते शुभसूचकच ठरले आहे. तरीही आणखी काही जाणकार मित्रांच्या मते, आमचाही एक 'बैल आणि इतर कविता' असा एक वेगळा पंथ झाला असता. अर्थात 'पंथ' ISM वगैरे गोष्टी माझ्या प्रकृतीला मुळीच मानवणाऱ्या नाहीत. मी त्या वेळी या मित्रांना निवडक कविता संग्रहाला ते नाव देऊ असे आश्वासन देऊन ठेवले आहे. अर्थात कवी म्हातारा वगैरे झाल्यावर त्याचे निवडक कवितांचे पुस्तक निघताना दिसते ! आपल्याला त्यासाठी खूप वेळ आहे.

या 'बैल' कवितेचा जन्म 'उगवाई'च्या धारेखाली माझ्या फोंडाघाट या गावी १४ एप्रिल १९६५ रोजी झाला. म्हणजे या कवितेला आता २५ वर्षे झाली आहेत. बैल जसा माजाने हुस्कारत राहतो तसा मी अनेक दिवस 'बैल'च्या अनुभवाने हुस्कारत होतो. संपूर्ण काही जो बैल पाहिला, अनुभवला तसाचं तो शब्दांत पूर्ण उतरला आहे असे मला वाटत नाही. शब्दांच्या माध्यमाची मर्यादा मला अनेक दिवस डाचत होती. अजूनही डाचते. हीच मर्यादा मला सावंतवाडीचा धुवांध, दिशा पुसून टाकणारा पाऊस पाहिल्यावर कळली. म्हणून त्याचे वर्णन 'शब्दांत पकडता येत नाही इतका पाऊस' असे केले आहे.

काही काही जीवनानुभव कवीला भाग्याने लाभत असावेत. त्यांपैकी 'बैल' कवितेचा अनुभव आहे असे मला वाटते. माझे अख्खे बालपण फोंडाघाटाला गुरावासरांत, बैलांसमवेत गेले. कोकणातील शेतकऱ्यांच्या घरात माझा जन्म झाला. या घराला अनेक परंपरांचा वारसा लाभलेला. आमच्या गोठ्यात असे घरच्या गायींचे अनेक पाडे, बैल तयार झाले. त्यांनाही एक परंपरा होती. बाळपणी मी लहान असताना वडील चार जोतांची शेती कसत. एकत्र कुटुंबात











मी वाढलेला. आसपास बैल आणि शेतीची अवजारे. पुढे शिकण्यासाठी मालवण, मुंबई अशी भ्रमंती. या शहरी जीवनाचे पाणी पिऊन मानाने प्राध्यापकी लाभली तीही सावंतवाडीला. कोकणात सुटीत गावी फोंडाघाटला मुक्काम. शेती चालू. धुळवाफीची भात पेरणी आणि मृगाचा पहिला पाऊस पडल्यावर उकळ करून परत सावंतवाडीला प्राध्यापकी करायला यायचो.

उन्हाळ्यात प्रातर्विधी पाण्याचा लोटा घेऊन करायचा एक वेगळा अनुभव. अशा वेळी, वसकन नरकडी बैल अंगावर येण्याचा काही अनुभव इथलाच. उन्हाळ्यात बैल मोकळेच. त्यांना पेरणीपासून फक्त लावणीपर्यंतचे काम. बाकी फिरायला मस्त मोकळे. उन्हाळ्यात शेजारच्या 'उगवाई' नदीच्या घळणीत खळणीस येणाऱ्या बैलांचे सूर्योदयाच्या वेळी होणारे दर्शन काही वेगळेच. असा पूर्ण झालेला, डुरकणारा बैल पाहणे हा एक अमृतानुभव म्हणता येईल. पेंड खाऊन झुंजण्याखेरीज आणि गायींपाठीमागे फिरण्याखेरीज दुजे काम नाही. घराशेजारच्या मळ्यात अगदी नव्या पाड्यांची एखाद-दुसरी झुंज लागलेली दिसायची. मी तर लहानपणापासून अशा बैलांना अडवून झुंज लावण्यात व अंगावर कळी घेण्यात पटाईत.

प्राध्यापक झाल्यावर आणि सुधारलेले संडासाचे नवे घर बांधल्यावरही नदीला जाणे एक छंद- अशा वेळी, मळ्यात कोल्या रंगाच्या आमच्या आणि शेजाऱ्यांच्या पाड्यांची फर्स्टक्लास झुंज लागलेली एका पहाटे सूर्योदयाला पाहिली. आणि मीच आमच्या पाड्याच्या रूपाने झुंजतो आहे असे वाटले. लहानपणी छोट्या पाड्याला गुडघ्यावर झुंजायला, शिकवायचो, कुरवाळायचो. तसे त्या बैलाला धरून, लहान मुलाला खुवळावेसे वाटते, तसे मला वाटले. ती झुंज नव्हतीच; अखंड चैतन्याच्या लयींची ती धुमश्चक्री होती असे म्हणता येईल. ही झुंज सूर्य चांगला कासराभर येईपर्यंत चालली होती. 'बैल' मोडेल म्हणून ते शेजाऱ्यांकडून सोडवण्यात आले. बैल धुमसत होते. मी काहीसा झाळीआड लपून ते पाहत होतो. डुरकणारा बैल, खळणीस येणारा बैल, वाकर धरणारा बैल, मला पुन्हा इथे नव्याने दिसला. जो मी लहानपणापासून पाहिला होता. अनुभवला होता. त्याचे लयबद्ध, चैतन्यशाली, रेखीव रूप मनात साठवत आलो होतो. त्याला उजाळा मिळाला.

त्याच्या जोडीला आदल्यावर्षी 'उगवाई' परिसरातील 'हसणे' गावी बैल खरेदीसाठी गेल्यावर खोप भरून उरलेला 'वैल' मी पाहिला. तो मी कधीच विसरू शकत नाही. त्याचा काळा तुकतुकीत रंग इतका सुंदर असू शकतो हे मला तेव्हा कळले. त्याची उंभी त्रिशूळासारखी क्वचित बाकदार शिंगे, डोईवरचा चांद आणि गुडघ्यांवरच्या चंद्रखुणा मला खूप काही सांगून गेल्या. या बैलाचे लयबद्ध भरदार, वशिंड माझ्या डोळ्यांत रूतून बसले आहे. आणि खोप हलवणारे डुरकणे कानात अजूनही घुमत असते. आमच्या मदनग्या आणि मोऱ्या बैलांची गव्हाणीत अधून मधून लागलेली झुंज मी अजूनही अनुभवतो. अशा अनेक बैलांचे रसायन होऊन 'बैल' कवितेत त्याचे रूप उतरले असावे असे मला वाटते.

ही 'बैल' कविता मला ती झुंज पाहिल्यावर सुचली. लिहायला १५ ते २० मिनिटांहून



अनुक्रमणिका






अधिक वेळ लागलेला नाही. तरीही अजून बरेच काही सांगायचे राहिल्याची रूखरूख लागली होती. पहिल्या एक-दोन ओळी ओठांवर आल्या. त्या गुणगुणत कविता लिहायला सुरवात झाली. पुढील संपूर्ण कविता सलगपणे अलगद कागदावर उतरली. माझ्या याहून मोठ्या दीर्घ कविताही अशाच पावसासारख्या सहज कागदावर उतरतात. वाटते, या कविता अगोदरच मनाच्या कागदावर लिहिलेल्या असाव्यात. त्या प्रत्यक्ष कागदावर येतात एवढेच. लयीच्या दृष्टीने क्वचित एखादा शब्द इकडचा तिकडे करावासा वाटला तर. पण पहिल्या झटक्याला येईल तेच खरे असा अनुभव. मात्र अशी कविता होण्यासाठी नेमका एखादा तो अतर्क्य क्षण यावा लागतो. जसा ही कविता लिहिताना 'झुंज' पाहिल्याचा ! 'झुंज' पाहिल्यावर लिहिल्याशिवाय राहवेना अशी काही मनाची उत्कट अवस्था झाली होती. एक झपाटलेले झाड असावे तसा झालो होतो.

या कवितेचा छंद, विशिष्ट शब्द निर्मितिप्रक्रियेत सहजपणे लगडून आले. त्यासाठी इकडचा शब्द तिकडे करावा लागला नाही. मुळात 'स्वस्तिक'च्या पहिल्या आवृत्तीत शेवटचा 'बैल' शब्द गाळला होता. वाच्यलयीच्या दृष्टीने तो आवश्यक होता. ही बाब श्री. प्रभाकर पाध्ये यांनी त्यांच्या घरी झालेल्या काव्यवाचनाच्या वेळी लक्षात आणून दिली. दुसऱ्या व तिसऱ्या आवृत्तीत तो घातला आहेच. 'कोल्ह्या' रंगाचा म्हणण्याऐवजी आमच्या कुडाळी किंवा मालवणी बोलीतील 'कोल्या' रंगाचा शब्द सहज लयीत आलेला आहे. तो अर्थातच अधिक जिवंत व स्वाभाविक वाटतो. काही प्राध्यापक मित्र-मैत्रिणींनी 'कोल्या रंगाचा' 'कौलाच्या रंगाचा' असा अर्थ लावून कविता शिकवल्याचे ऐकले म्हणून हे नम्र निवेदन.

या 'बैल' अनुभवाची आणखी काही रूपे माझ्या इतर कवितांतून उमटलेली दिसतील. कारण तो माझ्या जाणिवेचा एक भाग होऊन राहिला आहे. आमच्या वलाटीला सह्याद्रीच्या पायथ्याशी जी गावे आहेत तिथले बैल लावणीचे काम आटोपले की सह्याद्रीला चरणीला घालतात. पहिल्याने खांदे मळणी होते. बैलांना गोडधोड खाऊ घातले जाते. त्याला ओवाळतात. खास विश्रांती देतात. आणि मग दसऱ्यापर्यंत– भात कापणी होईपर्यंत– सह्याद्रीला खास चारा मिळण्यासाठी धनगराकडे पाठवणी केली जाते. तिथे कधी वाघाशी गाठ. असा 'बैल' वाघाशी झुंजून आल्यावर, रूद्र रूपात गोठा हलवीत कसा डुरकतो याचे एक रूप 'मी स्कायलॅबसारखा कोसळतो तेव्हा' या माझ्या रसिकमान्य कवितेत चितारले आहे. दिल्लीच्या 'राष्ट्रीय कवि संमेलना'च्या वेळी तिथल्या शहरी भाषांतरकर्त्यांना या ओळींचे भाषांतर येईना असा अनुभव गाठी आला.

*"बैल वाघाशी झुंजून कसा परत येतो*
*आणि*
*डुरकतो*
*जख़मा पाजळीत*



अनुक्रमणिका

*गोठा हलवीत-"*

अशा रूपात तो भेटेल आमचा मदनग्या बैल असा वाघाशी झुंजून परत आला होता.

तसेच, आमच्या कोकणात काम करून म्हातारा झालेला 'बैल' आपल्या गोठ्यातच मरू देतात. तो कसायाला विकायचा नसतो असा एक संकेत आहे. सावंतवाडीला आल्यावर, आजरा-आंबोलीमार्गे असे घाटावरून खाटिकखान्याला विकलेले बैल नेताना मी पाहिले. त्यांचे एक चित्र 'तो एक आणि तो एक' या कवितेत आलेले दिसेल-

*"उपरलच्या रस्त्यावरून खूपसे बैल*
*आणि झालेली जनावरे,*
*हाकाऱ्यापुढून मोन्याने खुडूखुडू जात असतात-*
*मृत्यूच्या दाढेत, गोव्याच्या खाटिकखान्यात*
*जातानाही हिरवळीवर चरत चरत जातात*
*ज्यांनी धरती गरती केली आणि आपला घाम दिला ।*
*लाल लाल रक्त दिले-"*

असे ते चित्र आहे. असो.

आपण काही महत्त्वाची कविता लिहिली आहे याची जाण मला अनेकदा येते. पण तिच्या संपूर्ण परिमाणांची संगती रसिकांच्याच सान्निध्यात लाभते. मी काही नवे चांगले लिहिले आहे, ते पारखणाऱ्या जाणकार रसिकांची इथे नेहमीच उणीव. कित्येकदा सुंदर कविता लिहावी आणि ती वाचून दाखवायला समर्थ रसिक नाही याची खंत अनेकदा अनुभवतो. 'बैल' कविता लिहिली आणि ठेवली. जूनमध्ये कॉलेजला सावंतवाडीला आल्यावर त्या वेळचे एस.टी.डेपो मॅनेजर, 'गीत'कार कविमित्र श्री. मनोहर नाईक भेटले. त्यांना ती कविता वाचून दाखवली. त्यांनी पाठ थोपटली. मला म्हणाले, "अर्वाचीन मराठी काव्यात केशवसुतांपासून अशी कविता लिहिलेली नाही. ही कविता तुम्हाला नाव देईल. असे अमर काव्यशिल्प लिहिल्याबद्दल मला तुमचा अभिमान वाटतो." अर्थात मी मोहरून गेलो. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणे ही कविता 'सत्यकथे'कडे पाठवून दिवाळी अंकात प्रकाशित करावी, श्री. राम पटवर्धन यांचे काय मत होते, ते पाहावे असे अर्थातच वाटले. इतक्या दुरून कविता यशस्वी की अयशस्वी हे अजमावण्याचा तेवढा एक मार्ग होता. पण पुढे माझ्या गाजलेल्या काही कविता जशा पटवर्धनांना आवडल्या नाहीत नेमके तसेच झाले. पटवर्धनांना ही कविता तेवढीशी आवडली नाही. माझ्या स्वभावाप्रमाणे आम्ही 'सुखसंवाद' केला. म्हणजे भांडलो. कविता उचलली आणि परत आणली. 'सर्वच मोठ्या कविता मला समजतात, समजाव्यात असा तुमचा आग्रह का?' असं ते म्हणाले. कवीचा राग घालवण्याचा तो एक त्यांचा उत्तम मार्ग होता. त्यांनीच माझ्या अनेक कविता आग्रहपूर्वक छापल्या होत्या. पुढे 'मनोहर' फेब्रु ६७ च्या अंकात ही बैल कविता श्री. मुकुंदराव किर्लोस्करांनी प्रकाशित केली.



अनुक्रमणिका







सुरुवातीपासून ही कविता, तिचा आशय आणि अभिव्यक्ती-काही वेगळी आहे याची चाहूल वाचून दाखवलेल्या अनेक रसिकांकडून मिळाली. त्यात सावंतवाडीहून जवळ असलेले कविवर्य बा. भ. बोरकर, शंकर रामाणी, प्रल्हाद वडेर, प्रा. गोपाळराव मयेकर, डॉ. गं.ब्र. ग्रामोपाध्ये, वसंतराव माने, प्राचार्य वाघ, मित्रवर्य माधवराव गडकरी आणि मधु मंगेश कर्णिक इ.नी कविता आवडल्याची तत्काळ दाद दिली. प्रा. गोपाळराव मयेकर त्या वेळी गोव्याचे शिक्षणमंत्री होते. त्यांच्या व माधवराव गडकऱ्यांच्या प्रेरणेने गोव्यात अनेक साहित्यिक कार्यक्रम व्हायचे. मला आणि कविमित्र मनोहर नाईकांना ती एक पर्वणीच वाटायची. मंगेशीच्या परिसरात के. नारायण काळ्यांच्या अध्यक्षतेखाली जो साहित्यमेळावा झाला त्यात ही कविता मी जाहीर रीतीने प्रथम वाचली. 'भविष्यकाळात वसंत सावंत आणि आनंद यादव हे दोन साहित्यिक अग्रक्रमाने मराठी साहित्यात नाव काढतील.' हे कविवर्य बोरकरांपाशी श्री. के. नारायण काळ्यांनी काढलेले उद्‌गार मला अजूनही स्मरतात. मेळावा आटोपून येताना नाईक हातावर टाळी देत अभिनंदन करीत होते.

काही काही कवितांचे भाग्य वेगळेच असते. त्या लिहिताना पुढे त्या एकप्रकारचा आपला म्हणून इतिहास घडवतील याची मुळीच कल्पना येत नाही. मुंबईला असताना प्रा. ल.ग. जोग भेटले. माझ्या कवितेवर जोग सरांचा जीव असे. खरं म्हणजे तसा मी प्रत्यक्ष रूपारेलचा विद्यार्थी नव्हतो, पण माझे मित्र आत्माराम शेट्ये आणि श्रीपाद भागवत या त्यांच्या दोन विद्यार्थ्यांमुळे मी त्यांना परिचित झालो. पुढे एम.ए.ला त्यांनी आम्हाला प्रत्यक्ष शिकविले. या प्रा.ल.ग.जोगांनी आपल्या रूपारेल कॉलेजमध्ये पहिला 'व्होकल मॅगेझिन'चा प्रयोग केला. त्याला कवी म्हणून मी, दिलीप चित्रे, शांताराम जोग इत्यादिंना खास निमंत्रित केल्याचे स्मरते. डॉ. प्रल्हाद वडेर यांनी आपली कथा वाचली. प्रा. ल.ग. जोग हे पर्यत्सुक रसिकाचा जीव लाभलेले एक आदर्श रसिक होते. साहित्यासंबंधी काही मौलिक आणि वेगळे विचार मांडणारे म्हणून मला ते आवडत. त्यांचे टीकाग्रंथ त्यामानाने उशिरा प्रकाशित झाले. 'आभाळाचा रंग निळा' हे माझ्या एका कवितेचे नाव त्यांनी कादंबरीला दिले आहे. त्यांनी 'लावण्यवेल' या त्यांच्या समीक्षा ग्रंथात अनिल-मर्ढेकरांपासून १८ कवींवर जे लेख लिहिले आहेत, त्यात 'बैल' वरचा पहिला स्वतंत्र लेख रसिकांनी अवश्य पाहावा. (पृ.९६ ते ९९) या संग्रहाची 'प्रायोगिक समीक्षा' ही प्रस्तावना जोगांच्या मतांचा वेगळेपणा दर्शविणारी आहे.

या 'बैल' कवितेने प्रारंभी शिवाजी विद्यापीठाच्या एफ.वाय. बी.कॉम. च्या मराठीच्या पाठ्यपुस्तकात धडक मारली. माझा 'स्वस्तिक' हा कविता संग्रह यायच्या पूर्वीच कवी म्हणून मला मान्यता मिळालेली होती, असे म्हणता येईल. संग्रह ६५-६६ पासून निघत होता. तो ७३ ला आला. त्यापूर्वीच राज्यपातळीवरील कविसंमेलनांची निमंत्रणे मला यायची. महाविद्यालयातून व आकाशवाणीवरील काव्यवाचनातून 'बैल' या कवितेचे रसिकांच्या आग्रहाने वाचन होत असे. एकदा मला नाईकांनी मजेत विचारले, "काय बैल कवितेने तुम्हाला कीर्तीबरोबर किती पैसे दिले ?" मी त्यांना गमतीने उत्तर दिले, "या काव्यवाचनाच्या व

पाठ्यपुस्तकांतून अंर्तभूत झालेल्या वेळोवेळीच्या मानधनाचे पैसे अनेकदा नवा बैल घेऊन उरतील एवढे मिळाले आहेत." दिल्ली आकाशवाणीच्या २६ जाने.च्या 'राष्ट्रीय कविसंमेलना'साठी गोवा आकाशवाणीने 'बैल' कविता पाठवल्याचे स्मरते आहे. अर्थात त्या वेळी या कवितेला तो मान मिळाला नाही. पुढे १९८० साली 'मी स्कायलॅबसारखा कोसळतो तेव्हा' या कवितेला मिळाला.

परंतु 'बैल' कविता सारखी लोकप्रिय होत असल्याची खूण, डॉ. भालचंद्र फडक्यांनी 'युवक-भारती' १२ वीला तिला अभ्यासात अंतर्भूत केल्यावर अधिक निश्चितपणे मिळाली. १२ वीला ती सहा वर्षे अभ्यासात होती. त्यामुळे नागपूरपासून गोव्यापर्यंत महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर तिला प्रसिद्धी मिळाली असे म्हणता येईल. १२ वीच्या विद्यार्थ्यांना 'बैल' कविता लिहिणारा कवी 'आहे कसा आननी' तो पाहावसा वाटला. अगदी मुंबईच्या रूपारेल विद्यालयातील विद्यार्थ्यांना सुद्धा !

कविता ही एक अद्‌भुत 'वस्तू' आहे याचा साक्षात्कार मला प्रारंभापासून सतत होत आला आहे. कवितेसाठी मी सतत झुरत असतो. ती माझ्या श्वासाइतकीच प्रिय गोष्ट आहे. कविता लिहायला लागल्यापासून माझ्या कवितेवर प्रेम करणारे मला अनेक मित्र मिळाले. या मित्रांच्या अपार कौतुकामुळे मी सुसाटत लिहीत गेलो. त्याबरोबरच पुढे जसजसा मान्यवरांशी संबंध आला त्यानेही मी भारावलो. माझा 'स्वस्तिक' संग्रहही काव्यरसिकांच्या आदरास प्राप्त झाला. तो बऱ्याच उशिरा आला. त्याला राज्य सरकारचे 'कविवर्य केशवसुत पारितोपिक' लाभले. महाराष्ट्राचे थोर समीक्षक प्रभाकर पाध्ये यांच्या घरी झालेल्या पुण्यातील जाणकार लेखकांच्या समोरच्या 'काव्यवाचना'त तिने काही वेगळाच साक्षात्कार मिळवून दिला. आदरणीय पाध्ये मला म्हणाले, "तुमच्या कवितेला सुरूच्या झाडाचे टोक आणि बैलाचे वशिंड आहे."

१९७१ चे कविवर्य बा. भ. बोरकरांच्या अध्यक्षतेखाली झालेले महाबळेश्वरचे साहित्य संमेलन आटोपून येताना वाईपासून पुण्यापर्यंत आदरणीय तर्कतीर्थांचा सहवास लाभला. संमेलनाच्या रात्री कवी अनिलांसह त्यांचाही. या संमेलनात श्री. शंकर सारडांमुळे सहभागी झालो होतो. अखंड पुण्यापर्यंतच्या प्रवासात शास्त्रीबोवा मला सहन करत होते. मी कविता म्हणत होतो, ते दाद देत माझ्या कविता ऐकत होते. पुण्याला उतरल्यावर त्यांना नमस्कार करून निघताना ते मला म्हणाले, "तुमचा संग्रह येवो न येवो पण तुमची एक 'बैल' कविता जरी तुम्ही लिहिली असती तरी मी तुम्हाला महाकवी मानले असते."

या सर्वांवर कळस म्हणजे इचलकरंजीच्या साहित्यसंमेलनातील 'बैल' कवितेचे वाचन. या अ. भा. म. साहित्यसंमेलनात मी डॉ. भीमराव कुलकर्णी आणि डॉ. मालशे यांच्या आग्रहामुळे 'कविसंमेलनात' सहभागी झालो होतो. 'स्वस्तिक'ला त्या वर्षी पारितोपिक लाभले होते संमेलनाध्यक्ष पु ल. देशपांडे, कविसंमेलनाचे अध्यक्ष कविवर्य बा.भ. बोरकर आणि ख्यातनाम समीक्षक रा. श्री. जोग स्टेजवर होते. कविसंमेलन कुठेतरी रेंगाळत होते ! अशा वेळी माझ्या नावाचा बोरकरांच्या अनुज्ञेने मा. पु. ल. देशपांडे यांनी पुकारा केला. १९५८ च्या मालवण

साहित्य संमेलनानंतर, एवढ्या प्रचंड कविसंमेलनात मी सहभागी होत होतो. माझ्यापूर्वी कविता वाचलेले सर्व कवी निष्प्रभ ठरले होते. हा एक कसोटीचाच क्षण होता. पहिल्याने मी सुंदरवाडी उर्फ सावंतवाडी ही कविता वाचली. ही कविता ऐकून स्टेजवरील पु.ल., रा.श्री.जोग आणि कविश्रेष्ठ बोरकर यांनी आपले चष्मे काढून ठेवल्याचे दृश्य मी आजही पाहतो. अशी दादच विरळ. यानंतर 'बैल' कवितेने तर कहरच केला. टाळ्यांच्या कडकडाटात मी स्थानापन्न होत होतो. पुढचे कविसंमेलन चढत्या क्रमाने रंगत गेले. पुढचे आणि संमेलनानंतरचेही दिवस मला कवी म्हणून चिरंजीव करून गेले असा तो दिव्य क्षण होता. अभिनंदनाच्या वर्षावात मी नाहात राहिलो. पुढे बरीच पत्रे येत राहिली. या कवितेने रसिक मनात आपले म्हणून एक स्थान निर्माण केल्याची ती निदर्शक होती. डॉ. वि भा. देशपांडे, दिनकर गांगल, डॉ. स. रा. गाडगीळ हे रसिकवर मला इथे मिळाले. रात्रौ पु. लं नी कुमार गंधर्वांचा खास परिचय करून दिला आणि पुढे त्यांच्याशी एक हृद्य नाते जमले.

'स्वस्तिक' संग्रह वाचून ज्या मान्यवरांनी मला 'बैल' आवडल्याचे लिहिले त्यात कविश्रेष्ठ कुसुमाग्रज, द. रा. वेंद्रे, डॉ. उषाताई देशमुख, पु. शि. रेगे अशी नावे सांगता येतीलच, पण प्रा. रमेश तेंडुलकर, कविवर्य पाडगांवकर, वसंत बापट, विंदा करंदीकर, कुलगुरू प्राचार्य राम जोशी, अशोक जैन या सर्वांचा उल्लेख करावा लागेल. समीक्षक प्रा. म. वा. धोंडांना 'बैल' वाचून हिराटोड्सचा बैल आठवला.

अशी ही 'बैल' कविता. तिच्या रूपाने मी माझ्याच आतल्या उर्मीचे-ऊर्जेचे एक रूप मराठी साहित्यात कोरून ठेवले आहे असे माझा एक मित्र म्हणतो ते खरे असावे. ही कविता आज 'उपयोजित समीक्षा' या मुंबई विद्यापीठाच्या एम. ए. मराठीच्या पेपरला अभ्यासाला आहे. या पेपरला ज्ञानेश्वरांपासून आजपर्यंतचे अकरा कवी आहेत. माझा अकरावा नंबर आहे-

(डॉ. वसंत सावंत, ६६१ वाळके हाऊस, उभा बाजार, सावंतवाडी.)








# मी धात्री, मी धरित्री

लक्ष्मीकांत तांबोळी

*मी धात्री, मी धरित्री*
*मातृत्व माझा धर्म,*
*रुजवणं आणि वाढवणं एवढंच कळतं मला*

*आजवर कधी रडले नाही*
*कधी काही मागितले नाही*
*मागणं माझा स्वभावच नाही !*
*देणं माझं व्रत : आजवर देतच राहिले.*
*तुमच्या 'एकाचे' हजार केले*
*मुठभराला ढिगभर दिले*
*तुडवले तरी रडले नाही*
*बडवले तरी कुढले नाही*
*झिंजता झिजता हसत राहिले*
*दिसामाजी फुलत गेले.*
*मला माहीत होते–*
*मी फुलले तरच फुले फुलणार होती*
*मी हसले तरच पक्षी गाणार होते*
*पक्षी आकाशात झेपावले–*
*तरी झाडं माझी होती*
*गंध वाऱ्यासवे गेले–*
*तरी फुलं माझी होती*
*माझे नाते– ना चंद्राशी, ना सूर्याशी*
*ना वाऱ्याशी, ना ताऱ्याशी*
*माझे नाते– देठ तुटल्या फुलाशी !*
*वाऱ्याने झुलवले*
*ताऱ्याने चकवले*



अनुक्रमणिका

*तरी मी चळले नाही, पाऊल कधी ढळले नाही*
*माझे रुजवणे थांबले नाही.*
*पण–*
*आकाशाने द्यावे तरच मी रुजवावे*
*आकाशानेच नाकारले पितृत्व तर मी काय करू ?*
*नाकारता येते पितृत्व,*
*मातृत्व कसे नाकारू ?*

*बाळांनो,*
*मी वांझ नाही.*
*वांझ असते तर–*
*या बेलगाम, विशाल आकाशाला अशी एका जागी–*
*–खिळवून ठेवू शकले नसते,*
*आता त्याचेच पौरुष संपले तर मी काय करू ?*
*(व्यभिचार करू ?)*
*धरित्रीनेच केला व्यभिचार तर–*
*पदराखाली झाकून ठेवावे असे काय उरणार ?*

*बैमान झाले आकाश म्हणून–*
*एकदा बांधलेले इंद्रधनुष्याचे हे तोरण*
*मी तोडणार नाही,*
*कारण हातची दोरीच निसटली तर–*
*पाळणा पुन्हा हलणार नाही*
*पाळणा पुन्हा हलणार नाही !*

१९७२, मराठवाड्यात भीषण दुष्काळ. माणसं घरंदारं सोडून 'जगायला' बाहेर पडलेली. जनावरं चारा-पाण्यावाचून मरू लागलेली. गावंच्या गावं ओस. आसमंत भकास. भोवताली उदास. आमचा भाग आधीच उजाड. उघडेबोडके माळ नि खुरटी खुजी झाडंझुडपं. दुष्काळामुळे पार अवकळा आलेली. जमिनीला भेगा. पाण्यासाठी वणवण. पायाखाली गरम फुफाटा. नुसती पायपोळ. एकच आकांत– पाणी, पाणी, पाणी !

हे वास्तव मनात भरलेलं. चित्त व्याकुळ. प्रचंड ताण. आपल्या सुखासीन आयुष्याची कुठेतरी लाजिरवाणी जाणीव. अंतर्बाह्य नुसती तगमग. केवळ होरपळ. जीवाची गुदमर सुरू. आत-बाहेर नुसती येरझार– मी खिडकीशी बसून. एकटक रस्ता न्याहाळतो आहे– तापलेला



अनुक्रमणिका

निर्मनुष्य रस्ता_नजर आकाशाकडे जाते तर ते 'आऽऽ' वासलेले_खाली तगमगणारी जमीन_ अकस्मात झरा फुटावा तशा उफाळून आलेल्या ओळी–

*"जमिनीवरचे पाणी, कुठे गेले ? कुठे गेले ?*
*ज्याच्या त्याच्या डोळ्यात आले !"*

– ह्या ओळी म्हणजे माझ्या कवितेचा 'मूळारंभ'. आमुख. उपग्रहाला अवकाशात सोडून यान दूर होते तशा ह्या ओळी तुटूनच राहिल्या. आजतागायत ! पुढे तुकड्यातुकड्याने ही कविता पूर्ण झाली. एकसंध झाली. जणू दुष्काळ सरला नि सुकाळ आला.

१९७३ च्या यवतमाळ येथे झालेल्या साहित्यसंमेलनात काव्यवाचनाच्या वेळी मी फक्त ह्या दोनच ओळी ऐकवल्या. सारा श्रोतृसमुदाय एकदम स्तब्ध. सुन्न. एक व्याकुळपण सर्वांना व्यापून उरलेलं. संमेलनाध्यक्ष ग. दि. माडगूळकर सद्‌गदित झालेले. काय, कसे घडले ते मलाही कळले नाही. माडगूळकर माझ्या कवितेविषयी अनावर उमाळ्याने बोलले. समारोपाच्या भाषणातही पुन्हा उल्लेख केला. (साक्ष : सुधीर व अपर्णा देव 'माग्रस' नागपूर) त्या वेळी सर्व वृत्तांतात बहुतेकांनी ह्या दोन ओळी उद्‌धृत केल्या. श्री. व्यंकटेश माडगूळकरांनी पुढे आपल्या एका पुस्तकातही ह्या ओळी नोंदविल्या.

आत्मस्तुती म्हणून हे सांगणे नाही तर कवितेची ही पार्श्वभूमी.

ही कविता कितीतरी दिवस माझ्याजवळच विसावून (पडून नव्हे) होती. वहीतही नव्हे तर सुट्या कागदावर ! म्हटली तर पूर्ण म्हटली तर अपूर्ण. कुठे छापायलाही द्यावीशी वाटेना. इतर कविता छापून येत 'धात्री' मात्र होती, तिथेच होती. केव्हा तरी मी ही कविता 'लोकप्रभा' साप्ताहिकाकडे पाठविली. पाठविल्याचे विसरूनही गेलो. केव्हातरी त्यांनी ती छापायची म्हणून छापली. कुणाच्याही नजरेस आली नाही. आली असली तरी नजरेत भरली नाही. कविता निसटून गेली ती गेलीच. आज तो अंकही माझ्याकडे नाही. कात्रणही नाही. वर्षदेखील आठवत नाही. इतका मी त्या कवितेविषयी अलिप्त बनलो. ज्या वहीत मी कात्रण चिकटवले होते ती वहीदेखील हरवली. आमच्या इकडच्या भाषेत सांगायचे तर इतका मी 'गैहरादी' किंवा 'गैबू' आहे. म्हणून ही कविता मी स्वतः अप्रकाशित असेच मानतो.

आज ज्या स्वरूपात कविता आहे ती पूर्ण व्हायला काही महिने लागले. या कवितेच्या प्रत्यक्ष लेखनकाली माझी मनःस्थितीही काहीशी उदासच होती. जवळपास वर्ष-दीडवर्ष मी कवितेची एक ओळही लिहू शकलो नव्हतो. माझीही सृजनशक्ती संपली होती. वांझपण झोंबत होते. बाह्य परिस्थिती आणि माझी मनःस्थिती यात कुठेतरी नकळत अद्वैत निर्माण झाले असावे. डोक्यात एकच एक विचार– 'ही जमीन अशी कशी कोपली ? ही तर आई. निर्मिती हिचा धर्म. ही धारण करणारी. मग हे असे कसे ?' आणि मी पुटपुटलो स्वतःशीच–

*"मी धात्री, मी धरित्री*
*मातृत्व माझा धर्म*

*रुजवणं आणि वाढवणं एवढंच कळतं मला–"*

माझ्या मुखानं जणू पृथ्वीच बोलत होती. कितीतरी दिवस हे इतकंच. धरित्रीनं मला पुरतं धरून ठेवलं होतं. येता-जाता, उठता-बसता डोक्यात ह्याच ओळी. एकच गुणगुण– 'मी धात्री, मी धरित्री' अनेक बैठकी झाल्या. कितीतरी कागद फाडले गेले. भिंगरीसारखी 'धरित्री' मस्तकात गरगरत होती. तिचा एकरसी नाद मनात एकरकेंद्र बनवीत होता. कविता घडत होती. खाडाखोड, बदल, कमी-जास्त, ओळींचा क्रम मागे-पुढे असे सर्व प्रकार झाले. कविता अधुरी वाटायची. तीच खिडकी. तीच जमीन. तेच आकाश. तोच रस्ता. असाच खुर्चीवर बसून मी आकाशाचा भक्क भगभगीतपणा पाहत बसलेला. आकाशातूनच याव्यात तशा ओळी आल्या– माझ्या मनाच्या आकाशातून– धरित्री म्हणत होती–

*"आकाशाने द्यावे तरच मी रुजवावे !"*

*"आकाशानेच नाकारले पितृत्व तर मी काय करू ?"*

आणि त्या क्षणी सर्रकन् माझ्या अंगावर काटा आला. आजही मी ती अवस्था शब्दांकित करू शकत नाही– आकाश आणि धरित्री, पुरुष आणि स्त्री, सृजन आणि पौरुष, हे द्वंद्व–

*पृथ्वी वांझ नाही. आकाशाचे 'पौरुष' संपले.*
*"बाळांनो मी वांझ नाही,*
*वांझ असते तर–*
*या बेलगाम, विशाल आकाशाला अशी एका जागी–*
*–खिळवून ठेवू शकले नसते*
*आता त्याचेच पौरुष संपले तर मी काय करू ?*
*(व्यभिचार करू ?)"*

–वगैरे वगैरे मी लिहीत गेलो. ही कविता जशी, ज्या लयीत सुचली त्याच शैलीत लिहिली. हे लिहिणे नाही. हे 'बोलणे' आहे. धरित्रीचे बोलणे, तिचे गाऱ्हाणे, तिचे मनोगत– स्वगत नव्हे. प्रगट. शब्द व ओळी सहज आल्या. २/३ वर्षांचे चिंतन या कवितेच्या पाठीशी आहे. संस्कार परिष्करणे केली, पण रचनेचा कालावधी संपल्यासारखा वाटल्यानंतर. कविता पूर्ण झाल्याचे समाधान मिळाल्यानंतर मी एक शब्दही बदलला नाही.

या कवितेचे स्वागत यापुढे कसे होते हे मला बघायचे आहे. मी आजवर शे-सव्वाशे कविसंमेलनातून कवितावाचन केले. जवळपास सर्व ठिकाणी मी ही कविता वाचली. रसिकमनावरील या कवितेचा परिणाम मी साक्षात अनुभवला. खाजगीत आणि जाहीरपणेदेखील. हा परिणाम माझ्या सादरीकरणाचा की प्रत्यक्ष कवितेचा हे मी आज सांगू शकत नाही. गोवा, विदर्भ, मुंबई, पुणे, कोल्हापूरपासून मला रसिकांची पत्रे आलेली आहेत. गतवर्षी पुण्याच्या अ. भा. साहित्यसंमेलनात मी हीच एक कविता वाचली. पुणेकर रसिकांनी उत्तम दाद दिली (साक्ष : म. श्री. दीक्षित) कविसंमेलनाच्या वृत्तात मात्र एका ओळीनेही दखल



अनुक्रमणिका







घेतली गेली नाही 'इत्यादी'मध्ये तिला टाकले. हे 'अनुल्लेखाने मारणे' तसे मला नवीन नाही. असो. 'कविता' पुणे यांनी 'कवितेचे दोन दिवस' हा कार्यक्रम टिळक स्मारक मंदिरात घेतला होता. त्या वेळीही मी ही कविता सादर केली. व्यासपीठावर विराजमान असलेले श्री. सुशीलकुमार शिंदे यांनीही मनमोकळी दाद दिली. 'कुटुंब रंगलंय काव्यात' ह्या कार्यक्रमातून प्रा. विसूभाऊ बापट हीच कविता सादर करतात. या कवितेला मिळणारी दाद मी पाहिली आहे, दूरदर्शनवरून अनुभवली आहे. १९७३ ते ९० या प्रदीर्घ कालावधीत ही कविता रसिकांनी उचलून धरली आहे. अनेकांनी माझ्याकडून मागवून घेतली. अनेकांना ती काळजाला भिडणारी वाटली. रसिक आणि जाणकारांनी नावाजली. कविमित्र विठ्ठल वाघ, वसंत सावंत, रामदास फुटाणे, शंकर वैद्य, नारायण सुर्वे, नारायण कुलकर्णी, कवठेकर, श्रीधर शनवारे, कथाकार रा. रं. बोराडे, फ. मुं. शिंदे अशा अनेकांनी समक्ष 'बधाई' दिली आहे, असो.

समीक्षकांच्यापुढे आता ती माझ्या पुस्तकातूनच येणार आहे. टीकाकारांविषयी म्या पामराने काय बोलावे ? या कवितेचे असे 'शाब्दिक' व 'वाऱ्यावर' कौतुक खूप झाले तरीही खऱ्या अर्थाने ही कविता अप्रकाशितच आहे. तिची गुणवत्ता, काव्यवत्ता जाणकार नोंदवतीलच. कारण ही कविताच नव्हे तर याच नावाचा माझा कवितासंग्रह सिद्ध झाला आहे आणि लवकरच प्रसिद्ध होतो आहे. तूर्त एका व्यासंगी, साक्षेपी, दोन तपे कवितेचे अध्यापन करणाऱ्या स्वतः कवी असलेल्या प्राध्यापकाचे लेखी मतच उद्धृत करतो–

"– 'मी धात्री, मी धरित्री' या कवितेत प्रसरणशील प्रतीकांच्या द्वारे विस्तारत जाणारे आशयनाट्य विलक्षण उंची गाठते– चिंतनाच्या इंद्रधनुष्यातून सुटलेला भेदक शर रसिकांच्या अंतःकरणात खोलवर घुसतो, तेव्हा होणारी अवीट माधुर्याची वेदना काव्याचे अस्सल सामर्थ्य प्रकट करते." (प्रा. अरविंद थिटे तथा कवी रवींद्र बोरगावकर पत्रातून)

आता याहून अधिक ते मी काय सांगणार ? अशी ही माझी आवडती कविता आणि तिची जन्मकथा !

(प्रा. लक्ष्मीकांत तांबोळी. कृष्णकमळ, देगलूर, जि. नांदेड. ४३१७१७)



अनुक्रमणिका

# स्पर्शातून

फ. मुं. शिंदे

*विसरसीमेहून आठवत आठवत येत आहे*
*मास्तर, तुम्ही जोडलेलं वर्तुळ कुठं आहे ?*
*अस्ताभोवती माझं पालवताना मन तुमच्या*
*मास्तर, उभ्याच आहेत रेघा भागाकाराच्या वेशीच्या.*
*तुम्ही एक अधिक एक शिकवलं*
*मास्तर, मला तुमच्यात मिळवलं*
*येता जाता ठेच लागायची,*
*मास्तर, होता तुम्ही वेशीबाहेर*
*आमचं नालंदा तुमचं घर*
*काटे कुरवाळणारी पिकलेली बोर*
*मोबदल्यात मिळालेल्या भाकरी झेलणारी*
*वांझ चिंच*
*आणि मास्तर, कुठून यायच्या*
*लाल मुंग्या मोबदला टोकरायला ?*
*चिलमीला कधीच नाही छापीची लुंगी लावली*
*मास्तर सारीच होती का ती*
*प्रतीकं जगण्यातली ?*
*हाडांनी सांधलेली तुम्ही एक आकृती होता*
*माणूस होता, नागरिक होता, स्वच्छ नीती होता*
*तुमच्या स्पर्शातून उगवत होती माझी कोवळी फांदी*
*अजूनही नाही कळत मास्तर, तुम्ही अस्पृश्य कसे होता ?*
*माझ्या युगात मी तरंगत असताना*
*प्रवेश करून*
*तुम्ही तुमच्या विकल जगण्याच्या गावास*
*का, कशासाठी घेतलं लपेटून ?*
*मास्तर, का हरवलं क्षितिज धुईला चुकवून ?*



अनुक्रमणिका

*मास्तर, धावतात हे प्रश्न पृथ्वीसारखे*
*आगगाडी थांबेल तेव्हाही धावतील का सारखे ?*
*होताहेत आता मुक्त संवाद आकाश-मातीचे*
*पण नालंदा कुठं आहे*
*चिंचेचं, बोरीचं मूळ कुठं आहे ?*
*मास्तर, तुम्ही जोडलेलं वर्तुळ कुठं आहे ?*

'स्पर्शातून' ही कविता १९७४ च्या आसपास लिहिलेली आहे. त्याच दरम्यान ती कविता 'अस्मितादर्श'च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली. १९७५ साली प्रकाशित झालेला माझा दुसरा कवितासंग्रह 'आदिम'; त्या संग्रहात ती समाविष्ट असून, गेल्या चार वर्षांपासून इयत्ता दहावीच्या अभ्यासक्रमातही तिचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे. ही कविता एका बैठकीतच पूर्ण केलेली आहे. तसंच नंतर कोणतेही संस्कार करण्याची गरज पडली नाही. कवितेत प्रतिबिंबित झालेला आशय चिंतनाशिवाय कसा येणार ? अर्थात चिंतन प्रयत्नाची फलश्रुती नसून मनोधर्माची ती प्रक्रिया आहे; म्हणूनच जे काही आहे ते सहज आहे, स्वाभाविक आहे. समाजातल्या सर्व स्तरातील रसिकांनी या कवितेचं मनःपूर्वक स्वागत तर केलेच; त्याचबरोबर रसिकांचं अतूट प्रेमही मला मिळालं. दहावीच्या अभ्यासक्रमात असल्यामुळं अनेक मुला-मुलींची अतिशय भावुक पत्रं तमाम महाराष्ट्रातून दरवर्षी येतात. मनाला आनंद वाटतो टीकाकारांनीही प्रेरक प्रेम दिल्याचं स्मरतं.

या कवितेची पार्श्वभूमी, निर्मितीप्रेरणा आणि लेखन प्रक्रियेचं स्वरूप संक्षेपानं मी माझ्या टिपणात मांडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यातूनच ती कविता मला प्रिय का वाटते आणि त्या दृष्टीनं माझा मनोधर्म कोणता आहे इत्यादी बाबींचा उलगडा व्हायला मदत होईल.

समाजातील बऱ्यावाईट प्रवाहात जशी सामान्य माणसं असतात तशीच सामान्यांच्या प्रश्नांना स्वतःत विरघळवून घेऊन अर्थ देणारी कलावंत माणसं देखील असतात. प्रवाहातील बरावाईटपणा कलावंतही अनुभवत असतो. चोहोबाजूस विराट अशी समाजव्यवस्था ज्या रीतीनं आणि प्रवृत्तीनं पसरलेली असते तिचं दर्शन कलावंत घेत घेत तिला मागं टाकण्याचा प्रयत्नही करत असतो. कलावंत सतत ह्या कोषातून बाहेर पडून एका मुक्त क्षितिजाच्या रेषेजवळ जाण्यासाठी गतिमान बनलेला असतो. व्यवस्था मात्र फारच चाणाक्ष असते. कलावंत खूपच पुढं गेलेला पाहून 'राहू या आपण आहोत तिथंच' असा उद्‌गार काढत काढत इतरांना कोषात ओढून घेते आणि स्थितिमानतेचं आभासात्मक दर्शन देण्याचा प्रयत्न करते. बऱ्यावाईटाचा अनुभव घेऊन बऱ्यावाईटालाच मुक्त करताना कलावंत त्याच्या प्रकृतीनुसार कित्येक समूहांना आपल्यात ओतून घेतो. त्या समूहाचे प्रश्न त्याचे बनत जातात आणि मग तो प्रश्नांची सांगड न घालता प्रश्नाला संवेदनेचं रूप देऊन लिहू लागतो. पारंपरिक किंवा प्रचलित प्रवाह आणि असे हे प्रश्न यांत अनेकदा संघर्ष होतो आणि त्यातून मग बदलाची भाषा, विद्रोहाची जाणीव



अनुक्रमणिका







म्हणजेच बंडखोरी इत्यादी जन्माला येते.

माझ्या लहानपणी आम्हा तथाकथित स्पृश्य मुलांना एक अस्पृश्य मास्तर शिकवत असत. ते माझ्या मनातून आजही मावळू शकलेले नाहीत. त्यांची आठवण अस्वस्थ करून सोडायची. माझ्यां मास्तरांसाठी कवितेचा एक तरी उद्‌गार बाहेर पडल्याशिवाय चैन पडणार नाही असं वाटत होतं. म्हणून मी माझ्या स्वतंत्र युगात प्रवेश केलेला असताना माझ्या मास्तरास, माझ्या त्या तेव्हाच्या महारवाड्यातील शाळेस आणि तिथल्या सर्व समाजव्यवस्थेस आठवण्याचा प्रयत्न केला. मला सर्व आजही त्याच यथास्थित रूपात दिसू लागलं. मास्तर फक्त निघून गेले होते. जन्मानं लादलेली त्यांची अस्पृश्यता मात्र इथं तिथं सर्वत्रच होती. 'तू अस्पृश्य आहेस' या उद्‌गाराला जन्म देणारे कंठकरंटे या घटनेला जबाबदार असतात. कलावंत कोषातून मुक्त झाला, पण कोषाचं कार्य तो कोष करतोच आहे, ही त्यातली शोककारकता आहे. मुक्त झालेला कलावंत मागं वळून पाहतो तेव्हा त्याला तेच रूप दिसतं.

*अस्ताभोवती पालवताना माझे मन तुमच्या*
*मास्तर, उभ्याच आहेत रेषा भागाकाराच्या वेशीच्या*

वस्तुतः गुरू आणि शिष्य यांना परस्परांवर प्रेम करण्यासाठी जातच असत नाही, पण माझ्या मास्तरालाही जात होती आणि मलाही. ही स्पृश्यास्पृश्यतेची जाणीव लादणारे काही एजन्टस असतात. प्रमुख एजन्सी म्हणजे ज्यात कुटुंबवत मी वाढतो ते कुटुंब. अस्पृश्य मास्तराच्या महारवाड्यातील शाळेतून घरी परतल्यानंतर पाण्याचा शिंतोडा अंगावर घेऊन मग घरात शिरायचं या घटनेतून 'विटाळ', 'बाटणं' यांसारख्या भ्रामक, खोट्या, अमानुष आणि माणसामाणसांत दुरावा निर्माण करणाऱ्या कोषांची जाणीव लादली जात होती. जन्मदाते कोषात गुरफटून घेण्यात जशी धार्मिकता वगैरे मानत तसा प्रकार मुळातच कलावंताला जाचक ठरतो.

लादल्या जाणाऱ्या जाणिवेचं सॅच्युरेशन झालं की स्वतःहून फुटून बाहेर पडणं सुरू होतं. ही प्रक्रिया जिथं जन्म घेते त्या स्थळी भोवतालच्या समाजव्यवस्थेची सगळी काळीगोरी रूपं त्याला कळून चुकलेली असतात. खरे-खोटे, सत्य-भ्रामक यांची भिन्नता तो जाणू शकतो. अस्पृश्य मास्तरात त्याला विश्वात व्यापून असणारा मूळ माणसाचाच भाव प्रतीत होतो.

*हाडांनी सांधलेली तुम्हीही एक आकृती होता*
*माणूस होता, नागरिक होता, स्वच्छ स्वच्छ नीती होता*

ही अशी प्रचीती प्रगल्भ मनाचाच तुकडा असते. अस्पृश्यता एक भ्रामक, खोटी कल्पना आहे याची जाणीव करून देण्यासाठी मनाचा प्रवास प्रगल्भतेकडं अधिक व्हायला हवा.

अशा प्रगल्भ आणि कोषयुक्त वर्तमानातून भूतातल्या मास्तरांना हाक देताना अस्पृश्यतेला जोडून येणारं खूप काही आठवू लागतं. गावातली सवर्णांची सबंध मुलं 'ज्ञानदीप लावू जगी'च्या व्रतानं शहाणी करून सोडणारा माणूस 'ट्यूशन फी' म्हणून टोपल्यात दुरून स्पर्श न करता टाकल्या जाणाऱ्या भाकरीच्या तुकड्यांना गोळा करीत फिरायचा. मास्तर 'ट्यूशन











फी'साठी घरी आलेले पाहून (अर्थातच घरात नाही) आनंद वाटायचा, पण मास्तरांनी माझ्यासारख्या किंवा अन्य कोणाही शिष्यास 'मालक'च म्हणून संबोधलं की दुरावा निर्माण व्हायचा. 'मालक' म्हटल्यामुळे नाही. सर्वर्णांच्या मुलांना 'मालक' म्हटलं पाहिजे हे सामाजिक परंपरागत स्तरांच्या ओझ्यामुळं, इच्छा नसूनही स्वीकारलेलं असल्यामुळं. एका माणसाचा मुद्दामच पराभव करून त्याच्या पराभवावर हसण्यासारखं मला ते दृश्य वाटायचं. एक म्हातारा मास्तर चिमुकल्या मुलांना 'अहो-जाहो' दुहेरी भाषेत बोलतो हेच स्तरीयतेच्या उच्च-नीच जाणीवेचं प्रत्यंतर होतं.

वेस ओलांडून शाळेत जाताना हा स्तर प्रत्यक्ष जाणवायचा. आमच्यातून बाहेर ढकलल्या गेलेल्या माणसांनी निर्माण केलेल्या वस्तीत मास्तरांची शाळा आज मला 'नालंदा' वाटून गेली तर नवल नाही- 'स्नेह आधी आणि अक्षरे मागाहून' याच मायेनं आणि अविस्मरणीय माणुसकीनं मास्तरांनी जे दिलं ते उगमस्वरूप आहे. विस्तारित झालेला आजचा माझा प्रवाह उगमाला विसरू शकत नाही. या उगमासाठी आजचा प्रवाह एक प्रश्न विचारतो :

*होताहेत आता मुक्त संवाद आकाश मातीचे*
*पण नालंदा कुठे आहे ?*

आणि हा प्रश्न विचारताच नालंदा मनात गजबजून जाते. पोरांची चिवचिव शाळाभर होते. अंगणातली चिंच, बोर, त्यांच्या सावलीचं घड्याळ, त्यांच्या सावलीखालचे थंडगार क्षण हे असं सबंध भरून येतं आणि चिरंतन स्पर्श. अस्पृश मास्तरांनी दिलेला. मास्तरांची खाजगी शाळा सोडून मोहिमेप्रमाणं सरकारी शाळेत मला भरती करण्यात आलं. त्या सरकारी खुराड्यात जाण्यापूर्वी नालंदातील कुलगुरूंना भेटायला गेलो. मास्तरांच्या तोंडावरून फिरवलेला मायेचा आणि पाठीवरून फिरवलेला शाबासकीचा चिरंतन स्पर्श आजही मी जपून ठेवला आहे. या स्पर्शाचं मूल्य कोणी ठरवावयाचं, ज्यांनी माणसांना अस्पृश्य केलं ते तर निव्वळ आंधळे. त्यांना हा स्पर्शच दिसू शकत नाही. स्पर्शाच्या विलक्षण जाणिवेला ते मुकलेले असतात. स्पर्शानं पुलकित झालेलं मन म्हणून विचारतं,

*तुमच्या स्पर्शातून उगवत होती माझी कोवळी फांदी*
*अजूनही नाही कळत मास्तर, तुम्ही अस्पृश्य कसे होता ?*

भोवती अफाट विश्व पसरलेलं आहे. विविध अनुभवांनी तुडुंब भरलेलं. संवेदनशील मन त्यात उडी घेऊन्न चिंब होतं. माणुसकीला बट्टा लावणारी अस्पृश्यतेसारखी एखादी कृष्णपरंपरा आजही अधिक तीव्रतेनं अनुभव देत असेल तर तोही अनुभव आणि प्रश्न संवेदनशील मनानं स्वीकारलेलाच असतो. 'मास्तर' असाच एक अनुभव आहे. बऱ्यावाईट प्रवाहात माझ्यासारख्या मनानं तो जाणून घेण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे.

(प्रा. फ. मुं. शिंदे. देवगिरी महाविद्यालय, औरंगाबाद : ४३१००१)



अनुक्रमणिका








# वस्ती

सुहासिनी इर्लेकर

---

एखाद्या कलावंताला त्याची सर्वांत प्रिय अशी कलाकृती कोणती? असा प्रश्न विचारल्यास त्याचे सहजासहजी उत्तर देता येत नाही. कवितेच्या बाबतीत तर हे फार खरे आहे. अन्य कथात्म वाङ्मयप्रकारांच्या तुलनेने कविता निखळ जीवनसत्त्वाचाच वेध घेत असल्याने ती प्रकृतीने अधिक तरल, स्फुट व उत्स्फूर्तरूप असते. शिवाय रचनेचा भागही कवितेत तुलनेने कमी असल्याने कवीला आपल्या प्रत्येक कवितेतच आत्मरूप दिसू लागते. परिणामी आपल्या सर्वाधिक प्रिय कवितेची निवडही त्यास सहजपणे करता येत नाही. माझ्या बाबतीत ह्या क्षणी तरी 'वस्ती' ही मला सर्वांत अधिक प्रिय कविता वाटते.

'वस्ती'ची केवळ आठवण झाली तरी माझ्या दृष्टीसमोर उभे राहते १९६५ ते १९६८ च्या दरम्यानचे औरंगाबाद शहर. १ जानेवारी १९६५ रोजी प्रबंधलेखनार्थ संशोधन शिष्यवृत्ती मिळाल्याने मी मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात रुजू झाले. प्रारंभी अल्पकाळ नूतन कॉलनीत व नंतर तीन वर्षे औरंगपुऱ्यात माझे वास्तव्य होते. ह्या काळात माझ्या दैनंदिन विद्यापीठयात्रा होत राहिल्या. औरंगपुऱ्यातून विद्यापीठाकडे बसने जाण्यास १५ ते २० मिनिटे लागायची. बाहेर नजर टाकावी तर अवघ्या परिसरात असंख्य थडगी दिसायची. त्यात काही श्रीमंत सुरक्षित, तर काही दुबळी-ढासळणारी अशी दिसत. एखाद्या थडग्यापुढे कधीतरी दिवा लागलेला दिसायचा, तर एखाद्यावर हिरवी चादर पांघरलेली दिसायची. घराकडे परतताना मन तर खूपदा थकलेलं असायचं; त्यात बसबाहेर दिसणारी ही दृश्ये पाहून ते विषण्ण मात्र व्हायचं.

औरंगाबाद तेव्हा एक उद्ध्वस्त शहरच वाटायचं. शहराभोवतीचा संरक्षक तट अजूनही ताठपणे उभा होता. अजूनही वेशी दिमाखाने उभ्याच होत्या. वेशीआत माणसांची तर वेशीबाहेर थडग्यांची वस्ती असायची. कधी कधी पावसाळ्यात आत-बाहेर अंधारून आलेलं असायचं. त्यात जाता-येता दिसणारी ही थडगी मन भेदत राहायची. शहर जसजसं वाढत गेलं तसतसं एक एक थडगं हरवत जाऊ लागलं. नव्या इमारतींच्या योजना सिद्ध झाल्या नवे कंत्राटदार दिसू लागले. कष्टकरी स्त्री-पुरुषांची गर्दी वाढत गेली. थडग्यांची जागा झोपड्यांनी घेतली. बाह्य वास्तवातील हा बदल अत्यंत संथपणे होत होता, पण माझ्या अंतर्मनात तो नोंदला गेला. थडग्यांची वस्ती जाऊन झोपड्यांची वस्ती झाली, पण ती तरी कुठे टिकणार होती? तिच्या जागी टुमदार बंगले उभे राहात होते ह्या जाणिवेने मनात घर केले होतेच. हळूहळू त्यातून एक काव्यानुभव अलगद उमलत गेला. 'वस्ती' हीच ती कविता होय. ती प्रारंभी मराठवाडा दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली होती व पुढे 'अक्षर' ह्या काव्यसंग्रहात समाविष्ट

झाली.

१९६५-६६ च्या दरम्यान ही कविता लिहिली गेली. दलित कवितेला या काळात आपला सूर सापडला होता, पण तिचे वैभव अद्यापि पूर्णतः प्रकट झालेले नव्हते. आजच्या दलित काव्यातील अग्रणी श्री. यशवंत मनोहर ह्या सुमारास विभागात एम.ए. चे विद्यार्थी म्हणून वावरत होते. 'वस्ती' लिहीत असताना आपण काही वेगळे अनुभवींत आहोत व अगदी वेगळ्या प्रकृतीची कविता लिहीत आहोत याची त्या वेळीही मला स्पष्ट जाणीव होती. 'वस्ती'ला सत्य वास्तवाचा आधार असला तरी ती वर्णनात्मक प्रकृतीची कविता नाही. एका साक्षात्कारी अनुभवाचा आविष्कार करण्यासाठी 'वस्ती'चा जन्म झाला. 'वस्ती'तील काव्यानुभवाची भेदकता, दाहकता, उपरोध व जीवनचक्राची एक गती टिपण्याची तिची क्षमता इत्यादी बाबी माझ्या मलाच थक्क करून टाकीत होत्या.

ही कविता मी एका आवेगाने, साक्षात्कारी वृत्तीने लिहिल्याचे मला स्मरते. तत्पूर्वी मनात होती ती थडग्यांची, झोपडींची वा बंगल्यांची बदलती दृश्ये ! त्यांना माझ्या कवितेतून एक संघटित वा एकात्म आकार व अर्थ मिळत गेला. पंखांना जलद गती देऊन पक्षी जसा काही काळ हवेत नुसतेच पंख पसरून विसावत राहतो, तशी मी कवितेत विसावत गेले. जाणीवयुक्त उत्कट काव्यानुभव आपले रूप आपणच शोधीत जातो याचा अनुभव मला 'वस्ती' ह्या कवितेने दिला.

कविता एकाच बैठकीत लिहून झाली होती, पण कशी ? तर एखाद्या शिल्पकाराने प्रारंभी एखादा पाषाणखंडच कल्पनेतील शिल्पाकृतीनुसार अलग करून घ्यावा अशी ! मग तिच्यावर आशयानुसार कमी-अधिक संस्कार केले गेले.

'वस्ती' रूढ अर्थाने छंदमुक्त आहे. मात्र तिची स्वतःची एक लय आहे. ती तिच्या अंतरंगातून व अभिव्यक्तीतून प्रतीतीस येतेच. मुक्तछंदामुळे मराठी कविता कधीचीच मुक्त झाली असली तरी ती पुरेशी मुक्त झाली नव्हती. आपण मुक्त आहोत हेही ती छंदात सांगत होती. कालांतराने ती पूर्णतः मुक्त झाली. म्हणजे अनुभवाच्या अंगाने प्रकट होऊ लागली. 'वस्ती'ही याच प्रक्रियेतून प्रकटली ती माझ्या दृष्टीसमोर घडत गेली. आपले आविष्काररूप, शैली, शब्दकळा ह्यांचा शोध तिचा तिनेच घेतला. मी जणू ह्या संपूर्ण कवितानिर्मितीची साक्षी होते. मी जाणीवपूर्वक तिच्या स्वरूपात फारसे बदल केले नाहीत. निदान केल्याचे आठवत नाही.

आठवत नाही, असे म्हटले कारण अनेकदा माझ्या कविता मला खूपच त्रस्त करतात. त्या आपापले रूप घेऊन मनाबाहेर पडतही नाहीत अथवा मनात मावळूनही जात नाहीत. मनाचा एखादा कोपरा अडवून त्या हट्टी मुलासारख्या अडून बसलेल्या असतात. अशा काही कवितांकडे मी वेळोवेळी वळलेलीही आहे, पण त्यांच्यापुढे मला हात टेकावे लागले आहेत.

'वस्ती' कविता मात्र मनातल्या मनात घडत राहिली व योग्य संधी साधून आत्मबळाने



अनुक्रमणिका







अस्तित्वात आली. चिंतन झाले असेल पण ते काव्यनिर्मितीपूर्वीच; निर्मितीच्या वेळी नाही.

मी पुणे विद्यापीठाची पदवी राजाराम कॉलेजमध्ये शिकून मिळवली. १९५४ मध्ये मराठवाड्यात आले आणि मराठवाड्याचीच झाले. १९५४ ते १९६४ ह्या दहा वर्षांत मी उस्मानाबाद येथे असता माझ्या अनेक कविता स्त्री, किर्लोस्कर, वाङ्मयशोभा, रोहिणी, शिलेदार इत्यादी मासिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. १९५६ मध्ये 'काव्यकुंजा'त स्वतंत्रपणे कविता सादर करण्याची संधी वा. भ. बोरकर यांनी देऊ केली. त्यामुळे पुणे आकाशवाणी केंद्रावरून माझ्या काव्यवाचनाचे काही कार्यक्रम झाले. १९६१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'तृप्ती' ह्या काव्यसंग्रहाला वि. स. खांडेकरांनी प्रदीर्घ प्रस्तावना लिहून माझ्या काव्यगुणांचा गौरव केला. हा काव्यसंग्रहही पुण्याच्या कुलकर्णी ग्रंथागार ह्या प्रकाशन संस्थेने प्रकाशित केला. ५४ कवितांच्या ह्या काव्यसंग्रहातील २३ कविता पुणे आकाशवाणी केंद्रावरून सादर झाल्या होत्या. तसा 'तृप्ती'त प्रारंभी उल्लेखही केला गेला आहे. या पार्श्वभूमीवर माझ्या काव्यलेखनास मराठवाड्यात प्रारंभ झाला होता.

तथापि १९५४-५६ च्या सुमारास मराठवाड्याचा परिसर वाङ्मयीन दृष्टीने नव्याने घडत होता. प्रतिष्ठानचे ह्याच सुमारास हैद्राबादहून औरंगाबाद येथे स्थलांतर झाले होते मराठवाड्यात सलग अशी वाङ्मयीन परंपरा नव्हती. अत्यंत प्रतिकूल काळात मराठवाड्यातील वाङ्मयीन आघाडी सांभाळणाऱ्या बी. रघुनाथ यांच्या वाङ्मयात तुटलेपणाच्या जाणिवेचे औदासीन्य भरून राहिलेले दिसते. हे एकाकीपण मलाही प्रारंभी तीव्रतेने जाणवले. हे सर्व लिहिण्याचे कारण मराठवाडा व पश्चिम महाराष्ट्रातील रसिकांनी पुरेपूर प्रतिसाद दिल्याचा आनंद पदरी असतानाच समीक्षकांनी आपल्या कवितेची पुरेशी दखल न घेतल्याची खंतही माझ्या गाठी असे; ती आजही आहे.

'वस्ती' कवितेचे भाग्य असे की, ती प्रसिद्ध होताच त्या वेळीही कुसुमाग्रजांनी श्री. चंद्रकांत पाटील यांच्यामार्फत आपणास ती खूपच आवडल्याचे आवर्जून कळविले होते. लक्ष्मीनिवासमधील आमच्या राहत्या घरी श्री. पाटील आवर्जून येऊन हे सांगू लागले तेव्हा माझ्या मनाला झालेला आनंद शब्दातीत होता.

'वस्ती' ही कविता मला विशेष प्रिय असण्याचे प्रमुख कारण म्हणजे 'वस्ती'मुळे माझाच मला एक नवा शोध लागला हे होय. १९५५ पासूनच अशा प्रकृतीच्या कवितांची बीजे माझ्या मनोभूमिकेत रुजलेली होती, पण त्यातून चिंतनप्रवण कविता जन्मास आल्या होत्या. ज्यास सामाजिक आशयाचे उपरोधपूर्ण काव्यात्म भाष्य म्हणता येईल अशी कविता 'वस्ती'च्या रूपाने प्रथमच मोठ्या ताकदीने माझ्याकडून लिहिली गेली. कवीची काव्यनिर्मिती हा एक आत्मशोधच असतो याचा पुरेपूर प्रत्यय मी 'वस्ती'च्या निर्मितीत घेतला.

विशेष म्हणजे ह्या कवितेपासूनच माझ्या काव्यविश्वात एक नवा चैतन्यप्रवाह प्रारंभित झाल्याचे मला जाणवते. तो पुढे स्वतंत्रपणे विकास पावत राहिला तो आजतागायत. 'वस्ती'ने माझ्या कवितेला एक नवा वसाच दिला. मीही तो घेतला, व्रतस्थ वृत्तीने सांभाळला, जोपासला



अनुक्रमणिका

व कवितेतून व्यक्त केला.

'वस्ती'ची ही साठा उत्तरांची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण होय.

**वस्ती**

*'थडग्यांची वस्ती उठवून*
*झोपड्यांची वस्ती वसविण्याचा*
*त्यांनी निर्णय घेतला.'*
*हे असंख्य कृमिकीटकांनी*
*थडग्यांतील आत्म्यांना सांगितले-*
*वळवळणाऱ्या.*

*तेव्हा खडबडून जागे झालेल्या त्यांनी*
*आपलीच फुटकळ हाडे जुळवून घेतली;*
*आणि ते बाहेर पडले*
*आपले दगडी महाल फोडून.*
*दात विचकून, नसलेले*
*ते खदखदून हसले—*
*ओठ झडलेले;*
*तेव्हा दिशाही करपल्या.*
*ती सांगाड्यांची वरात*
*हळूहळू अंधारात बुडून गेली.*
*मात्र बुडताना त्यांनी निक्षून बजावले*
*'ही थडग्यांची वेस कधी ओस पाडू नका.'*
*थडग्यांची वस्ती जाऊन तेथे*
*मग झोपड्यांची वस्ती झाली.*
*(म्हणजे पुन्हा थडग्यांचीच !)*
*तेव्हा त्या सुतकी रस्त्यावर*
*एक सार्वजनिक दिवा लागला.*
*म्हणून बरे झाले !*

*तिथल्या पुरुषांना आपल्या नसल्या*
*तरी बाया ओळखू येऊ लागल्या.*
*सारेच विषय मिटून*

*इंद्रिये अर्थशून्य झाली,*
*तरीही*
*झोपडी-झोपडीत स्त्री होती,*
*पुरुषार्थ होता.*
*पाळण्या पाळण्यात मूल होते,*
*पुरुषत्व होते.*

*लूपवाले त्यांनी कधीच पिटाळून लावले होते.*
*मात्र*
*मिळणाऱ्या अन्नानुसार आपल्या जठरांना–*
*आकार देण्याच्या संस्कृतीचा,*
*आणि*
*मिळतील त्या कपड्यांच्या मापाने*
*अंगे बेतण्याच्या कलेचाही,*
*त्यांनी आपल्या पोरांना वारसा दिला.*
*एका संध्याकाळी*
*वणवणणाऱ्या*
*त्यांच्या पोरांनी वर्दी दिली.*
*झोपड्यांची वस्ती उठवून–*
*बंगल्यांची वस्ती बसविण्याच्या*
*त्यांच्या निर्णयाची.*

*तेव्हा आपल्या झोपड्या*
*आपल्याच हातांनी जाळून*
*ते हसले. दात असलेले.*
*तेव्हा दिशांचे दातवण झाले.*

*ती सांगाड्यांची वरात*
*हळूहळू अंधारात बुडून गेली*
*मात्र*
*बुडताना त्यांनी निर्वाणीचे बजावले*
*'ही थडग्यांची वेस कधी ओस पाडू नका.'*

*मग तेथे टुमदार बंगल्यांची वस्ती झाली!*

(डॉ. सुहासिनी इर्लेकर, २७५ अक्षर, नवगण कॉलनी, बार्शी रोड, बीड ४३११२२)

# तू विसरुनि जा

**गंगाधर महांबरे**

*तू विसरुनि जा रे विसरुनि जा*
*तुझ्याजीवनी चुकुनि आले*
*चुकले होते वाट ॥धृ.॥*
*यौवनाची आली चाहूल*
*तिथे थबकले प्रीती पाऊल*
*परिचय झाला आणिक अवचित*
*केली जीवाला साथ ॥१॥*
*दिनराती ज्या स्वप्नि रमले*
*प्रीतस्वप्न ते पुरे भंगले*
*दृष्ट लागली सांग कुणाची*
*फसला सारा घाट ॥२॥*
*एकच इच्छा उरी धरी मी*
*तुला वरावे पुढल्या जन्मी*
*या जन्मी तर असाच साहिन*
*दैवाचा उत्पात ॥३॥*

आतापर्यंत मी शेकडो कविता गीते लिहिली आहेत. त्यातली अनेक गीते माझ्या आवडीची आहेत (आणि काही आता पुन्हा वाचताना आवडूही लागली आहेत.) सवाई गंधर्व पुण्यतिथी जागवणाऱ्या संगीत श्रोत्यांना परवीन सुलतानाने म्हटलेलं माझं 'रसिका तुझ्याचसाठी' आवडतं. कॉलेजकुमारांना 'संधिकाली या अशा' आवडतं. पं. भीमसेन जोशींच्या बुलंद आवाजाच्या दुनियेच्या दोस्तांना माझं 'बिजलीचा टाळ' आवडतं. शोभना समर्थसारख्या गेल्या पिढीतील गायनप्रमी अभिनेत्री त्यांच्या आवडीच्या गीतांमध्ये माझं आशा भोसलेंनी गायिलेलं 'कंठातील रुतल्या ताना' ऐकवतात. या माझ्या सर्व कविता किंवा गीतांच्यामध्ये 'तू विसरुनि जा' या गीताला (माझ्यापरीने) एक अनन्यसाधारण महत्त्व आहे.

साधारणपणे १९५४ च्या सुमाराला लिहिलेले हे गीत १९९० सालीही प्रत्यक्ष भेटीमध्ये किंवा पत्राद्वारे जेव्हा ओळखीचे आणि अनोळखी रसिक आपल्याला खूप आवडल्याचे सांगतात तेव्हा, मला वाटते, नकळत ते माझ्याही खूप आवडीचे होऊ लागते. या गीताच्या संदर्भात मला स्वतःला आलेले बरे-वाईट अनुभवही हे गीत माझ्या मनात एक आवडते गीत म्हणून रेंगाळायला कारणीभूत झालेले असावेत.

१९५४ च्या सुमाराला लिहिलेल्या या काव्याचे गीतामध्ये खरेखुरे रूपांतर केले ते संगीतकार यशवंत देव यांनी. या गाण्यातील काही शब्द हे त्यांच्या संस्कारी प्रयत्नातून अवतरले आहेत. ज्या वेळी मी कवी म्हणून कुणी नव्हतो त्या वेळी मी लिहिलेल्या 'संतांची कृपा' या नाटकाला यशवंत देव हे संगीतकार म्हणून लाभले होते. त्या काळात आम्ही दोघे एकत्र बसून शब्दांशी ज्या झटापटी केल्या त्यातून हे गीत जन्माला आले. ह. वि. देसाई यांच्या 'पराजय' या नाटकाच्या निमित्ताने हे गीत प्रथम शब्दबद्ध होत असतानाच स्वरबद्धही झालं.

१९५५ साली प्रसिद्ध झालेल्या त्या नाटकाच्या पुस्तकामध्येही हे गीत समाविष्ट झाले आहे. पुढे नीलकंठ प्रकाशनने प्रसिद्ध केलेल्या माझ्या 'उषःकाल' या कवितासंग्रहात पाच-सहा अंतऱ्यामध्ये हे गीत प्रसिद्ध झाले आहे (या कवितेकडे एक गीत म्हणून पाहणे मला अधिक आवडते म्हणून इथे 'तू विसरुनि जा'चा गीत असा उल्लेख करीत आहे.)

मराठी चित्रपटाची credit titles पाहताना 'जागतिक हक्क' अशी terminology ज्या अर्थाने आपण स्वीकारतो त्याच अर्थाने मराठी रसिकांनी 'तू विसरुनि जा'ची theme ही एक universal म्हणून स्वीकारली आहे. खुषीपत्रे लिहिणाऱ्या अनेकांनी या गीतातील घटना ही आपल्याच आयुष्यातली एक घडलेली घटना आहे अशी स्पष्ट कबुली दिली आहे. या गीत लेखनाची प्रेरणा मला स्वतःला अशाच एका कबुलीजबाबातून मिळाली आहे. त्या महिलेच्या आत्मकथनातून एकाच वेळी या एका गीताला आणि 'संतांची कृपा' या मी लिहिलेल्या नाटकाला 'कथाबीज' पुरवले होते. त्या काळी मी मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये नोकरी करीत होतो. जवळपास माझ्याच वयाचे युवक-युवती त्या कॉलेजात शिकत होते. त्यामुळे आम्ही एकमेकांना निश्चिंतमनाने आमची सुखदुःखे सांगत होतो. ज्या एका युवतीवर 'तू विसरुनि जा' असे आपल्या प्रियकराला सांगण्याची वेळ आली तिने मला सांगितलेली ती घटना मी केवळ शब्दबद्धच केली होती. भावना तिची आणि शब्दांची मांडणी माझी असा तो प्रकार होता. नेहमीच्या बैठकीतील यशवंत देवांनाही ती कविता भावली. स्वरांचे लेणे लाभलेले ते कागदावरील गीत सर्वांनाच मोहवू लागले. एका बैठकीत लिहिलेल्या योग्यवेळी संस्कार झालेल्या या गीताचे समोरचे श्रोते मोठ्या रसिकतेने स्वागत करीत. हे गाणे ध्वनिमुद्रित करण्याच्या दृष्टीने मग देवांनी हालचाली केल्या एच.एम.व्ही.चा कुत्रा जेव्हा हे गाणे ऐकण्याच्या मनःस्थितीत नाही असे दिसून आले तेव्हा त्या काळी फोर्टमध्ये अखेरचे दिवस मोजत असलेल्या एका राष्ट्रीय ग्रामोफोन कंपनीत देवांनी हे गाणे 'चालविण्याचा' प्रयत्न केला. त्या दिवशीच्या मीनल वाघ यांनी गायलेल्या या



अनुक्रमणिका

गाण्याच्या ट्रायल रेकॉर्डिंगच्या दिवशी योगायोगाने दत्ता डावजेकर हजर होते. 'फार सुंदर कविता लिहिली आहे आणि चालही गोड आहे.' असा त्या वेळी त्यांनी उत्स्फूर्त अभिप्राय दिला होता, पण त्या कंपनीच्या चालकांनी 'पुढे केव्हातरी करू या' या सबबीवर आमची कुंडली परत केली.

ग्रामोफोन कंपनी हे गीत रेकॉर्ड करीत नव्हती. त्या काळी कवी म्हणून आकाशवाणीने माझ्या नावाला मान्यता दिलेली नव्हती. त्यामुळे आकाशवाणीचे दरवाजे या गीताला बंद झाले होते. यशवंत देव मात्र आल्यागेल्यांना हे गीत गाऊन दाखवायचे, त्यामुळे खूप गायिका आपल्या खाजगी गाण्यांच्या कार्यक्रमात या गीताचा आवर्जून समावेश करीत. याच काळामध्ये आकाशवाणीवरील एका प्रसिद्ध contracted कवयित्रीने या गाण्यावर नवी शब्दरचना करण्याचा एक प्रयत्न केला. त्यांच्या मते एक गीत म्हणून या गीताचे शब्द जेवढे परिणामकारक आहेत तेवढीच त्या गीताची चालही एक चाल म्हणून श्रेष्ठ आहे. थोडाफार प्रयत्न केल्यावर ती कवयित्री या संगीतकाराला म्हणाली, "देव, मी हे सुंदर गीत बिघडवत नाही. तुमच्या दुसऱ्या एखाद्या चालीवर एखादं गाणं लिहायचं असेल तर सांगा.', कालांतराने माझे नाव आकाशवाणीच्या मान्यताप्राप्त कवींमध्ये आले आणि काही काळ अनेक गायिका आकाशवाणीवरून हे गीत गायल्या.

### साहित्य संमेलनात

मालवणला कवी अनिल यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या मराठी साहित्य संमेलनातील कविसंमेलनात एक स्थानिक कवी म्हणून माझी वर्णी लागली तेव्हा मी 'तू विसरूनी जा' चे काव्यगायन केले. त्या वेळी कवी अनिल, विठ्ठलराव घाटे, आचार्य अत्रे, अनंत काणेकरांसारख्या कविवर्यांनी या गीताला चांगलीच दाद दिली. काही दिवसांनी सर्व योग जुळून आल्यावर आशा भोसले यांनी एच.एम.व्ही मध्ये या गीताचे ध्वनिमुद्रण केले. आजही आकाशवाणीवर अधूनमधून हे गीत ऐकू येते.

### दोन अश्रू

१९६४/६५ च्या सुमाराला 'मनोहर' साप्ताहिकाने माझ्या पुढाकाराने एक गीतकार शिबिर भरवण्याचे ठरवले. या शिबिरामध्ये प्रशिक्षणार्थींना प्रवेश देण्यापूर्वी त्यांच्या कवितांची चाचणी घेण्यासाठी जी नमुन्याची सिच्युएशनची कविता देण्यात आली होती ती 'तू विसरूनी जा' ही होती. ही कविता वाचून बेळगावच्या देशपांडे गल्लीतील एका कवीने ही कविता आपली असल्याचा 'मनोहर' मासिकाकडे दावा केला. आणि (आपली कविता चोरणारे) हे कवी महाम्बरे कोण अशी पृच्छा केली. त्यांच्यामते १९६३ च्या सुमाराला साप्ताहिक 'स्वराज्य'मध्ये त्यांची जी एक कविता प्रसिद्ध झाली होती त्यातील थोडे फार शब्द बदलून साप्ताहिक 'मनोहर'ने ही कविता प्रसिद्ध केली होती. या प्रकारात त्या कवीने दोन अश्रूही



अनुक्रमणिका

ढाळलेले असल्यामुळे मी खुलासा केला नव्हता.

**स्पष्टीकरण**

'तू विसरूनी जा' चा एक गीतकार या नात्याने 'बर्शेन गॅस सिलिंडर नंबर न लावताही लौकर मिळणे, रेल्वेचे आरक्षण मिळण्यात सवलत मिळणे या गोष्टीही घडल्या आहेत. एका विशिष्ट गीताचा लेखक म्हणून समाजातील अनेकजण आपल्याला ओळखतात तसेच आपल्यातील 'मी' जे मला ओळखावे हे माझ्या परीने कविता प्रिय असल्याचे स्पष्टीकरण मान्य व्हावे.

(गंगाधर महाम्बरे, — पुणे)

---

# सोय

**फ. म. शहाजिंदे**

---

मुळात लिहिणाऱ्याला, तो कोणत्या का दर्जाचा असेना, त्याची प्रत्येक शब्दकृती महत्त्वपूर्ण वाटत असते. असे वाटणे तसे स्वाभाविकही आहे. याच्या उलट काहींना असे वाटते की आपण लिहितो म्हणजे काय लिहितो ? आपले लिहिणे म्हणजे काय लिहिणे आहे काय ? या दोन्ही टोकांच्यामध्ये मी कुठेतरी बसू इच्छितो. त्यानं मला मराठी संपादक, समीक्षक बसू देतीलच याची काहीच शाश्वती नाही.

'सोय' कवितेतील भ्रष्टाचाराचा आशय माझ्या डोक्यात तसा खूप दिवसापासून घोळत होता. पण जेव्हा साखर कारखान्यातील शेतकऱ्यापोटी जन्माला आलेला मुलगा शेतकी अधिकारी झाला आणि त्यांनी फार मोठा भ्रष्टाचार केला तेव्हा ही कविता मला अलगदपणे गावली. कारण गंमत ही आहे की या भ्रष्टाचारापोटी त्या शेतकी अधिकाऱ्याला काढून टाकण्यात आले आणि त्याला तीच नोकरी दुसऱ्या कारखान्यात मिळाली. एवढेच नव्हे तर, काही वर्षांनंतर ज्या कारखान्यातून काढून टाकण्यात आले होते त्याच कारखान्यात त्याला तीच नोकरी देण्यात आली. म्हणजे भ्रष्टाचार आपल्या समाजात कसा मुरलेला आहे यासाठी एवढे एक मासलेवाईक उदाहरण पुरेसे आहे. तरीही काही लोक इथे निष्ठेच्या बाता मारताना आढळतात.

'सोय' ही कविता वरील अनुभवानंतर अलगद लिहिली खरी. पण ती आवडली की नाही आवडली असा काही निवाडा तेव्हा मी केला नव्हता. पुण्याच्या स्त्रीमुक्तीवाल्यांकडून 'दिशा' नावाचे दिवाळी अंक निघणार होते, असे त्यांच्याकडून पत्र आल्यावर कळले. भीत भीतच मी



अनुक्रमणिका







ही कविता पाठवून दिली. कारण स्त्रीमुक्तीवादी स्त्रियांच्या दिवाळी अंकात असली सरळसोट कविता चालेल की नाही या विषयी मी साशंक होतो. पण तसे काही झाले नाही. उलट महाराष्ट्रातील संपादक, दिवाळी अंकासाठी आलेले लेखन कसे आहे या संबंधी या प्रतिक्रिया कळवण्याच्या भानगडीत पडत नाहीत. असा संपादकीय शिरस्ता असतानाही त्या संपादिकेने पोच तर दिलीच पण कविता आवडली, कविता चांगली आहे हेही आवर्जून कळवले. खोटं कशाला सांगू, ते वाचून मलाही बरे वाटले. ह्या सुखद प्रतिक्रियेचा शेवट मानधन पाठवण्याऐवजी न पाठवण्यात झाला हा भाग अलाहिदा आहे. प्रतिक्रिया हेच मानधन समजून विचारणा करणारे पत्र काही मी पाठवू शकलो नाही. चळवळी करणाऱ्यांजवळ काय असते ? याची मला पूर्ण जाणीव होती. म्हणूनही पत्र पाठवले नाही. पण यामुळे झाले काय की ही कविता मी शेतकरी असलेल्या शिक्षकाला ऐकवली तेव्हा तो हर्षभरीत झाला. मग मी हीच कविता अ.भा.म.सा. संमेलनातील (पुणे) कवी संमेलनातही उत्तररात्री ऐकवली. तेव्हा ती उचलली गेली. दुसऱ्या दिवशी खुद्द कवी संमेलनाचे सूत्रसंचालक श्री. शंकर वैद्य यांनी, 'कविता चांगली झाल्या'चे मनःपूर्वक सांगितले. डॉ. संगमनेरकरांनी आणि आणखी दोघां अपरिचित पुणेरी रसिकांनी मला गाठून असेच मत दिले. म्हणून मला ही कविता, कविता म्हणून आवडू लागली. असं पाहा, आपण माणसावर जे प्रेम करतो ते मुळात त्या माणसाच्या कामावर, कर्तृत्वावर केलेले प्रेम असते. असेच माझे या कवितेविषयी झाले आहे.

नागपूर येथील दै. 'जनवाद' ने मला लेखन मागितले तेव्हा मी याच कवितेची निर्मिती प्रक्रिया लिहून टाकली. 'जनवाद' चा माणूस पुन्हा येतो म्हणून परत आला नाही. हा भाग वेगळा ! ते लेखन दुसऱ्याजवळ देऊन आलो. त्याचे तिकडे काय झाले ते मला काहीच माहित नाही. पण ते लिहिलेले वाया गेले नाही कारण प्रा. अक्षयकुमार काळे यांनी स्टाफ अॅकॅडमिक कॉलेज, नागपूर मधून रिफ्रेशर कोर्सची व्याख्यानं बुडवून पुण्याच्या साहित्यसंमेलनाला जाण्याविषयी परवानगी देतानाच एक जादा निबंध लिहावा लागेल अशी अट घातली होती तेच लेखन मी त्यांना त्यांच्या अटीप्रमाणे दाखवले. तेव्हा त्यांनी ते लेखन तर घेतलेच नाही उलट न पाहता, 'ठीक आहे, ठीक आहे' म्हणून परत केले. ते जे काही लिहिले होते ते काहींनी वाचून अशी प्रतिक्रिया दिली की, 'नेकीने तूर्त कुणीच राहत नाही म्हणून तूच तुझ्या चरणांचे ठसे काढून घे आणि त्या ठश्यांवर तूच तुझा माथा टेकवत जा.' हे सगळे या पूर्वीच घडून गेले आहे. आता 'महाराष्ट्र साहित्य-पत्रिके'च्या संपादक महोदयांचे पत्र आले आहे की, 'तुम्हाला तुमच्याच आवडीच्या कवितेविषयी असे असे लिहायचे आहे.' पत्र वाचून बरं वाटलं कारण 'म.सा.पत्रिके'चे मला आलेले हे पहिलेच पत्र होते. म्हणून मी मला आवडलेल्या 'सोय' या कवितेविषयीच लिहायचे मनाशी पक्के केले.

१. लिहायला बसलोय खरा पण पत्रिकेच्या पहिल्याच प्रश्नावर माझे, पुढे लिहिणे काही वेळ अडून राहिले. कारण ही कविता नेमकी कधी लिहिली तेच आठवेना. जून-जुलै महिन्यात कधी तरी लिहिल्याचे अस्पष्टसे आठवले. पण कवितेच्या प्रसिद्धीचे नेमके वर्ष मात्र आठवेना.

बहुतेक १९८७-८८ च्या 'स्त्री मुक्तीची नवी दिशा' पुणे या पाक्षिकाच्या दिवाळी अंकात ती प्रसिद्ध झालेली आहे. ही 'सोय' कविता माझ्या 'आदम' संग्रहात आहे.

२. या कवितेची पार्श्वभूमी जगताना भ्रष्टाचाराचे आलेले अनेक अनुभव आणि आपल्या समाजाचा त्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण ही आहे. या कवितेची प्रेरणा ही आहे की जे कधीच भ्रष्टाचार करणार नाहीत असे आपले मन म्हणत असते. पण जेव्हा तेच लोक भ्रष्टाचार करताना दिसतात तेव्हा मन बेसुमार भडकून जाते. व्यवहारात पावलोपावली होणारा भ्रष्टाचार वर पर्यंत कसकसा आहे याचे एक स्पष्ट चित्र मनासमोरून झर्रकन सरकून जाते आणि भ्रष्टाचाराचे सार्वत्रिक रूप अंतःकरणाला, बुद्धीला खोलवर जाणवते. त्यातूनच लिहिण्याची उर्मी येते. अन् माणूस लिहायला बसतो तेव्हाचे वातावरण नेहमीच्याच सवयीतले असते. ग्रामीण-शहरी यांचे मिश्रण असलेल्या गावातील मराठी अध्यापकाच्या घराचे. आणि अवतीभोवती भ्रष्टाचार खुलेआम चाललेला असतो. ज्याच्याविरुद्ध आपण काहीच करू शकत नाही; याची असहाय्य करणारी टोचणी.

३. तसा या कवितेतील अनुभव वेगळा वाटत नसला तरी वेगळा आहे. कारण सहकार स्वाहाकार झालेला आहे, असे म्हटले जाते. शुगर लॉबीवर रान पेटविले जाते; कादंबरीलेखन होते आणि सराईतपणे सुशिक्षित लोक, निष्ठेच्या बाता मारणारे लोक, भ्रष्टाचारावर अंकुश ठेवू शकणारे, आळा घालू शकणारे, त्याविरुद्ध ओरडणारे देखील भ्रष्टाचार करतात तेव्हा मात्र त्याविरुद्ध बोलले जात नाही. बोलले, लिहिले गेले तरी त्यात तसा फारसा जोर नसतो. म्हणून नेकीने, नीतीने जगणाऱ्या माणसाचा शोध मला महत्त्वाचा वाटू लागतो. कारण जगातील सगळेच धर्म, सगळीच दर्शने माणूस अधिक नेक, नीतिमान कसा होईल याचीच काळजी वाहतात; काळजी करतात. म्हणून हा अनुभव वेगळा ठरू शकतो.

४. ही कविता एका बैठकीत लिहिल्यामुळे मला ही कविता लिहिण्यासाठी दीर्घकाळ काही लागलेला नाही. पण ती डोक्यात मात्र दीर्घकाळ राहिलेली होती. माझी काव्यलेखनाची शैलीच मुळी सरळसोट असल्यामुळे कवितेला मी माझ्या प्रकृतीतून तिच्या गतीने येऊ देतो. संस्कार, सजवणे वगैरेंच्या भानगडीत मी फारसा कधी पडत नाही. संस्कार करावेसे वाटले तर एखादा शब्द, एखादी ओळ इकडे तिकडे, अथवा खालीवर होते, बदलते; नाही असे नाही. पण असे फार कमी वेळा होते; एवढे खरे. या कवितेच्या बाबतीत तर तेही झालेले नाही.

५. वृत्त, छंद वगैरे माझ्या प्रकृतीतच नाहीत. प्रयत्नपूर्वक कष्ट घेऊन वृत्तबद्ध किंवा छंदोबद्ध लिहिता येईलही. पण त्यातली सर्वांत महत्त्वाची सहजता गुदमरून जाईल, म्हणून त्या दिशेने मी कधी जात नाही. अगदी सहजपणे वृत्तबद्ध, छंदोबद्ध मला लिहिता येत नाही हे त्याहून अधिक खरे आहे.

माझ्या 'सोय' कवितेतील शब्द, निर्मितिप्रक्रियेत सहजपणे आलेले आहेत. त्यासाठी कधी मला विशेष प्रयास करावे लागलेले नाहीत. कारण माझी शब्दकळाच मुळी दैनंदिन व्यवहारातील, रोजच्या वापरातील आहे. निर्मितिपूर्व प्रक्रियेतच चिंतन असते. कारण

निर्मितीच्या क्षणी केवळ तीव्रतेने जाणवलेलेच शब्दबद्ध करायचे असते. त्या वेळी प्रयत्न वगैरे करावे लागत नाहीत. मनात खदखदत असलेले आपोआपच शब्दरूप घेत असते. हृदयातले शब्दात ठेवायचे एवढेच आपापल्या परीने आपल्या हाती असते.

६.७. अलिकडे अभ्यासेतर मराठी कविता विद्यापीठीय प्रश्न पत्रिकेतून रसग्रहणार्थ येऊ लागलेली दिसते. ही कविता आली. तेव्हा मला कोण आनंद झाला होता. तशी यापूर्वी 'कबीरा' ही कविता मॅट्रिकच्या नवनीतात नमुन्यादाखल घेतली गेली होती ते माझ्या गावीसुद्धा नव्हते. एका मराठीच्या शिक्षकाने मला विचारले, 'अहो !' 'काय ?' 'तुम्हीच शहाजिंदे काय ?' 'होय. का ?' 'तसं काही नाही. नवनीतात तुमची कविता आहे.' 'असं होय ?' नंतर मी उत्सुकतेपोटी ती पाहिली. बरं वाटलंही पण प्रश्नपत्रिकेत आलेली 'सोय' कविता पाहून अधिक आवडू लागली. तशी ही माझी आवड खूप दिवस राहील, टिकेल असे काही मला वाटत नाही.

वरील लेखन, पत्रिकेचे पत्र येताच झालेले. संपादक महोदयांच्या विचारलेल्या, दिलेल्या मार्गदर्शक प्रश्नांनुसार झालेले आहे. आता थोडेसे मनमोकळे.

आपल्या समाज-जीवनात भ्रष्टाचार पुरेपूर मुरलेला आहे. अगदी दिवसा ढवळ्या भ्रष्टाचार होतो आहे; ज्याचे सुखदुःखही हल्ली कुणाला वाटेनासे झाले आहे. 'हे असे चालणारच'. 'त्यात एवढे मनावर घेण्यासारखे काय आहे ?' 'अहो, भ्रष्टाचार हा केवळ भारतीय समाज जीवनातच नाही तर तो अगदी प्रगत राष्ट्रातही चालतो. आणि साम्यवादी राष्ट्रातसुद्धा चालतो.' असे भले भले लोकही बोलताना आढळतात. म्हणजे भ्रष्टाचार आपल्या समाजाने मान्यच करून टाकलेला आहे. जणू काय भ्रष्टाचाराशिवाय ही व्यवस्थाच लुळी पांगळी होईल; असे कुठे तरी या समाजमनाला वाटते आहे. हे जे समाज वास्तव आहे ते सर्वात विलक्षण भयानक आहे. अशी जाणीव मनात सारखी सलत राहते. झक् मारून जळफळाटाव्यतिरिक्त आपण काहीच करू शकत नाही म्हणून हे सहन करावे लागते.

असा हा खोलवर रूजलेला भ्रष्टाचार वैयक्तिक पातळीवर कुणीही बंद करू शकत नाही. जर कुणी तसा प्रयत्न केला तरी त्याला शेवटी निराशच व्हावे लागते. कारण भ्रष्टाचार उघडा पाडणाराही शेवटी उघडा पडत असतो. भ्रष्टाचारी माणसाला शिक्षा देऊ शकणारा माणूसही भ्रष्टाचारी असतो. त्यामुळे वैयक्तिक पातळीवरून भ्रष्टाचाराला खीळ घालणे अशक्य होते. अधूनमधून हा भ्रष्टाचार विरोध सामुदायिक पातळीवरूनही केला जातो. असा प्रयत्न संस्थेला किंवा संघटनेला वर्गणी, हप्ते गोळा करण्यात संपत असतो. म्हणजे भ्रष्टाचार विरोध हा भ्रष्टाचार करण्याचा एक सुलभ मार्ग आहे. तसेच ज्यांच्या हाती भ्रष्टाचार निर्मूलन एकवटले आहे तेच हात मुळी भ्रष्टाचाराने बरबटलेले असतात. हे भ्रष्टाचाराहूनही विदारक आहे. या वास्तवाने मनाला भेगा पडत राहतात. तेव्हाच भ्रष्टाचाराचा अनुभव विस्तारत जातो त्याचे ठसे, ओरखडे मनावर कोरले जातात.

एवढे असले तरी आपले मन न्याय व्यवस्थेवर श्रद्धा ठेवून असते. हे मन बुद्धीला सारखे पटवत राहते की न्यायालयात तरी भ्रष्टाचारी माणूस सुटू शकत नाही ना ? हे सर्व मनाच्या

आतल्या पातळीवर चालू असतानाच न्यायाधीशही पैसे खाऊन न्याय देत असतो, या सारखी आपण बातमी वाचतो तेव्हा आपल्या मनाने जपलेली श्रद्धाही भंग पावते, आपले मन उद्‌ध्वस्त होते; त्याच्या चिंध्या होतात. अशा मनानेच आपल्या मनात आपणच डोकावून पाहतो. तेव्हा हेच चित्र तिथे वेगळ्या तऱ्हेने दिसू लागते. माझे मन मलाच म्हणते की, संधी मिळाली तर तूही भ्रष्टाचार करशील की नाही ?. एक मन म्हणते की अजिबात करणार नाही पण दुसरे मन लगेच म्हणते की संधी मिळाली तर करतोच की ! आणि करू की ! ! तुला तशी संधी नाही हेच बरे आहे. भ्रष्टाचार करायला ज्यांना संधीच मिळत नाही तेच लोक भ्रष्टाचाराला विरोध करतात. हा विरोधही तोंडी स्वरूपाचा असतो. एकूण काय, तर संधी मिळाली असती तर मी ही भ्रष्टाचार केला असता ! हे कटु-वास्तव जेंव्हा मनाला डसते तेव्हा डोके आणि मन काही क्षण बधीर होऊन जाते. या भयानक मानसिक वास्तवाने मन अस्वस्थ होते. तरीही मी कोडग्या मनाने कोरड्या व्यवहारात जगत राहतो.

आपल्या मनावरील भ्रष्टाचाराचे ठसे, ओरखडे सांभाळत जगत असताना या भ्रष्टाचाराचे व्यापक रूपही स्पष्ट होत जाते. कारण आपल्या कृषिप्रधान देशात शेतकऱ्यांच्या पोटी जन्माला आलेले सुशिक्षितही शेतकऱ्यांच्या शोषणात काही गैर आहे असे समजत नाहीत, तिथे ज्यांचा शेतीशी फारसा संबंध नाही अशा शासकीय शहरी अधिकाऱ्यांना कसे काय गैर वाटेल ? स्वतःला बुद्धिजीवी म्हणून मिरवणाऱ्या अधिकाऱ्यांनाच कशाचा धरबंध नाही तर मग जे बुद्धिजीवी नाहीत अशा सत्ताधाऱ्यांना तरी हे शोषण गैर आहे असे का वाटावे ? कळत असूनही ही मंडळी आत्मकेंद्रित होऊन आपल्याच पोळीवर तूप ओढून घेण्यात गर्क झालेली आहे. सगळेच सत्ताधारी भांडवलदारांना विकले गेलेले आहेत. कारण त्यांना असे वाटत असते की 'आपण कुठे कुणाची अडवणूक करतो आहोत ? आपण तर भांडवलदारांकडून घेत आहोत.' पण जे काही भांडवलदारांकडून घेतले जात आहे ते शेतकऱ्यांचेच आहे याची त्यांना पुसटशी जाणीवही असत नाही. एवढेच नव्हे तर जे काही सत्ताधाऱ्यांकडून धन जमवले जात आहे ते शेवटी जनतेच्या तिजोरीतील आहे याची जाणीवही असत नाही. भान हरवलेले हे सत्ताधारी भांडवलदारांना मिळत असलेल्या घवाडातून फार थोडे पदरी पडले तरी त्यातच खूष असतात. तेही मुलखाचे हपापलेले असतात. त्यांनाही पैसा अनेक कारणांसाठी हवा असतो. आज पैसा हाच धर्म झालेला आहे की काय इतपत पैश्यासाठी कुणीही काहीही विकायला तयार आहे. सर्वात मोठी मौज ही आहे की, हे काहीही विकताना कसली लाज वाटू देण्याची सोय आपल्या व्यवस्थेत आहे. म्हणून तर बिनदिक्कत शेतकी अधिकारी भ्रष्टाचार करतो. शासकीय अधिकारी तेच सराईतपणे करतो आणि यांच्यावरचे सत्ताधारी गेंड्याच्या कातडीत, कोरड्या मनाने करतात. या व्यवस्थेचा एक घटक म्हणून न्यायाधीशही मग तेच करू लागतो. तेव्हा आशेचे किरण नाहीसे होत आहेत असे माझ्या मनःपटलावर आदळत राहते. यातूनच एक रसायन अंतःकरणात उकळू लागते. या रसायनाच्या उकळण्यातून मी परमेश्वराऐवजी परत परत नेक माणसालाच शरण जाण्याचा प्रयत्न करतो. कारण या युगात परमेश्वरापेक्षाही माणुसकी

महत्त्वाची वाटू लागते. मानवमुक्ती, मानवी-स्वातंत्र्य, माणुसकी मानवी-सन्मान, शोषणमुक्त, मानव परमेश्वरी आशीर्वादापेक्षा महान आहे. ते सगळेच या भ्रष्टाचार-रोगाने तुंबून राहिलेले आहे. हा रोग दूर करायचा तर प्ररमेश्वराऐवजी, अशा या व्यवस्थेत संधी असूनही भ्रष्टाचार न करणाऱ्या माणसालाच शरण गेले पाहिजे. त्याच्या नेकीने, इमानदारीने, नीतीने माझी मान आदराने झुकते. तेव्हा मनातील सारे हे साचून साचून उकळत असलेले रसायन सर्वसामान्यांच्या, रोजच्या भाषेतून बाहेर पडते. तेव्हाच ही अंतःकरणातली उकळत राहिलेली प्रक्रिया थांबते. उडून गेलेली झोप येते. अस्वस्थता थांबते. एक अनोखे समाधान मनाला लाभते. ती कविता अशी आहे. मला शेती अधिकारी– शासकीय अधिकारी आणि सत्ताधारी एकत्रित दिसू लागतात. त्यातून माझ्या मनाची जी गोची होते ती नेकीने राहणाऱ्या माणसाच्या चरणांवर डोके टेकवून संपते. तिचे कवितारूप खालीलप्रमाणे आहे–

**सोय**

*एकेक साखर कारखाना असा आहे इथे*
*जिथे मुख्य शेती अधिकारी*
*तीस तीस तोळे सोने खरेदी करतो आहे*
*अगदी सहज, बिनदिक्कत, हसत हसत*
*एकेक पद असेही आहे इथे*
*जिथे प्रमुख अधिकारी*
*बचत पत्रांचा ढीगच्या ढीग घेऊन*
*बँकांचे डिपॉझिट व्हॉल्ट भरतो आहे*
*पिढ्यांपिढ्यांची तरतूद म्हणून*
*या सर्वांच्या वरचा तर असा आहे इथे*
*जिथे जो तो आपापला उजेड पाडत आहे*
*अशातही कुणी नेकीने राहात असतील तर–*
*त्यांनी आपल्या चरणांचे ठसे पाठवावेत*
*माझी माथा टेकवण्याची सोय तरी होईल.*
*माझी माथा टेकवण्याची सोय तरी होईल.*

माझ्या मनातल्या भेगा स्वरूप भ्रष्टाचारांचे ठसे अथवा त्या जाणिवांचे रसायन वरील शब्द रूपात साकारले. माझ्या मनातले सगळेच्या सगळे बाहेर येऊ शकले असा माझा मुळीच दावा नाही. पण जो काही या कवितेतून व्यक्त झालेला भ्रष्टाचार-जाणिवेचा आशय आहे तो काही मला एका दिवसात गावलेला नाही; हे ही खरे आहे.

मी अनेकदा पैसे चारून कामं करून घेतलेली आहेत, पाहिलेली आहेत. अनेक घटनांचे वृत्तांत वाचतो. भ्रष्टाचारी लोकांच्या गप्पाटप्पात सामील होतो. तेव्हा तेच म्हणतात, अहो

सगळीकडे चालते. याचे एकच सूत्र आहे– खाल्लेले लिहायचे नाही आणि लिहिलेले खायचे नाही. इथं पर्यंत सगळे ठीक वाटते. पण जेव्हा न्यायाधिशही पैसे खाऊन न्याय विकतो तेव्हा मात्र धक्का बसतो. अशा घटनांचे खास, न्याय्यपद्धतीने समर्थन केले जाते तेव्हा तर जबरदस्त धक्का बसतो. तेव्हा ही भ्रष्टाचार अनुभूतीचे रसायन शब्दांत बाहेर पडायला धडपडते. ते सर्वच्यासर्व मला शब्द माध्यमातून सांगायचे आहे. पण कवितेचा प्रस्थापित आकृतिबंध तर मला ठाऊक नाही, अवगत नाही. सांगायचे तर आहे पण सांगायचे कसे ? म्हणून मी त्या बेचैनीपासून मुक्त होण्यासाठी मला माहीत असलेल्या दैनंदिन शब्दांचीच मदत घेतो. इथे_तिथेचा आकार अचानकच सुचतो. त्यात शेती अधिकारी, शासकीय अधिकारी, सत्ताधारी आपोआपच एकाखाली एक माझ्याकडून सहजपणे बसवले जातात. सुटलेले बाकीचे टिंवटिंबमध्ये येऊन जातात. आणि शेवटी संधी असूनही नेकीने राहणाऱ्या माणसाच्या चरणावर डोके टेकवले की अस्वस्थ झालेल्या मनाला त्या अनुभवापुरती मुक्ती मिळते, सुटका मिळते. कारण तीव्रतेने जाणवलेले सांगितल्याशिवाय, शब्दात मांडल्याशिवाय गत्यंतरच नसते. म्हणून मी लिहितो. जाणवलेले सगळेच सांगावेसे वाटतेच असे काही नाही. पण सांगितल्याशिवाय चैनच पडत नाही. अशा वेळीच मी माझ्या परीने शब्दांत मांडत असतो. त्याशिवाय गत्यंतरच नाही; किमान माझ्यापुरते नसते. अशा तऱ्हेनेच मी लिहितो, लिहीत आलो आहे. त्यामुळे मी स्वतःला रूढार्थाने कवी म्हणवून घेत नाही. की कुणी बरे म्हटले काय किंवा वाईट म्हटले काय याचे सोयरसुतक बाळगत नाही.

मला आता कविता लिहायची आहे असं म्हणून मी कधीच कविता लिहीत नाही. मी कविता लिहितो म्हणजे नेमके काय करतो? तीव्रतेने जाणवलेला जीवनाशय सांगितल्याशिवाय गत्यंतरच नाही अशी जेव्हा वेळ येते, क्षण येतो तेव्हाच मी लिहितो. त्या क्षणी 'मी' बहुतेक निमित्तमात्र राहतो. त्या निर्मितीच्या क्षणी बाकी कुठलीच भावना किंवा विचार डोक्यात येत नाहीत की मनाला स्पर्शतसुद्धा नाहीत. अंतःचक्षूसमोर तो आतला आतला आशय असतो, केवळ आशय ! आजूबाजूला काय चालले आहे याचे भानही राहत नाही. यात काही अलौकिक वगैरे आहे असे मला तरी वाटत नाही. माझ्या मनःचक्षूसमोर शब्द, ओळी किंवा प्रतिमा वगैरे काही काही येत नाहीत, तर केवळ आशयच असतो. तो माझ्या मनासारखा शब्दात यायला हवा; एवढेच मला वाटत असते. शब्द, ओळी लिहितानाच आपोआप बदलत राहतात. हा बदल जे सांगायचे आहे ते सांगून झाले आहे असे वाटेपर्यंत चालू असतो. हे सगळे एका बैठकीतच. मानसिक समाधान झाले की तिथे त्या त्या कवितेची निर्मिती थांबते. एकदा कविता लिहून हातावेगळी झाली की तिचा माझा फारसा संबंध राहत नाही. ती आपली आहे, हक्काची आहे वगैरे मला वाटत नाही.

हे सगळेच थोडक्यात असे सांगता येईल की आपला पिंड, दृष्टी यासह अंतःकरणाला जाणवलेला जीवनाचा आशय सहजपणे, उत्कटपणे अभिव्यक्तीच्या निकडीतून व्यक्त होतो. म्हणजे माझ्या दृष्टीने जळत असलेल्या जाणिवेला मिळालेले शब्दरूप ! हीच ती निर्मिती

प्रक्रिया ! याहून काही वेगळे होत असेल तर, जाणवत असूनही सांगायला येत नाही. जे सांगताच येत नाही ते सांगण्याच्या प्रयत्नातून मग अनेक घोळ निर्माण होऊ शकतात. तो घोळ मी घालू इच्छित नाही. कारण जे जे मी वर सांगितले आहे तोच मुळी एक घोळ असू शकतो; ते मी नाकारू शकत नाही.

---

# श्रीराम

**रवींद्र भट**

---

*"सदा अंतरी मी देवा, तुझे रूप पाही ।*
*मागणे न काही आता, मागणे न काही ॥धृ ॥*
*कृपावंत तूची नाथा, तुला पूर्ण ठावे ।*
*तृप्त जीवनी या मजला अधिक काय द्यावे ?*
*कणाकणामध्ये माझ्या तुझे रूप राही ॥१ ॥*
*झाड मागते का छाया स्वतःची स्वतःला ?*
*सूर्य मागतो का तेजा, स्वतःचे स्वतःला ?*
*नदी, जळा सामावुनिया, जळाकडे जाई ॥२ ॥*
*गंध चंदनाचा कधि का, लेप मागतो रे ?*
*शीतलता जळते त्याची धूप होऊनी रे ।*
*गंधवंत अवघे होता तोच तृप्त होई ॥३ ॥*
*नुरे मला कसली आता क्षितिजबंधरेखा ।*
*रूप मला अवकाशाचे सरे तिमिर हेका ।*
*तुझी तूच चैतन्याची ज्योत करी घेई' ॥४ ॥*
*मागणे न काही आता मागणे न काही ॥*

नेहमी प्रमाणे एक दिवस बाहेरच्या हॉलमध्ये गप्पाष्टकं करीत बसलो होतो. विविध क्षेत्रातली मंडळी येत जात होती. कुठं कविसंमेलन, कुठं व्याख्यानाचं निमंत्रण. कुणी सहजच डोकवायचं, दार उघडं दिसलं म्हणून ! आमच्या घरच्या धबडग्याचं हे नेहमीचंच चित्र !

एक उंचेलेसे गृहस्थ आले. पांढरी पॅन्ट, पांढरा शर्ट, कमरेला काळा पट्टा, केस काहीसे विरळ आणि मागं वळवलेले. कपाळ मोठं, नाक जरा जाडसर आणि सर्वसामान्यांपेक्षा थोडं

लांबटही ! आले, अन् समोरच्या सेटीवर बसले. आमची मित्रमंडळी होतीच आसपास. काहीतरी निरर्थक उखाळ्यापाखाळ्या आणि हंसणं चाललं होतं. ते गृहस्थ जरा चुळबुळ करू लागले. माझ्याही ते लक्षात आलं. वास्तविक मीच यजमान या नात्यानं त्यांची चौकशी करायला हवी होती. क्षमा मागून मी त्यांना कोण, कुठले वगैरे विचारलं.

"मी अमुक अमुक_ कोल्हापूरहून आलो आहे !"

"काही काम आहे_?" मला वाटलं. असेल एखादं व्याख्यानाचं किंवा कार्यक्रमाचं निमंत्रण_!

"वास्तविक काम काहीच नाही. इथून चाललो होतो. घरावरची पाटी वाचली_! आपणच रवीन्द्र भट का ?"

मी मनात म्हटलं. चला आता कमीत कमी अर्ध्या तासाची खराबी ! तोंडदेखलं हसून मी होकार दिला.

"आपल्याशी जरा बोलायचं आहे_!"

"मग बोला ना !"

"काहीसं पर्सनल आहे_!"

त्यानं समोर बसलेल्या माझ्या मित्रमंडळींच्याकडं पाहिलं. ही सारी मंडळीही सहजच आली होती. ती आणखी दहा-पंधरा मिनिटांत निघून गेली. तेवढा वेळ तो गृहस्थ माझ्याकडे एकटक पाहत होता. मी उगीचच अस्वस्थ ! त्याच्या मिशा चांगल्या टोकदार आणि गालावर वळविलेल्या होत्या. मित्रमंडळी निघून गेल्यावर मी त्याच्याकडे पाहिलं. त्याच्या भेदक दृष्टीनं अंगावर उगीचच शहारा आला.

"बोला, काय काम होतं_?"

"सन १९९५ साली तुम्हाला साहित्य क्षेत्रातलं सर्वोच्च पारितोषिक मिळणार आहे_! मी म्हणतो, नाही मिळालं तर कोल्हापूरला येऊन माझ्या मिश्या उतरवा_! परमेश्वरसाक्ष सांगतो यातला शब्दन् शब्द खरा आहे." मला तर काय बोलावं हेच सुचेना !

"पण, त्यामध्ये काही अमानवी, अमानुष शक्ती अडथळा आणण्याची शक्यता आहे त्याचा बंदोबस्त करायला हवा."

"हे पहा, असलं काही करण्यावर माझा विश्वास नाही !"

"आपण जरा विचार करा. मी उद्या पुन्हा येईन_!"

"उद्याही मी हेच सांगेन आपल्याला_!"

थोडा वेळ बसून चहा घेऊन माझ्याच टेबलावरची एक सिगरेट शिलगावून तो काहीसा गूढ हसत निघून गेला. मीही माझ्या दैनंदिन कामाला लागलो. दिवसभर मनात कुठ तरी त्या पारितोषिकाचा विचार होता. नाही कशाला म्हणू ? परंतु फारशी दिवास्वप्नंही मी पाहिली नाहीत. हेही तितकंच खरं_!



अनुक्रमणिका

रात्री १०-१० ॥ वाजता जेवण उरकून बाहेर स्वस्थपणे येऊन बसलो. सर्वत्र शांतता होती. समोरच्या शोकेसवरच्या ज्ञानेश्वरांच्या मूर्तीशेजारी मंद दिवा तेवत होता. माझं सहज तिकड लक्ष गेलं. ज्ञानदेवांच्या मुखावर एक शांत स्मित हास्य होतं. मला अंतर्मनाला असं जाणवलं, की ज्ञानदेव मला विचारत आहेत, तुला आणखी काय हवंय_? मी माझ्या मनाशीच उद्‌गारलो,

"मला काहीच नको_!"

टेबलावर पॅड होतं. ज्ञानदेवांच्यां प्रश्नाचं उत्तर माझं पेन लिहीत होतं. त्याचं वृत्त, त्याची शब्दकळा काहीही ठरलेलं नव्हतं. सर्वसाधारणपणे चार कडव्याचं एखादं भावगीत म्हणायला जेवढा वेळ लागेल तेवढ्या वेळात गीत संपूर्णपणे पॅडवर लिहिलं गेलं_।

कुणी काही म्हणा. पण घडलं ते घडलंच आहे. आणि ही शब्दकळा माझी नाही. याचीही मला स्पष्ट जाणीव आहे ! हा प्रसाद आता स्वरबद्ध करून मी आणि माझी पत्नी समोर येईल त्याला वाटतोय्_!

"ओठावरली गाणी" या माझ्या गीत संग्रहात हे गाणं समाविष्ट झाल्यावर मला अनेकांची पत्रं, फोन आले. कुणा म्हणालं, हे पसायदान आहे_कुणी म्हणालं पूर्ण ज्ञानाची खूण आहे. कुणी म्हणतं संताची जातकुळी आहे. बरेचजण म्हणतात रवीन्द्र भट दांभिक आहे !

कुणी काही का म्हणेना. माझ्या शेकडो गाण्यांपैकी हे गाणं माझं सर्वांत आवडतं आहे. कारण_कारण स्वच्छ आहे ते माझं असून, माझं नाही. त्या क्षणापुरतं का होईना. "तृप्त" म्हणजे काय, हे मी अंतर्बाह्य अनुभवलं आहे ! आज जुलैमध्ये वर्ष झालं. जेव्हा जेव्हा मी चिडतो, खंतावतो तेव्हा तेव्हा मी स्वतःशीच गुणगुणतो.

*गंध चंदनाचा कधि का लेप मागतो रे ?*
*शीतलता जळते त्याची धूप होऊनी रे ।*
*गंधवंत अवघे होता तोच तृप्त होई_*
*मागणे न काही आता,*
*मागणे न काही ॥*

—रवीन्द्र भट, ॐ ज्ञानपीठ, १२२१ अ रँग्लर परांजपे रस्ता, पुणे ४११ ००४.

# चालण्याच्या नादात

सुशीला पगारिया

*चालण्याच्या नादात*
*अरण्याला केव्हा सुरवात झाली*
*हे कळलंच नाही,*
*जरा टेकावं म्हणून*
*ज्याच्या आधाराने ती बसली*
*त्या खंडावर 'शिलालेख'*
*तिच्याच नावचा;*
*जन्माला येण्याआधीच*
*आयुष्य कोरून बंदिस्त केलेले !*
*सूर्य मिटू मिटू पहात होता,*
*आता तांबूस डोळ्यांनी*
*विस्तारून तिने वाचले,*
*'या पुढचा भाग*
*अमुक गावच्या तमूक वेशीवर.'*
*मुकाट्याने तिने गाठोडे उरावर घेतले*
*माथ्यावरच्या पदरासरशी*
*सूर्यालाही थोडे मागे लोटले*
*आणि ती चालू लागली.*

सस्नेह नमस्कार,

प्रथमच नमूद करते सर्वांत आवडती, प्रिय कविता अशी कुठलीच कविता नाही, कविता म्हणजे आयुष्य. अनुभव, भाव-भावना यांच्या घुसळणीतून सहज वर आलेली आणि लेखणीद्वारे कागदावर उतरलेली ही एक सहज पण अपरिहार्य प्रक्रिया आहे. त्यात कला-कुसरीचा भाग अगदीच कमी, (थोडासा निटसपणाचा भाग वेगळा). त्यामुळे प्रत्येक कवितेच्या निर्मितीची अहंता यायचा प्रश्नच उद्‌भवत नाही. कधी कधी तर फिरून पुन्हा कविता वाचताना विस्मयही वाटतो. म्हणजे कविता लिहितानाची मी आणि एरवीची मी– थोडक्यात उधान आलेली मी आणि शांत स्थिर 'मी' असते.










आणि म्हणून एकच 'प्रिय' अशी कविता म्हणता येत नाही. माझ्या सगळ्या कवितांमधून एक कविता देते. झालं– ती लिहिली, २०-१-७७ ला पहाटे साडेतीनला. साधारण पहाटे तीन-साडेतीनची वेळ, ही माझी नेहमी मनात कविता रुणझुणायची वेळ. 'केसर' नंतर बऱ्याच कविता साचल्या आहेत. आता त्या संग्रहात यायच्या आहेत. त्यातलीच ही कविता ! ही कविता 'सत्यकथेत' प्रकाशित झाली. ती आवडल्याची अनेकांची पत्रं आलेली; रमेश तेंडुलकरांनी तर 'महाराष्ट्र टाइम्स' मध्ये 'मला आवडलेल्या कविता' या सदरात उल्लेखिलेली.

आयुष्य सरळसोट असं कधी वाट्यालाच आलं नाही. आयुष्याचा झोका नेहमीच क्षितिजाला भिडायचा. त्यातलं एक क्षितिज जे वरवर बघायला अतिशय देखणं, हेवा वाटेल असं झगमगतं वैभवाचं, पण झोका तिथे टिकणारा नसतोच; दुसऱ्या क्षितिजाला असतं– उपेक्षा, अपमान, फसवणूक आणि तिरस्काराचे इतके जहरी डंख की अलिकडच्या क्षितिजाचा देखावा सुद्धा यातनाकारी होतो.

कविता होतांना शब्दांची कुसर करायला किंवा ते मुद्दाम छंदावृत्तात बांधण्याचा प्रयास करायला अवसर नसतो. ती येते जशी गाभाऱ्यातून तशी शब्दांची नव्हे– 'आतलं व्यक्त करणारी फक्त' ती घाईने कागदावर उतरत जाते. एखादी ओळ पुढे मागे करून आपलं म्हणणं स्पष्ट झालं की नाही एवढंच बघायचे. अर्थात ही घाई 'भूषण' नव्हे. ती छंदो-वृत्तात अधिक चांगली सजेल. दिसेल. पण का कोणास ठाऊक मग मला ती कृत्रिम वाटते. (फक्त माझ्यापुरती आणि माझीच हं). एकदा बा. भ. बोरकरांनी माझी 'झिलई' नावाची कविता सुरेख वृत्तात बसवून दाखवली: आणि त्यांची क्षमा मागून त्यांना मी माझीच मला बरी वाटल्याचे सांगितले होते.

ज्याला नेहमी घोंगडी पांघरायची सवय त्याला किमती दुशाला अंगाला सुख देत नाही, तशातलाच हा प्रकार. माझ्या कवितेला माझी म्हणून एक लय आहे, आणि व्यक्त करायला मला ती पुरेशी आहे. माझ्या त्या व्यक्त करण्याला तुम्ही काय नाव द्यायचं ते वाचक हो तुमचं तुम्ही ठरवायचं. परंतु प्रत्येक कविता माझ्या व्यक्तिमत्त्वाचा माझा एक एक तुकडा आहे. भाषेच्या संदर्भात त्याला किती कुठले मोल आहे ठाऊक नाही. परंतु खांडेकर, अनिल, कुसुमाग्रज, इंदिरा संत यांच्या सारख्यांना त्या आवडल्या. आवर्जून उल्लेख करावासा वाटला. त्या अर्थी कुठले तरी मोल असले पाहिजे.

ध्यानी मनी नसताना माझ्या कवितांचे स्वागत प्रचंड झाले ते पाहून मीही विस्मयचकित झाले. परंतु कविता म्हणजे कात टाकण्याइतके अपरिहार्य असल्यामुळे त्यात कर्तृत्वाचा. अहंतेचा भाग अगदीच कमी आहे हे पुन्हा एकदा नमूद करावेसे वाटते.

—सुशीला पगारिया, ओंकार नगर, जिल्हा पेठ, जळगाव



अनुक्रमणिका







# पुन्हा एकदा

अनुराधा पाटील

*मी होईन सहज. पुन्हा एकदा*
*मातीसारखी*
*रानोमाळ पसरलेल्या गवतासारखी*
*आणि माझ्या घराची*
*दारं उघडून*
*आत येतील उन्हाची किरणं*
*पावसाचे अखंड टपटप नाद*
*येतील हिवाळी वारे*
*आणि भरून येतील ऋतूंबरोबर*
*ऋतूंच्या साठी*
*कविता माहीत नसणारांचेही डोळे*
*दूर कुठंतरी लागलेले*
*मी-होईन सहज. नदीसारखी*
*ढगांसारखी*
*मला आठवेल पुन्हा एकदा*
*आश्विनातलं मोकळं आभाळ*
*आणि काळोख्या खोलीत*
*दिव्यावर*
*बांगड्यांचे तुकडे जोडून*
*काचकमळ करत बसलेल्या पोरींच्या*
*गालांवर उतरेल पाणी*
*कधीपासून डोळ्यांआड थांबलेलं.*
*मी होईन सहज. नदीच्या पाण्यावर*
*आणि वाढत्या पिकांवर*
*पसरणाऱ्या,*
*काळोखाच्या झाकेसारखी*



अनुक्रमणिका

मला आठवेल वाऱ्यावर पावसावर
पसरत येणारा,
रानावनाचा पिकापाण्याचा
आश्वासक, गडद ओला रानवास.
आणि कुणीतरी देईल आवाज
पुन्हा एकदा,
माझ्यातल्या अनंत निर्जनतेला.
कदाचित मी येईन सुद्धा परत
आणि मेलेल्या स्वप्नांच्या
मातीखालून,
ऐकू येईल कोवळा किलबिलाट.
मी येईन परत आणि होईन सहज.
जन्मासारखी. मृत्यूसारखी.
मी घेईन ईश्वरा तुझ्या हातून
पुन्हा एकदा,
एखाद्या उदास पाखरासारखं
तू नेमून दिलेलं दाणापाणी.
आणि घेईन
त्या असंख्य यातना
ज्यावर लिहिलेलं असेल तुझ्या
अदृश्य हातांनी
माझं, फक्त माझं नाव.
मी मागीन आभाळाकडे
पुन्हा एकदा
माथा नमवून थोडी करुणा
आणि मागीन
मला बदलताच येणार नाही
त्या अंतिम यथार्थाला
स्वीकारण्याचं बळ.
की, हे मेळे तर असे
येतच राहतील
वाटा तुडूंब चालतच जातील



अनुक्रमणिका

*सगळयांचा क्रम असा*
*कायमच राहील,*
*तुझ्यापासून माझ्यापर्यंत*

तुमचं पत्र मिळालं. तुमच्या दिवाळी अंकाचा विषय चांगला आहे. त्यावर तुम्हाला काही चांगला असा मजकूर मिळूनही जाईल. मला स्वतःला मात्र यातले काही प्रश्न सोडले तर बाकीचे एका मर्यादित अर्थाने थोडे निरर्थक आणि तापदायक वाटले. ते अशासाठी की, कविता लिहिण्याच्या आधीची आणि नंतरची प्रक्रिया ही गुंतागुंतीची, अनेक स्तरांवर काम करणारी असते. ती सांगणं कुणासाठीही अवघड असतं. असावं. शिवाय सांगता आलं तरी खूप काही राहून ज्ञात असावं. पण तसा प्रयत्न करायला हरकत नाही.

१. माझ्याकडे कविता लिहून झाल्याची अचूक तारीख नसते. कारण लिहून झालेल्या कवितेमागचे अनुभव आणि तिचे संदर्भ खूप आधीपासून मनात असतात. शिवाय लिहून झाल्यावरही तिच्यात अचानक केव्हातरी शब्दांचा/. ओळीचा बदल अपरिहार्य ठरतो. त्यामुळे कवितांना तारखा घालून विशिष्ट दिवसात त्या बंदिस्त करणं मला आवडत नाही. या अंकासाठी दिलेली कविता साधारण कोणत्या वर्षातली आहे ते सांगता येईल.

१९८७ मधली ही कविता आहे. १९८८ च्या 'मौज' दिवाळी अंकात ती प्रकाशित झालीय. आणि १९८८ मधली मराठीतली सर्वोत्कृष्ट कविता म्हणून दिल्ली इथून निघणाऱ्या 'वार्षिकी'साठी तिची निवड झालेली आहे. अलीकडची कविता असल्यानं माझ्या कविता-संग्रहांमध्ये ती नाहीय.

२/३. या किंवा कोणत्याही कवितेची प्रेरणा त्या वेळचे वातावरण किंवा अनुभवाचे वेगळेपण असा तुमचा प्रश्न आहे. एखादा तात्कालीन प्रश्न, प्रसंग, किंवा घटना घेऊन त्या प्रसंगाबद्दलच्या वर्तमान भावना खूपदा कवी कवितेत व्यक्त करतात. मला स्वतःला अशा प्रसंगनिष्ठ कविता लिहिणं, घटना खूप मोठी, व्यापक, संपूर्ण आयुष्यावर परिणाम करणारी, त्याचे संदर्भ बदलून टाकणारी नसेल तर नको वाटतं. आपले इतरांचे अनेक अनुभव प्रसंग, त्या त्या वेळेस सोसलेल्या वेदना, केव्हातरी कविता बनून येतात. कविता लेखनाच्या प्रेरणा किंवा वातावरण काहीही असलं तरी आपली व्यक्तिगत सुखदुःखं बाहेरच्या, इतरांच्या पटावर नकळत ठेवली गेलेली असतात. ती तशी ठेवूनच दुसऱ्यांबद्दल कवीला थोडं फार बोलता येतं. आतून बाहेर असा हा प्रवास असला तरी मूलतः तो आत्मनिष्ठच आहे. शिवाय कवितेच्या प्रेरणा किंवा त्या त्या वेळचं वातावरण याबद्दल लिहिणं याच्यासाठीही कठीण आहे की, आज आत्ता मी कविता लिहितेय म्हटलं तरी त्याची मुळं खूप लांबवर मागे-पुढे गेलेली असतात. आणि मला वाटतं अनुभव घेण्याची किंवा आपोआप अनुभव येत असतानाची, त्यावर कवितेच्या दृष्टीनं मनातल्या मनात संस्कार होण्याची, अनुभवाची तीव्रता स्पर्शून जाण्याची एक साखळीच मनात खोलवर सतत आकार घेत असावी. खूपदा कवितेशी संबंध नसलेली माणसं, स्थळ, आणि वातावरणही डोळयांसमोर येतं, ती आंतरिक जाणीव असावी. केव्हातरी

जोडली गेलेली. उदा.

*"वाळूवर सांडणाऱ्या पाण्यासारखं*
*आयुष्य झिरपून जातंय*
*ओंजळीतून"*

किंवा,

*"आणि कानात भरून राहतो*
*रात्री बेरात्री पत्र्यांवर पडणाऱ्या*
*पावसासारखा*
*बेचैन करणारा आवाज"*

किंवा,

*आणि मागीन*
*मला बदलताच येणार नाही*
*त्या अंतिम यथार्थाला*
*स्वीकारण्याचं बळ"*

असं जेव्हा मी लिहिते तेव्हा समोर नेमकं काय असतं ? नजरेसमोर तसं काही नसतं. पण मनात कुठेतरी रुजलेले लहानपणीचे नदीचे प्रवाह, तासन्तास वाळूवर बसून बांधलेली, ढासळलेली घरं मनात कुठेतरी असतात. रात्री-बेरात्री पत्र्यावर पडणारा पाऊस आणि त्याचा अस्वस्थ करणारा आवाज आज माझ्या कवितेत दुसऱ्या कुठल्यातरी संदर्भात येतो. पण त्याच्याशीं बांधल्या गेलेल्या केवढ्या गोष्टी आहेत ! पावसाने लावलेली झड, प्रचंड कोसळणारा पाऊस, आठ-आठ दिवस घरात तेलाचा थेंबही नाही म्हणून नुसतीच उकडलेली भाजी आमच्यासमोर ठेवून स्वतः तांब्याभर पाण्याच्या आधाराने पोट भरणारी आई, चिमणीच्या भकास उजेडात चूपचाप बसलेली रडवेली झालेली भावंडं. तलफ आली तरी नंतर कामात येईल म्हणून विडीचं थोटूक नुसतंच पाहून ठेवून देणारे वडील आठवतात. पावसाची झड थांबली नाही तर उद्याचा दिवस कसा रेटावा, या काळजीने काळवंडलेले त्यांचे चेहरे आठवतात. आणि आजही, इतक्या दूरवर आल्यावरही व्याकूळ करतात. पत्र्यावर पडणाऱ्या पावसाचा बेचैन करणारा आवाज असा थेट माझ्या भूतकाळाशी कळत नकळत जोडला गेलेला असतो. त्यामुळेच 'अंतिम यथार्थाला स्वीकारण्याचं बळ' मागताना असंख्य अभाव, मुकाट स्वीकारले नाहीत तरी पर्याय न उरलेले पराभव, कालची आजची उद्याचीही सुखदुःखं माझ्यासमोर असतात. म्हणून एखाद्याच कवितेची प्रेरणा, मुद्दाम आठवून सांगितलेले अनुभव किंवा वातावरण याबद्दल लिहिणं काही खरं नाही.

४. आपण लिहितो किंवा ज्या कशाचीही निर्मिती करतो ती कोणतीही लहानात लहान गोष्टसुद्धा मनावर एकप्रकारचा ताण आणते. कविता माणसाला या अर्थानं जास्त थकवते.











लिहायच्या आधी वेचैन, आणि लिहून झाल्यावरही सहसा असमाधान असं होतं. मी कविता बऱ्याचदा एका बैठकीत पूर्ण करते, नाही असं नाही. पण कधीतरी तुकड्यातुकड्यांनीसुद्धा मी कविता पूर्ण केल्या आहेत. कित्येकदा दोन चार ओळी सुचतात आणि महिने न् महिने पुढं काहीच नाही असंही होतं. ही कविता मात्र दोन दिवसांत सलगपणे लिहून झालेली आहे. कवितेवर संस्कार करणं तर अटळच असतं.

५. कविता मुक्तछंदातच आहे. माझ्या पिढीच्या कवींना बहुधा मुक्तछंदच परवडतो. म्हणजे कुठल्याही पद्धतीनं मांडलेल्या, काहीही लिहिलेल्या लिखाणाला कविता म्हणता येतं. अर्थात यातला गमतीचा भाग सोडला तरी अलीकडे कविता मुक्तछंदातच लिहिल्या जातात एवढं खरं:– कदाचित वृत्तांचा, छंदाचा अभ्यास नसणं, आपल्या काव्य परंपरेची पुरेशी माहिती नसणं, वृत्त, छंद, किंवा ओवी, अभंग या प्रकारांमध्ये कविता लिहिणं कालबाह्य वाटणं अशीही कारणं असतील. शब्दांसाठी माझी कविता सहसा अडत नाही. तीव्रतर भावनेतून आणि दाटून आलेल्या उत्कटतेमधून शब्द सहजच येत राहतात. पण कधीतरी एखाद्याच शब्दासाठी कविता अडते. म्हणजे आहे तो शब्द नको असतो आणि कोणता अचूक, योग्य शब्द हवा तेच कळत नाही, सुचत नाही असं होतं. शिवाय लिहिताना कवितेची अंतर्गत लय, शब्दांची रचना ओळींची मांडणी, कविता स्वतःच्याच पद्धतीने, शैलीने लिहिली जातेय का ? लिहिली गेलीय का ? या गोष्टींचं थोडंफार भान तर असावंच लागतं. तरी खूपदा काहीतरी सांगायचं, लिहायचं राहून गेलं असं वाटत राहतं.

६. रसिक आणि टीकाकार यांनी कवितेचं स्वागत कसं केलं असाही तुमचा एक प्रश्न आहे. थोडंसं हसू आणणारा. मला वाटतं कोणत्याही काळात कवितेला वाचक कमीच असावेत. आज प्रचंड प्रमाणावर कविता लिहिली जाते. (रामदासांच्या काळातही कदाचित अशीच परिस्थिती असावी. कारण कविता गवतासारखी उदंड झाल्याचा उल्लेख ते अगदी तळमळून करतात.) त्यातली बरीचशी कविता निरर्थक असली तरी मूळात कवितेच्या कमीच असलेल्या वाचकाने काय काय वाचावं याचाच प्रश्न पडतो. शिवाय अनेक गोष्टींचे अर्थ मूळापासून बदललेले आहेत, जगण्याची क्रिया एवढी गतिमान, दिखाऊ आणि उथळ झालीय अन् लोकांना सगळं सहज, विनासायास, डोक्याला ताप नसणारं असं हवं आहे. वाचण्यापेक्षा पाहणं, ऐकणं बरं असाही दृष्टिकोण टी. व्ही. सारखा वैतागवाण्या माध्यमांनी हळू हळू पण निश्चित रुजवला आहे. त्यातही एकूणच वाङमयाबद्दलची आस्थाच कमी झालेली आहे. त्यामुळेही काहीतरी वाचणं, पत्र पाठवणं, त्यासाठी वेळ राखून ठेवणं, त्यालाही वेळ नसतो. मग कधीतरी कुठेतरी उडता उल्लेख वगैरे केला जातो. निदान माझ्या काळात तरी हीच परिस्थिती आहे. अर्थात केव्हातरी काही चांगले अनुभवही येतात.

टीकाकारांबद्दल बोलण्यात तर काही अर्थ नाही. अलीकडे सगळीच समीक्षा ही बऱ्याचदा लेखक-कवींच्या सोयीने होते. किंवा मग सगळ्या न कळलेल्या गोष्टी ठराविक चौकटीत बसवण्याचा प्रयत्न होतो. अनेकदा तर कवीच वेगवेगळी नावं घेऊन स्वतःबद्दल लिहितात.



अनुक्रमणिका

शिवाय काही सन्माननीय अपवाद वगळता समीक्षेकडे गंभीरपणानं पाहणारे, त्या पाठीमागच्या सांस्कृतिक, सामाजिक, साहित्यिक मूल्यांचं भान ठेवणारे टीकाकार तरी कुठे आहेत ? आणि जे आहेत त्यांना ठराविक कालखंडापर्यंत येऊन थांबणं आवडतं. ठराविकच कवी आवडतात. मग बाकीचे एकतर कुठंच नसतात. त्यांना सरळ कचऱ्यात टाकलं जातं. बाकीच्यांना अनुल्लेखानं मारलं जातं. असा दोन्ही बाजूंनी हा कठीण प्रकार आहे. माझ्याबद्दल बोलायचं तर माझी कुठल्याही वाङ्मयीन गटाशी किंवा कुठल्याही वाङ्मयीन नियतकालिकांच्या परिवाराशी संबंध नसल्यानं त्यांनी मला टाळण्याचाच प्रयत्न केलाय. पण या उलट अनेक अनपेक्षित अशा दूर दूरच्या रसिकांनी वाचकांनी उत्स्फूर्त दाद दिलीय. महाराष्ट्रातून आणि महाराष्ट्राबाहेरून अगदी खेडपाड्यातूनही मला पत्रं आलीत. त्यांत सामान्यांपासून जाणत्या वाचकांसकट सगळ्यांची पत्रं आहेत.

७. अमूक एक कविता निवडून ती प्रिय का हे सांगणं म्हणजे इतर कवितांवर तसा अन्यायच होतो. आणि आपल्याला आज आवडणारी कविता उद्या तशीच वाटेल असंही सांगता येत नाही. मला स्वत:ला तर लिहून झालेल्या कोणत्याही कवितेनं पूर्ण समाधान दिलं असं होत नाही. कुठल्या ना कुठल्या कारणानं त्या कवितेत अनेक दोष मला नंतरही दिसत राहतात. अस्वस्थ करत राहतात. ही कविताही त्याला अपवाद नाही. तरी ही कविता मला आवडते. पण कोणत्याही आवडत्या गोष्टीबद्दल अमुक का आणि ते का नाही याला काही अर्थ नसतो. साहित्याला कदाचित असे निकष लावता येतात. पण त्यातही अगदीच व्यक्तिगत कारणानं किंवा केवळ मनाला आनंद होतो म्हणून सुद्धा "अभिजात" या यादीत नसलेलं लेखन आपल्याला आवडतं. कवी-लेखकाला स्वत:च्या सर्वच लिखाणाचं प्रेम असलं तरी त्यालाही अशाच आवडी-निवडी असतात. त्यामुळे ही कविता आवडते एवढंच म्हणता येईल. निदान आज तरी. कदाचित माझ्या काही चांगल्या कवितांमधली ती नसेल सुद्धा. कविता आवडण्याचं सर्वात महत्त्वाचं कारण हे आहे की, ही कविता लिहिण्यापूर्वीच्या दिवसांत आणि लिहून झाल्यावरही मी मनानं पुन्हा पुन्हा मोडले. घडले. माझ्या जवळ जवळ नास्तिकच असलेल्या मनाला काही श्रद्धेच्या, काही मान्यतेच्या नव्याच कंगोऱ्यांनी विचलित केलं. मानलं तर, आहे नाही तर काहीच नाही अशा एका अफाट ईश्वरी सत्तेचं शाश्वत, भयचकित करणारं एक अनोखं रूप या कवितेमुळे माझ्याबरोबर थोडं का होईना, उलगडत गेलं. मनाचे काळोखे कोपरे उजळून निघाले.

*जगण्याबद्दलचा आणि अभावांचा,*
*अटळ परिस्थितीचा आणि समंजस स्वीकार शीलतेचा,*
*विनाशाचा आणि आश्वासक जाणिवांचा,*

विस्मित करणारा स्पर्श माझ्या मनाला पुन्हा एकदा झाला. त्यामुळेही ही कविता मला आवडते.

जाता जाता सांगायचं म्हणजे तुमच्या या प्रश्नांच्या निमित्तानं कवितेचा सगळा प्रवास मी

पुन्हा एकदा केला. अगदी सुरुवातीचे, शब्दांची जेव्हा नुसती ओळखच होत होती असे दिवस आठवले. त्यातला अद्भुत आनंद आठवला. खरं तर इतर काही सुदैवी लेखक, कवींसारखं घरात वाङ्मयीन वातावरण नव्हतं. लेखक-कवींच्या ओळखीपाळखी असण्याचंही कारण नव्हतं. माझ्या आई-बापाचं जगणं म्हणजे हातातोंडाची गाठ कशी पडेल याची अखंड काळजी होती. जिथं मुलींसाठी शाळेचा खर्च ही चैन असते आणि आल्यावर दोन किरा ओढता याव्यात एवढाच उद्देश असतो अशा खेड्यातल्या ज्या सामाजिक, आर्थिक, संस्काराच्या, आणि जातीच्या स्तरावर मी वाढले तिथं अशा गोष्टीचा कुठं मागमूसही नव्हता. अशा वातावरणातून आल्याने असेल, पण त्यामुळे आजही कवितेमुळे मिळालेलं नाव, मान सन्मान याच्यापेक्षा मला वाङ्मयातल्या या श्रेष्ठ, समर्थ मानल्या गेलेल्या प्रकारात काही करता आलं, चार ओळी लिहिता आल्या, याचाच आनंद अधिक होतो. कदाचित कविता हा वाङ्मय प्रकार सर्वांत जास्त आवडण्याचं, कवितेशी कृतज्ञ असण्याचं, अनेक कारणांमधलं हेही एक छोटंसं कारण असेल !

(अनुराधा पाटील, — औरंगाबाद)

---

# कळावे लोभ असावा

वासंती इनामदार-जोशी.

---

आपल्याच मनाविषयी बरेचदा फार प्रामाणिकपणे अगदी कमीच विचार आपण करतो. आणि जो करतो तो ही पुष्कळदा स्वतःच्या समर्थनार्थ असाच असतो. मोरपिसांचे डोळस आंधळेपण आपण भारावलेपणाने मिरवीत राहतो. आणि त्यातून सिद्ध करतो आपले स्वतःचेच मोठेपण. एकमेवपण. खरं तर आपल्या पावलांना आपण फार फसवू शकत नाही. कारण कितीही फसली ती पावलं, तरी कायम फसत नाहीत. कारण त्यांना स्वतःली वाट चालायची असते. आपले मन ती वाट दाखवत राहते. बनवेगिरी करून पण चालायची असते वाट पावलांनाच. वनवासी पावलांनाही वाट समजते. आणि मखमली 'पैजार' घालणाऱ्यालाही समजते. मी कविता लिहायला सुरुवात केली तीच मला माझ्या मनाने विचारलेल्या अनेक, असंख्य प्रश्नांचे घाव सोशित सोशितच. कारण माझ्या पावलांना, माझ्याच कडेवर घेऊन मी आयुष्याची वाटचाल सुरू केली होती. माझ्या रांगण्याची भीड जगाला घालायची नाही असा निश्चयही केलेला होता.

आपल्याला कविता करता येतात असा शोध लागताक्षणीच आभाळातल्या पावसाळी पावसाप्रमाणे धो धो कविता लिहायला सुरुवात केली होती. अतःकरणात खूप ओथंबून यायचे. बेहोशीने शब्दांना सामोरं जाता जाता खपदा कडेलोटही केला भावनांचा. अनेकविध











भावभावनांचे तांडेच्या तांडे समोर असायचे. जगण्याचे हिशेब जुळवता जुळवता दु:खाच्या, सुखाच्या बेरजा, वजाबाक्या शून्यात मिसळविण्याचा प्रयत्नही करीत होते. कधी बाकी खूप खूप वाटायची. कधी फक्त एक शून्य, नुसतं शून्य.

स्वत: लिहिलेल्या सगळ्या कविता एखाद्या काचघरासारख्याचं वाटायच्या. भावदर्शी, पारदर्शी, स्वप्नदर्शी ! ! त्या काचेरी प्रकाशात सगळ्या मन:स्थितीची कळ्या, फुलं कशी सुंदर सुंदर वाटत राहायची. आणि आपण चालू शकत नाही आणि त्या अनुषंगाने जे जे करू शकत नाही त्या सगळ्याचे दु:ख लिंपले जायचे. कवितेचे हे सामर्थ्य केवळ सुखावह होतं. भरजरी सुख, किनखापी ! ! जवळ पाच हजार कविता आत्तापर्यंत प्रकाशित झाल्या. वार्षिके, मासिके, त्रैमासिके, पाक्षिके, साप्ताहिके, दैनिके, अनियतकालिके सगळी सगळीकडे. अगदी सगळ्या प्रकारातल्या; भावगीतं, लावणी, अभंग, मुक्तछंद, रुबाया, कणिका, हायकू, गझल.

मात्र एक कविता_ प्रकाशित आणि अप्रकाशित अशा मिळून जवळ जवळ आठ हजार कवितांमधून, एक कविता_ अं_ कविताच म्हणायला हवी तिला, अशी लिहिली गेली की तिला कविता प्रकारातल्या कुठल्या प्रकारात बसवावं समजलं नाही. पण असंख्य कवितांच्या धुक्यातून ती कविता अजूनही स्पष्टपणे माझ्या मनात लुकलुकत असते.

ही कविता लिहिली गेली होती. साधारण ६०-६१ च्या सुमारास. त्या सुमारास मी प्रचंड प्रमाणात कविता लिहीत होते. रोज जवळ जवळ २०-२५ तरी. त्यातील किती दर्जेदार वगैरे हा भाग निराळा. 'कागद दिसला की लिही कविता, पाठव कुठल्यातरी मासिकाकडे, ती छापून आली की हो मग आनंदीत आणि वाच पुन्हा पुन्हा त्या कवितेखाली लिहिलेलं आपलंच नाव 'वासन्ती इनामदार' असं माझे मन मला तेव्हा सतत सांगत असे. अणि त्या मनाचं मी ऐकतही असे. ते नाव कसे कल्हई केलेल्या भांड्यासारखे सुंदर भासायचे. वासन्ती इनामदार हे नाव.

कविता वहीत लिहून ठेवायची असते. त्याखाली ती केव्हा लिहिली त्याची तारीख लिहायची असते. ती कुठे प्रसिद्ध झाली, केव्हा झाली याचीही नोंद करायची असते. असल्या फालतू गोष्टींकडे लक्ष कुणी दिले नाही. मलाही ते सुचले नाही. कारण असे काही माहीत नव्हतेच. आमच्या घरात, घराण्यात मीच प्रथम असा उद्योग सुरू केलेला होता. तो 'सिस्टीमॅटीक' असणे शक्य नव्हतेच. मात्र ही कविता ६१ च्या सुमारास लिहिली गेली असावी. कारण त्या वेळेस मी प्रचंड प्रमाणात कविता लिहीत होते. त्या डोंगरातलीच ही कविता आहे हे मात्र नक्की आठवते. त्या वेळेस दिवाळी अंकातूनही मी खूप लिहीत असायची. जवळ ८० ते १०० दिवाळी अंकातून माझ्या कविता, कथा प्रसिद्ध व्हायच्या. केतकीबनातला गंध किती मोजायचा ? त्याचा हिशेब तरी कसा ठेवायचा ? माहेरच्या सांजफुलांची अपूर्वाई कुणाला ? नी किती ?

त्या वेळेस अनेक अंकांकडून माझ्या कवितांना मागणी यायची. ती मागणी आलेली पत्रंही पुन्हा पुन्हा वाचली जायची. मजा मजा वाटायची.

तसंच एकदा किणीकरांचे एक पत्र आले. 'आरती' नांवाचे वार्षिक ते काढीत होते.



अनुक्रमणिका








त्यासाठी त्यात ही कविता प्रसिद्ध झाल्याचे चांगलेच आठवते. पण, त्या वार्षिकाचे साल वगैरे आठवत नाही. त्या वार्षिकाच्या मुखपृष्ठावर एका नग्न स्त्रीचे चित्र होते हेही आठवते. आता ही कविता 'पापुद्रे' या माझ्या येणाऱ्या संग्रहात समाविष्ट केलेली आहे. या कवितेवर कुठलेही संस्कार केलेले नाहीत. ती एका बैठकीत लिहिली. एका बैठकीत म्हणण्यापेक्षा दोन सेकंदात. म्हणजे 'वासन्ती इनामदार' हे जसं, जेवढ्या सहजतेने लिहायची तशी. तशीच लिहिली. तेव्हढ्याच वेळात लिहिली. आणि नंतरही त्यात काही बदल केलेला नाही. ती लिहिताना छातीत भयंकर दाटून आलेलं होतं. आपल्याला देवाने पाय दिलेले नाहीत याबद्दल रडू सुद्धा येत नव्हतं. अशा कोडग्या पण जड झालेल्या हृदयात आयुष्याच्या पराभवाचे दारूण दु:ख ठचाठच भरले गेलेले होते. छातीवर डोंगर पडावा एवढे वजन. या वजनाने आपण मरून तर जात नाही पण छाती मात्र फुटते आहे. परमेश्वराने मागचे दोर कापून टाकले आहेत. आणि_ आणि आपल्याला चालायचे आहे_ आपण कोण ? कोण आपण ? चार संपादकांनी कविता, कथा, मागितल्या म्हणून थोर झालो ? आपण तर पहिली सुद्धा शिकलेलो नाही. आपण इतरांसारखे साधं चालू शकत नाही. बाकीच्या गोष्टी तर सोडाच हो. सोडाच.

पण तरीही आपल्याला कविसंमेलनासाठी बोलवतात. आकाशवाणीवर कविता वाचनासाठी बोलवतात, आपल्याला कुठल्या कुठल्या पुस्तक प्रकाशनासाठी बोलवतात. आपल्याला लोक कवयित्री म्हणून ओळखतात. आपण लिहितो. आपण कविता लिहितो. आपल्या घराण्यात अजून कुणी केलेलं नाही ते करतोय. आपण थोर आहोतच. आपल्याला पाय नसले म्हणून काय झालं ? आपल्या समोरची पायवाट तर मखमली आहे. आपल्या मनात घुमताहेत ते सूर केवढे सुंदर, मंगल, शूचिर्भूत जीवाला टवटवी आणणारे आहेत. संक्षिप्त का असेना पण हे सुखच आहे. देवाचा हा एक कटच म्हणायला हवा. आपल्याला भुलविण्याचा. आपण विसरतोच की आपल्या कवितांच्या पसाऱ्यात की आपण चालू शकत नाही ते. पाय नसतील पण पायासमोरची वाट काही त्याने बुजवून टाकलेली नाहीच. आपण परमेश्वराचे आभार मानलेच पाहिजेत. आपल्या काव्याच्या चांदणी विश्वात आपण माखलेलो आहोत. देवाचे आभार मानले पाहिजेत. पत्र लिहून.

*"या मखमली पायवाटेवरचं*
*तुझ्या सूरांचं निमंत्रण पोचलं*
*आभार.*
*त्या चिरंतन भाववाही सूरांचं*
*आकंठपान करण्यास*
*आणि वाटेवरून उडण्यास*
*मला पाय नाहीत*

*याबद्दल दिलगीर आहे.*
*सभोवतालच्या रेतीचं, चांदण्यांचं, आणि*
*मनात आरपार खोवलेल्या चंद्रफुलाचे*
*हार्दिक अभिनंदन.*
*असेच उतरोत्तर निमंत्रण पाठवावे.*
*कळावे, लोभ असावा ही विनंती.*
*आपली*
*वासन्ती इनामंदार.*

कविता लिहिली आणि एकदम हलकं वाटलं. ही_ही कविताच आहे की नाही हे माहीत नाही. पण मी कविताच म्हणायला हवी. या कवितेतील शब्द अगदी सहजपणे उमटत गेले. कुठेही ओढाताण करावी लागली नाही. थांबावं लागलं नाही. आपण केविलवाणे आहोत की अत्यंत महत्त्वाचे आणि सुंदर आहोत वगैरे वगैरे विचारांचा कोलाहल संपला होता. आपण आहोत आणि आपण आपणच आहोत; हे पक्कं मनात रुजलं गेलं. आता यापरते उरलेले काही नव्हतेच.

ही कविता 'आरती' कडे पाठवली तेव्हा ते ही कविता प्रसिद्ध करतील असे वाटले नव्हते. पण त्यांनी ती केली आणि_

नंतर वाटू लागले आपल्याला पाय नाहीत असे आपण जाहीरपणे लिहायला नको होते. आपण मूर्ख आहोत यात शंका नाही.

या कवितेचे स्वागत कुठल्याही रसिकाने, टीकाकाराने केलेले नाही. तेव्हा अर्थात त्याबद्दलचा माझा अनुभव सांगण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

हीच कविता मला प्रिय का हे मात्र मला अजूनही नीटसे सांगता यायचे नाही. या कवितेनंतरही मी दर्जेदार मानल्या जाणाऱ्या कितीतरी कविता लिहिल्या. अनेक जाणकारांचे, अनेक वाचकांचे त्यावर अभिप्रायही आले. पण तरी हीच कविता प्रिय म्हणून मला तीव्रतेने आठवली. तशा कितीतरी आवडत्या कविता माझ्या आहेत. मध्यंतरी 'अंतर्वेध' काव्यसंग्रहाच्या निमित्ताने झालेल्या समारंभात, प्रा. शंकर वैद्य, श्री. सुशीलकुमार शिंदे या दोघांनी माझ्या एका काव्याचे खूपच कौतुक केले. श्री. वैद्य यांनी परीक्षणवजा त्यावर भाष्यही केले. माझ्या काही कवितांबद्दल, सई परांजपे, श्री. गोपीनाथ तळवलकर, दत्त रघुनाथ कवठेकर, मा. का. देशपांडे, गिरिजा कीर, बोरकर प्रा. राजा महाजन, गा. भालचंद्र खांडेकर, इत्यादी कितीतरी जणांनी गौरवोद्गार काढले. सध्या मी हायकू लिहिते, मध्यंतरी काही लावण्या लिहिल्या, रुबाया लिहिल्या. त्या आवडल्याची कितीतरी वाचकांची पत्रे आली. माझ्या आठ हजार कवितांमधल्या माझ्या आवडणाऱ्या कविता जवळ जवळ दोन हजार तरी आहेतच. पण_मला



अनुक्रमणिका







प्रिय वाटलेली कविता कुठली तर हीच एवढं खरं. कदाचित 'उत्तरोत्तर निमंत्रण पाठवावे' ही मी केलेली विनंती परमेश्वराने ऐकली म्हणूनही असेल.

(डॉ. सौ. वासन्ती इनामदार जोशी. गणेश सोसायटी, २९१२, क, सर्किट हाऊस नजीक, ताराबाई पार्क, कोल्हापूर-३)

---

# रस्ते

**प्रकाश कामतीकर**

---

*सांजभरल्या वेळातून नतमस्तक होतात जेव्हा रस्त्याच्या राजमुद्रा*
*आपल्या पापमय तोंडावरून ओरबाडून काढतात माणसांची खवले*
*तेव्हांचे हे रस्ते व्यभिचारिणीच्या माडीशी हात मिळवणी करतात*
*ऋतुस्नात पानझडीच्या गळतीचे दिवस मोजता-मोजता*
*हे रस्ते अंधार होतात*
*रस्त्याला जोडणाऱ्या रस्त्यांतूनच उगवल्यासारखी माणसं फेसाळतात*
*तेव्हाच्या रस्त्यावर माणसांचीच एक दाट साय असते*
*रस्ता सोडून; तरीही रस्त्याला लागूनच कबरीचे जंगल*
*फोफावलेले असते*
*नैमित्तिक गरजांपोटी माणसेच रस्ते होतात*
*व केव्हा-केव्हा रस्तेच चालून जातात माणसावरनं*
*मग कबरीचे जंगलही रस्ता होते*
*आणि गाडलेली संस्कृतीही रस्त्याखालीच दबून असते*
*रस्ते-रस्ते एवढे सस्ते असतात की*
*नजीकच्या वाटांनाही ते रस्ता दाखवतात*

ही कविता मी साधारणत : मार्च १९७० मध्ये लिहिली. (एवढेच आठवते). हे वर्ष माझ्या दृष्टीने प्रचंड मानसिक ताणाचे होते. एकीकडे मी; माझे शिक्षण संपवून बेकारीच्या उंबरठ्यावर असा. दुसरीकडे माझा विवाह वगैरे ठरविण्याचे घाटलेले. 'विविधा' नामक माझे वाङ्मयीन नियतकालिक बुडीत निघालेले. 'स.न.वि.वि.' या अनियतकालिकाचे संपादन चालू असलेले. खिशात पैसे-बिसे नाहीत. शिवाय 'विविधा'चे देणे डोक्यावर अधिकचे. नवीन येऊ घातलेल्या जबाबदाऱ्या. नोकरीचा घ्यावयाचा शोध. कुटुंबातले ताण-तणाव. साहित्य व कलेविषयी मनात

असलेली प्रचंड धुंदी. आई-वडिलांशी चाललेले वाद. बहीण-भावांचे रूसवे-फुगवे. कुटुंबातील माझ्यानंतरच्या एकूण सहा बहिणी व दोन भाऊ अशा प्रचंड जबाबदाऱ्यांचा सिलसिला. म्हणून माझा तातडीने विवाह किती आवश्यक वगैरे, असा जबाबदारीचा दबाव सतत व सातत्याने माझ्यावर चहुँवार टाकणे चालूच. अशा मानसिक उद्‌ध्वस्तेत मानसिक थकव्यात बिड्या पीत-पीत रात्र-रात्र रस्त्यावर भटकणे ही संवय. या मानसिक कल्लोळात व 'कोसळात' माझं नातं, आपुलकीच नातं फक्त 'रस्त्याशी' व रस्त्यावरचं होतं. त्या वयातील नैसर्गिक धुंदी अनुभवत व मनात प्रचंड जिद्द बाळगीत आयुष्याच्या पाऊलवाटांचा अविरत असा मानसिक शोध चालू होता. म्हणूनही 'रस्ते' मला जास्त जवळचे वाटत होते. वाङ्‌मयीन क्षेत्रात प्रचंड काही तरी करून दाखवू असं मनोमन वाटत होतं. पण व्यवस्थेच्या तडजोडी नाकारीत, प्रचंड वैताग विकत घेत; वाङ्‌मय व कलेच्या क्षेत्रात लेखक, कवी, चित्रकार, संपादक व पत्रकार म्हणून प्रस्थापित होत जाणारी प्रतिमा एकीकडे जपत व बेकारीची खाई व जबाबदारीची जाणीव व कौटुंबिक ताण-तणाव यातून उर्वरित आयुष्याचा एक 'रस्ता' दुसरीकडे शोधीत दिवस चालले होते. अशा उद्विग्न मानसिक अवस्थेत 'जालना' शहराच्या (माझे मूळ गाव 'जालना' आहे) रस्त्यावरून रात्री दोन वाजता भटकत असताना मनात जे कल्लोळ दाटत गेले _ साचत गेले ते 'शब्दांकित' करण्याचा प्रयत्न म्हणजे ही कविता. ही कविता मला जास्त जवळची वाटते कारण हिच्याशी जुळलेलं माझं नातं आयुष्यातल्या एका महत्त्वाच्या 'निर्णय-क्षणाचं' होतं. म्हणून हा 'रस्ता' अनेक स्पर्श-संवेदनांना घेऊन माझ्याशी उत्कट-होत गेला. पण अजूनही असं वाटतं की, 'त्या' वेळेस मला जे 'वाटलं' ते अर्थपूर्ण होतं परंतु ते पूर्ण अर्थाने मला शब्दबद्ध करता आलं नाही. पण जे व्यक्त झाले ते एका क्षणी व एका बैठकीतच. तिच्यावर नंतर कुठलेही संस्कार न करता ती कविता मी जशीच्या तशी 'सत्यकथे'कडे पाठविली. जून १९७० च्या सत्यकथेच्या अंकात ती प्रसिद्ध झाली. दरम्यान २१ मे ला माझा विवाह. १ जुलै १९७० पासून बेकारीचा टप्पा ओलांडून जगण्याकरिता प्राध्यापक वगैरे प्रकारात गुंतवून पुढचे 'रस्ते' धुंडाळीत राहिलो. त्याचे यशापयशाचे गणित निराळे मांडावे लागेल. पण या मोडून निघालेल्या क्षणी जी धुंदी मी अनुभवीत होतो, ती पुनःकधीही अनुभवता आली नाही. म्हणून ही कविता मला जास्त प्रिय आहे.

या कवितेच्या निर्मितिप्रक्रियेचा आलेख आठवून आठवून असा मांडता येतो : रात्री असाच दोनेकच्या सुमारास मी माझे मित्र श्री. मुकुंद कृष्ण गायकवाड यांना निरोप देऊन व घरी पोचवून एकाकी रस्त्या-रस्त्याने भटकत, प्रचंड आतल्या आत घुसमटत चाललो असताना सायंकाळच्या निर्मळ नतमस्तक राजमुद्रेसारख्या ठसठशीत रस्त्याचं बदललेलं, विकारी, व्यभिचारी, पापमय, रात्रीच्या काळोखाइतकं दाट, डागाळलेलं रूप मनात उतरत गेलं, रस्त्याच्या या 'अंधारचारित्र्याची' प्रचंड घालमेल मनात जिरत गेली. तिठ्यातिठ्यावर 'फेसाळणारी' माणसं, 'रस्ता' सोडून चालणारी माणसं, मनात निरनिराळ्या स्पर्श संवेदनांच्या वेदनामय हकिगती बनून उतरत गेली. आपलाही 'रस्ता' चुकलेला आहे असा निर्मम विश्वास,



अनुक्रमणिका

हेटाळणीसारखा आतल्या आत डिवचू लागला. व कबरीचं जंगल रस्त्यालगत असल्यामुळे स्वतःचे हेतू शून्य अस्तित्व व शेवट यातील अंतर नसल्याइतकं कमी वाटू लागलं. अशात रस्त्यावर नैसर्गिक विधी करणारी डोळस अनुभूती मन स्पर्शून गेली. संस्कृतीचे उभे-आडवे छेद मनात तयार झाले. उत्खननातले रस्ते लक्षात यायला लागले. इतिहासाची पानं फडफडू लागली. 'अमुक राजाने आपल्या राज्यात रस्ते बांधले; विहिरी खोदल्या' असले तद्जन्य बालिश दाखले मनात उफाळू लागले. मनाचा ज्वालामुखी पेटू लागला. त्याचा लाव्हा धगधगून येऊ लागला. असल्या-नसल्या संस्कृतीची उलथा-पालथ होऊ लागली. सगळे गाडले जाऊ लागले व क्रमाने त्यावर सपाट 'रस्ते' तयार होऊ लागले. वाटेला वाट मिळू लागली. त्याचे हमरस्ते होऊ लागले, त्याचे राजरस्ते होऊ लागले. पण माझा रस्ता मला सापडत नव्हता. माझी दिशा, माझी वाट त्यावरचा मी, मी चा एकाकीपणा मला गवसत नव्हता व दिसेल तिकडे, रस्ता मिळेल तिथे मी सगळ्या अस्तित्वानिशी तुडवीत जात होतो. हे 'रस्ते' चिंतनाच्या पातळीवर मनात दाटत गेलेलं एवढं प्रचंड होतं की, रस्ते, त्याच्या राजमुद्रा, त्याचे प्रवाहीत्व, त्याने माणसागणिक दिलेला आधार, दाखवलेली दिशा, दिलेले वळण, शोधलेले सत्य, इप्सिताकडे नेण्याची घाई, मधले खांच-खळगे, मृत्यूच्या वेदना, माणसांचे जंगल, त्यांच्या गरजा, संस्कृतीची पाळेमुळे, भौगोलिक उलथा-पालथी, हे सगळं-सगळं नष्ट करून पुनः आपल्या मग्रुरीत बनणारे हे 'रस्ते' मला एवढे कासावीस करीत होते की बस्स !

असा एक मानसिक कल्लोळाचा आलेख मला आज आठवून-आठवून मांडता येतो. हा त्या वेळेस असाच व एवढाच असेल याची मला खात्री देता येत नाही. हा नंतरचा 'शोध' आहे. तब्बल वीस वर्षानंतरचा. कदाचित आजच्या संदर्भात हे खोटंही असेल. कदाचित भ्रामकही. परंतु हे 'भ्रम' जिवंत होते व जाणीवेतले होते. ही कविता चांगली असेल किंवा नसेल पण ती माझी मला प्रिय आहे. कारण हे 'रस्ते' माझ्या 'निर्णय-क्षणांचे' एकमेव साक्षीदार आहेत व 'हितगुज-साथीही'. एवढेच.

(प्रकाश कामतीकर मनाली, ७/५५५ श्रीनगर कॉलनी, सेलू ४३१५०३ )

# विराणी

सुधीर देव

*"मखमली सौख्यात माझी*
*वेदना झाकून आले*
*हासणे फुलवून ओठी*
*आसवे प्राशून आले,*
*मैफली तुझिया सुखाच्या*
*गायिली रेशीमगाणी,*
*आसवे पुसता म्हणाला,*
*'गा पुन्हा तू ती विराणी'."*

ही माझी प्रिय कविता. मी तशा थोड्याच कविता लिहिल्या. अर्थात त्या साऱ्याच काही ना काही गुण-विशेषाने आवडीच्या आहेत. त्या साऱ्यांमध्ये प्रस्तुत कविता मनापासून अजूनही आवडते. खरं म्हणजे ह्या कवितेत उत्तररंग व्यक्त झाला आहे. पूर्वरंग १०-१२ वर्षानंतर काव्यरूपाने स्पष्ट झाला !

६३ साली 'स्वप्नगंधा' काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. पहिल्यावहिल्या संग्रहाच्या कौतुक सोहळ्यात मी कविपण हरवायला लागलो होतो. पंरन्तु नंतर संग्रहावरील काहींचे स्पष्ट व परखड अभिप्राय येऊ लागले व मी वेळीच भानावर आलो. लेखक स्वतःच्या कलाकृतींचा खरा समीक्षक असतो. त्यामुळे त्या त्या प्रतिक्रिया / समीक्षणे मला पटू लागली. हे भान मला लवकर आलं व मी पुन्हा कवितेच्या नादी लागलो. ही वरील कविता 'स्वप्नगंधा'त नाही. १९६४ मध्ये नवनीत (मराठी डायजेस्ट) दीपावली अंकात गुलाबी माहिरपीत नेटकेपणाने ती प्रसिद्ध झाली.

कोणत्याही अवाजवी / निरर्थक शब्दांचा कवितेत वापर होऊ नये याचा मी निग्रहाने, क्वचित कठोरपणे प्रयत्न करू लागलो. त्यामुळे कविता पूर्ण व्हावयास विलंब व्हायचा. कधी विषय गवसायचा तर मुखड्याच्या ओळीच सापडत नसत. प्रयत्नान्ती प्रारंभीची ओळ मनासारखी उतरली की त्याच ओळीच्या लयीत, ठेक्यात पदन्यास करू शकणारे चरण नीटसे जमेनात. छंद, वृत्त वगैरेचा विचार करून मी कोणतीच कविता प्रारंभापासून मुळीच गुंफली नाही. एकदा का लय सापडली की ती शेवटपावेतो टिकवून कविता पूर्ण करण्याचा ध्यास असायचा.











प्रस्तुत कवितेची ज्या दिवसांत निर्मिती झाली ते माझे दिवस तारुण्यसुलभ उत्साहाने ओसंडून वाहण्याचे, मोहरून जायचे असे होते. प्रेमात झोकून द्यावे, काही तरी भव्य दिव्य करावे असे वाटणारे ते दिवस होते. काही ना काही स्वप्नरंजनात गुरफटून जाण्याचे जसे होते तसेच काही प्रसंगी होरपळून जाण्याचे होते. अन् मला वाटते त्यामुळे कविता निर्मितीस आव्हानात्मक ठरत होते.

वरील कवितेच्या स्फूर्तीस त्या सुमारास विशेष सर्वतोमुखी झालेले. 'आधा है चंद्रमा रात आधी रह न जाये तेरी मेरी बात आधी' हे सिनेगीत झाले. मला त्या ओळीत व्यक्त झालेले भय अस्वस्थ करायचे. त्या ओळीतील भविष्य जर खरं झालं तर त्या प्रेमिकांची कशी अवस्था होईल, हे मला तापदायक वाटत होते. त्या कवितेचा अनुवाद करण्यात मी यशस्वी झालो असतोही परंतु मला भविष्यकालीन अवस्था कवितेत मांडायची होती. ते प्रेमिक एकमेकांपासून दुरावतात परतुं त्यांची परस्पर प्रेमनिष्ठा प्रामाणिक होती. काही वर्षानंतर ते भेटतात. मनमोकळ्या भरभरून गप्पा करतात व पुन्हा एकमेकांचा निरोप घेतात. हे कथासूत्र डोक्यात घोळत होते. या कथावस्तूवर अतिशय आटोपशीर कविता करण्याचा प्रयत्न करीत होतो. आणि एक दिवस ओळी सुचल्या–

*मखमली सौख्यात माझी*
*वेदना झाकून आले*

छंद, वृत्त यांचा या ओळी व्यक्त होण्यामागे विशेष संबंध नव्हता. शब्द चपखल सापडले होते व एका सुंदर लयीत ते गुंफले गेले होते.

आता या दोन ओळी मी तोंडात भिजत ठेवून एकटाच गावाबाहेर निघून जायचो. त्या धुंदीत वावरायचो, भटकायचो. त्या ओळींना शोभणारे शब्द शोधून पुढच्या ओळींची मांडणी करायचो, मोडायचो. मनासारख्या शब्दांची रचना झाली की लगेच लिहून ठेवायचो. हा खेळ खेळण्यात कितीतरी धुंद दिवस संपले. कविता पूर्ण झाली होती तरी मला त्या कवितेची शेवटची ओळ मनासारखी जमली, असे वाटत नव्हते. शेवटी वैतागून त्या शेवटच्या ओळीचा नाद सोडला, व नवनीतकडे पाठवणी करून विसरून जाण्याचा प्रयत्न केला. ती प्रसिद्ध होऊन जेव्हा पुन्हा सामोरी आली तेव्हा '_गा फिरूनी ती विराणी' या ओळी वाचून मी परत अस्वस्थ झालो. 'फिरूनी' हा शब्द मला खटकत होता. कितीतरी दिवस तो शब्द फिरवण्याचा प्रयास केला आणि एकदाची 'गा पुन्हा तू ती विराणी' ही मनासारखी ओळ तयार झाली. मी त्या कवितेच्या निर्मितीतून मुक्त झालो.

त्या कवितेचे अनेक रसिकांनी मनःपूर्वक स्वागत केले. तर काही संपादकांनी पुन्हा ती कविता मला सांगून न सांगूनही पुनः प्रकाशित केली !

रसिकांना ही कविता आवडली त्याहून जास्त मला आवडण्याचे कारण असे की तिने मला अस्सल कवितानिर्मितीचे श्रम व त्यातून मिळणारा आनंद भरपूर दिला. त्यामुळे एवढे











स्पष्ट झाले की, काव्यलेखनासही रियाज महत्त्वाचा असून ती सहज साध्य कला नाही.

—सुधीर देव 'प्रिय', ४१ व्यंकटेशनगर, खामला रोड, नागपूर-४४००२५.

## शब्द

वैजनाथ महाजन

*शब्दांनाच लपेटून असतात*
*अर्थाचे रंग*
*तेच नशा आणतात*
*आनंदाची आणि आसवांची*
*शब्दच काळजावर कोरतात*
*धारदार पात्यांनी*
*जखमांचे दाह*
*आणि पेटवतात अंगारे*
*मनाच्या सांदी कोपऱ्यातले_*
*हे शब्दच नको होतात*
*संध्याकाळच्या सावलीत_*
*पण निवारा शोधताना*
*उरतो आसरा त्यांचाच_*
*उशाशीच असतात*
*मध्यरात्रीसुद्धा*
*अनाथांचे नाथ असतात*
*हे शब्दच सारे_*
*माझ्या तर ओंजळीत*
*ते चांदण्या होऊनच*
*उगवलेले असतात.*
*दुनिया उलथून पडली तरी*
*त्यांची साथ असतेच असते*



अनुक्रमणिका

*म्हणून तर नशा आसवांची*
*काळोखालाही गिळून टाकत असते.*

कविता लिहावीशी वाटणं आणि कविता लिहिणं,म्हणजे प्रत्यक्षात कविता लिहिणं यात तस महद्‌अंतर असतं. कविता केली अथवा कविता करतात असेही काहीसे चुकीचे वाटणारे शब्दप्रयोग कधी कधी अगदी जाणकारांच्या तोंडूनही ऐकायला मिळत असतात. पण प्रत्यक्ष कविता मात्र निश्चितच अशी उभी राहत नसावी. तर ती अनुभव आणि त्याची प्रतीती यातूनच आकारली जात असणार. 'विशिष्ट वयात सारेच कवी असतात,' असे म्हणणे हे जरी आपण मिस्किलपणे म्हणत असलो तरी त्यातून आपण कवितेच्या निर्मिती गांभीर्याला बाध आणतो हे मात्र लक्षात घेत नाही. कधी जाणीवपूर्वक तर कधी अबोधपणे. खरे तर आपल्या उभ्या आयुष्याच्या एकूण जीवनानुभवाचे प्रथम गांभीर्य कशात आढळत असेल तर ते सर्वप्रथम कवितेतच होय.

'शब्द' ही कविता मी एका रणरणत्या दुपारी एका धावत्या गाडीत लिहिली. बाहेरच्या जगातल्या झळा गाडीत आरपार घुसून सतावत होत्या. डोळ्यांत एक माणूस दिल्या शब्दाला जागला नाही असा एक प्रकार घुमत होता. ज्यांना शब्दांचे गांभीर्य नाही, शब्दाचे मोल नाही आणि शब्द सामर्थ्याचीही ओळख नाही अशा माणसांशी काही सांस्कृतिक व्यवहार होणे तसे एकूण मुश्कीलच. कारण ज्यांना शब्दांचा लळा नाही त्यांना एकूण चांगल्या भावुक दुनियेची लखलखीत प्रकाशदारे उघडी होणे तसे अवघडच. शब्द लळा लावतात तसे शब्द झळाही सोसायला लावतात. शब्दांची हीच तर खरी अभूतपूर्व किमया असते. म्हणून शब्दांना दाद द्यावी तेवढी थोडीच. गंमतीने द्या अथवा गांभीर्याने द्या. पण दाद द्या !

ही कविता कविवर्य वसंत बापट यांनी साधनेच्या दिवाळी अंकात प्रकाशित केली. वसंत बापट यांची मुद्रा असलेल्या दिवाळी अंकात ही कविता प्रकाशित झाली याचा मला एक वेगळाच आनंद वाटला. कारण ही आपल्यातल्या किंचित का होईना पावलापुरती जागा धरून असलेल्या कविता लिहू इच्छिणाऱ्या मनाला मान्यता आहे असे मला वाटले. आपण कवी म्हणवून घेण्यात अर्थ नाही. ती आपली पात्रता नव्हे. कवीची कवी असण्याची पात्रता व त्या असण्यानंतरची त्याची असाधारण गुणवत्ता याची मनाला भुरळ पडतेच पडते. पण ही भुरळ ही फक्त भुरळच असते ही मर्यादा ठाऊक असण्याचाही एक आनंद असतो. आपण धावत्या गाडीत एका पिवळ्या सरकारी लिफाफ्यावर लिहिलेली कविता आपल्या आवडत्या कवींनी आपल्या आवडत्या दिवाळी अंकात आवर्जून प्रसिद्ध केली याचा काही किमान आनंद आहेच आहे. हा आनंद या कवितेने मला दिला. एके दिवशी आणखी एक सुखद धक्का याच कवितेच्या बाबत सुखावून गेला.

मुंबईतील एका नामांकित शाळेने आपल्या चाचणी परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेत ही कविता विद्यार्थ्यांच्या समोर ठेवली आणि त्यावर तीन प्रश्न विचारले. बहुधा ती दहावीच्या प्रश्नपत्रिकेत समाविष्ट केलेली असावी. कविता ही प्रश्न निर्माण करते याचे जेव्हा माझ्याच










कवितेतून त्या प्रश्नकर्त्याने दर्शन घडविले त्या वेळी आणखीन आनंद वाटला. ती प्रश्नपत्रिका सुद्धा एका मित्राने आणून हातात ठेवली. नाहीतर मुंबईतील नामांकित शाळेची प्रश्नपत्रिका आमच्यासारख्या मुंबईपासून दूर असलेल्या माणसांच्या हातात कशी काय पडणार ?

पण आपले सागरकिनारीच्या वाळू कणासमान काव्यकर्तृत्व त्या शाळेतील सुजाण शिक्षकांना उमजावे आणि ही कविता प्रश्नपत्रिकाबद्ध व्हावी हे घडावे, यामागेही आपली काव्यममताच असावी असेही मला 'शब्द' या कवितेमुळे वाटून गेले.

शब्द जसे आनंदाची नशा आणतात तशीच ती आसवांचीही नशा आणतात असे मला त्या क्षणी वाटून गेले आणि ते अंगारासारखे धगधगीत असतात असेही तीव्रतेने वाटून गेले. शब्द हे जरी आपणाला अरूपाचे रूप अशा स्वरूपाचे वाटत असले तरी त्यांचे अस्तित्व मात्र निश्चितच क्षणोक्षणी जाणवत असते. आपण बोलतो तो शब्द आपला अंतरीचा आविष्कार असतो. हुंकार असतो. उद्‌गार असतो. ज्यांनी त्याचे महत्त्व जाणले त्यांचे त्याने सोने केले. त्यांनीही त्याचे सोने केले. हा परस्पर सुखावणारा व्यवहार हा अशा परस्परांच्या जीवाभावाच्या नाते संबंधातूनच निर्माण होत असतो. हा व्यवहार वरवरचा असा कधीच असू शकत नाही. इथं आतले-बाहेरचे असे काही होऊ शकत नाही. हे 'अंतरीचे धांवे स्वभावे बाहेर' असेच असते. त्या देहूच्या आभाळाएवढ्या वाण्याने ते नेमके ओळखले. पैसाच्या खांबाने ओळखले. 'आषाढस्य प्रथम दिवसे_' असे मुलायम शब्दातून वर्षादर्शन घडविणाऱ्या महाकवीने अचूक हेरले. आपण आपले ह्या वाटेने पुढे जात आनंद शोधत राहायचे इतकेच काय ते ! शब्दाचे हे निधान हाती गवसले की ते आपली आलम् दुनियाच पालटून टाकतात. 'शब्द' कविता हा शब्द शिल्पाच्या समीप जाण्याचा एक प्रयत्न.

—वैजनाथ महाजन. ६५३, गुरूकृपा, सरनोबत, सांगली-४१६४१६

---

# स्त्रीसूक्त

अश्विनी धोंगडे

महाराष्ट्र साहित्य परिषदेचं, काव्य विशेषांकाला लेख देण्यासाठी पत्र आलं तेव्हा मला खरोखरच अभूतपूर्व असा आनंद झाला, आणि आपण कवी आहोत असं निदान साहित्य परिषदेला तरी मान्य आहे असं एक समाधान वाटलं. एखाद दुसरा अपवाद वगळला तर दिवाळी अगर अन्य अंकांसाठी कोणतेही वृत्तपत्र अथवा मासिक माझ्याकडे कविता व अर्थातच् लेखही मागवीत नाही, त्या अर्थाने मी स्वतःला मागासवर्गीय साहित्यिक समजते.

अर्थातच मी फार चांगल्या दर्जाची कवयित्री आहे असे मी समजत नाही. माझ्या









काव्यविषयक व एकूणच साहित्यविषयक अभिव्यक्तीचं सामर्थ्य आणि मर्यादा यांचं तौलनिक भान मला बऱ्यापैकी आहे असं मी मानते. बऱ्यापैकी विपुल लेखन करूनही कथाकार, ललितलेखक किंवा कवी असा कोणताही शिक्का माझ्यावर नाही. सातत्यानं तोच एक वाङ्मयप्रकार नियमितपणे हाताळून त्यात सामान्य वकुबाचे साहित्यिकही अनेकदा त्या क्षेत्रापुरता अधिकार प्राप्त करून घेताना दिसतात. पण प्रथमपासूनच कोणत्या वाङ्मयप्रकारामधून व्यक्त व्हायचं हे मी माझ्या मनातल्या बीजाच्या स्वभावावर अवलंबून ठेवल्यामुळे कधी मी कादंबऱ्या लिहिल्या, कधी एकांकिका, कधी कविता, कधी बालसाहित्य आणि पुष्कळ वेळा ललितलेख लिहिले.

मी एकदा लिहून अथवा प्रसिद्ध झाल्यानंतर माझं साहित्य पुनःपुन्हा वाचत नाही. त्यामुळे 'तुमची सर्वात आवडती कविता कोणती?' या पहिल्याच प्रश्नासाठी मी माझ्या प्रसिद्ध, अप्रसिद्ध सर्व कविता वाचून काढल्या. प्रत्येक कविता ही निर्मितीच्या क्षणी स्वतःशी प्रामाणिक असते आणि तिच्यापुरतं तिला एक स्वतंत्र, स्वयंभू असं अस्तित्व असतं. एकाच आईच्या पोटी जन्म घेतलेल्या मुलांच्या बुद्ध्यांकात फारसा फरक पडत नसावा; त्याचप्रमाणे माझ्या सर्व कविता ह्या साधारणपणे एका पातळीवर आहेत असं मला प्रथमदर्शनी जाणवलं. पण तरीसुद्धा बायबलमधल्या वाट चुकलेल्या मेंढरासारखं माझं मन एखाद्या चुकार कवितेत विशेष गुंतलय का?

साधारण वयाच्या १२-१३ व्या वर्षांपासून मी कविता लिहू लागले. त्यानंतर २१-२२ वर्षापर्यंतच्या दहा वर्षांत अनेक कविता लिहिल्या. हौसेनं मासिकातून प्रसिद्ध केल्या. अनुकरणातून सुरुवात होत होत माझी मी मला कुठे तरी सापडते आहे असे वाटण्याचा तो काळ होता आणि वयानुरूप हळवं, भावूक प्रेमकाव्य मी लिहू लागले होते.

*तू असलास म्हणजे*
*या देहावर पालवी फुटते*
*चैत्राची, नाजूक कोवळी तांबुसलेली*

अशा प्रकारचं हे भावकाव्य होतं. त्यानंतर ज्या प्रकारच्या आयुष्याला मी सामोरी जाऊ लागले ते आयुष्य माझ्या हवेवर तरंगण्याच्या वृत्तीतल्यापेक्षा इतकं भिन्न होतं की माझ्यातला कोवळा कवी मनातून कधी फाटत गेला हे माझं मलाही समजलं नाही इतकी कवितेची आणि माझी फारकत झाली. यानंतर पुढच्या १७-१८ वर्षांच्या कालखंडात मी अतिशय मोजक्या अशा फक्त १०-१५ कविता कधीमधी अगदी माझ्यासाठी म्हणून लिहिल्या, त्या फारशा कुठे प्रसिद्धही केल्या नाहीत, पण त्या कवितांमधून माझी अभिव्यक्ती, विषय हे पूर्वीपेक्षा पार बदलले होते. माझ्या भोवतीच्या वास्तवाचं भान त्यात होतं. स्वतःकडे कठोरपणे पाहण्याची वस्तुनिष्ठता त्यात होती आणि काहीशी धीट, पण प्रामाणिक आणि स्वतःतून फुटून निघण्याची आंतरिक उर्मी त्यामध्ये होती.

*फेकता येत नाही स्वतःला*
*अंधाराच्या कड्यावरून*
*मग टोकावरच कसरत करताना*
*का रडावे ?*

अशा प्रकारे अंतर्मुख होऊन मी कवी म्हणून संपल्यातच जमा झाले होते. पण मुंडी पिरगाळून फेकून द्यावा तरी कुठेतरी कचरापेटीत नवा लसलसता कोंब उगवून यावा तशी एक कविता माझ्या मनात दोन-तीन वर्षांपूर्वी, अचानक उगवून आली. तरारून जोमानं अगदी थोडक्या अवधीत वाढली आणि या कवितेनं मला पुन्हा कवीचा नवा जन्म दिला. पैसा मिळवून दिला, भरपूर प्रसिद्धी दिली. कुसुमाग्रजांसारख्या श्रेष्ठ नावानं ठेवलेला पुरस्कार मिळवून दिला आणि मुख्य म्हणजे मी माझा म्हणून खास ठसा उमटवणारं, ते कदाचित् वेडवागडं असेल, सामान्य असेल, पण खास माझं असेल, असं काही लिहू शकते याचा आत्मविश्वास दिला. ती माझी कविता आहे स्त्रीसूक्त !

होय, मला ठाऊक आहे की हे एका कवितेचं नाव नाही, कवितासंग्रहाचं आहे, पण माझ्या दृष्टीनं या स्वतंत्र वेगवेगळ्या कविता नाहीतच. पारंपरिक अर्थानं हे दीर्घकाव्य नाही, पण अन्य कवितासंग्रहांप्रमाणे या स्वतंत्र, सुट्या कविता नाहीत. बदलत्या काळातील आजच्या शहरी स्त्रीच्या प्रतिमेची ही विविध कोनातली विविध रूपं आहेत. म्हणूनच केवळ संख्येनं या अनेक कविता असल्या तरी त्यातील अंतर्लयीनं त्या परस्परांशी बांधलेल्या आहेत. एखादी कादंबरी लिहावी त्या सलगतेनं महिन्या दीड महिन्याच्या कालावधीत अंधारगुहेत काही चमकत्याचा शोध लागून आपल्या सर्व शक्तीनिशी ते खणून बाहेर काढावं तशा झपाटलेपणानं मी या साठ-पासष्ट कविता लिहिल्या. या झपाटलेपणातच पहाटे पहाटे जाग येताना स्त्रीसूक्त हे अगदी चपखल नाव माझ्या हाती आलं. प्रकाशकांकडे जाऊन 'माझा संग्रह काढाल का ?' असं एरवी विचारणं मला अत्यंत जड गेलं असतं, पण या कवितेच्या बाबतीत मी ते निर्भयपणे केलं. कारण आजच्या लोकप्रिय कवितेपेक्षा माझी कविता वेगळी आहे हा आत्मविश्वास या लेखनाच्या वेळी मला येत गेला.

या कवितेपूर्वी अनेक वर्षं कवी म्हणून मी तशी थंड, निष्क्रिय होते तरी या कवितेची जडणघडण माझ्या व्यक्तित्वात कुठेतरी सुप्तावस्थेत होत असावी. 'ती' ही या कवितेची नायिका असली तरी या 'ती' मध्ये मी होते, पण माझं सुखदुःख हे आता वैयक्तिक पातळीवर न राहता साऱ्या स्त्रियांचं झालं होतं, आणि म्हणून एका तटस्थ दृष्टिकोनातून मी स्त्रीजीवनाकडे पाहू लागले होते. बॉन्साय ही या कवितामालेतली एक कविता. ती मी अनेक ठिकाणी काव्यवाचनात वाचली आणि स्त्री-पुरुष श्रोत्यांकडून तिचं खूपच स्वागत झालं.

*केसांना काळा डाय लावून*
*तिने आपले तरुणपण रोखून धरले*

*ओठांना लाल लिपस्टिक लावून*
*सुकलेले गुलाब ताजे केले*
*भुवया नीट कोरून काढून*
*मदनबाण सज्ज ठेवले*
*ब्युटी पार्लरमधे फेशल करून*
*टीन एजरचे मुखवटे घातले*
*रेशमी वस्त्रे अंगावर लपेटून*
*गरम रक्त सळसळत ठेवले*
*वयाची उंची कापता कापता*
*आयुष्याचेच बॉन्साय झाले*

बॉन्सायच्या प्रतिमेतून कृत्रिम तरुणपणाला येणारे खुजेपण व्यक्त करताना माझ्याच जातीची मी टीका करत नव्हते, त्यात आत्मपरीक्षण होते, त्याचप्रमाणे एक कारुण्य होते. मी स्वतः स्त्री असूनही स्त्रीजन्म मला एक कोडे वाटते. एका बाजूला प्रत्येक लहान-मोठ्या गोष्टींच्या प्राप्तीसाठी स्त्री तिच्या स्त्रीत्वाचा 'ॲसेट' म्हणून वापर करताना दिसते, तर दुसऱ्या बाजूला सुखाने माणूस म्हणून मुक्त जगण्यासाठी स्वतःच्या शरीराचा अडसर तिला वाटतो,

*सोहाळे स्त्रीत्वाचे*
*अंगाखांद्यावर मिरवले*
*त्याच्याच भांडवलावर*
*आयुष्याला भोगले*
*दुसऱ्याच्या नजरेनं*
*स्वतःचा देह निरखला*
*आरशाला रूपाचाच*
*सवाल विचारला*
*देहाचे समाधान*
*आयुष्याचे ध्येय झाले*
*रात्रीचे स्वप्न*
*दिवसाचे दिवाभीत ठरले*

स्वतःच्या शरीराची ही जाणीव अगदी वार्धक्यातही स्त्री विसरू शकत नाही असे मला वाटते. घर संसार सोडून मुक्त होणाऱ्या स्त्रीलाही.

*स्त्रीत्वाची सारी बंधने*
*तोडून मोडून फेकून दिली*
*हा जन्मच असा खडतर*



अनुक्रमणिका

*शरीराची जाणीव कधीच नाही विरली*

असे वाटत राहते. स्त्री जन्माच्या विविध टप्प्यांवर स्त्री आणि बाहेरचं जग यांच्यामधे येणारा संघर्ष, अनुभवातलं विसंवादीपण, त्यातून उरणारा एकटेपणा, व्यवहारीपणा याचं काही निखळ उघडवाघडं स्वरूप मी शोधत गेले आणि मग माझ्या वाचनात येणारी मराठी कविता आणि माझ्या पाहण्या-अनुभवण्यातली स्त्री यांच्यामधली प्रचंड दरी पाहून कवितेतल्या भावकोमल, फुलांपेक्षा सुंदर, चांदण-गोंदण वगैरे शब्दात सजलेली नटलेली स्त्री माझ्या मनाला तद्दन खोटी वाटू लागली. कथा, कादंबरीत निदान क्वचित तरी आजच्या जगातली रक्तमांसाची स्त्री भेटत होती, अस्वस्थ करत होती. पण कवितेत मात्र स्वप्नांच्या जरतारी वस्त्रांत वगैरे लपेटलेल्या स्त्रीची चित्रं पाहून आजची खरी स्त्री दाखवणारी कविता लिहावी असं मला वाटू लागलं. कामाचा प्रचंड ताण, गतीमान आयुष्य, नोकरीची ताबेदारी, जागेची टंचाई, वाढत्या खर्चाचं राहणीमान, सणवार, पाहुण्यांची सरबराई, वेळेची काटेकोर बंधनं, परंपरांची काचणी इत्यादी विविध दबावांखाली जगणाऱ्या स्त्रीच्या आयुष्यात कुठलं आलंय रोमँटिक प्रेम आणि प्रियाराधन, काव्यमयता आणि हळुवारपणा ?

*देणे दिल्यासारखे ती देते शरीरही*
*रोजच्या कामाचा एक भाग म्हणून*
*तेव्हाही तिच्या मनात धावत असते*
*सात सत्तावन्नची फास्ट लोकल*
*गर्दीत पळणारे पाय*
*अर्धवट निवडलेली भाजी*
*संपत आलेला गॅस*
*आणि इतर बरेच काही—*

हे मुंबईच्या स्त्रीचं खरं आयुष्य ! या गद्यमय जीवनात ती गाणे विसरली आहे, तिला फक्त पाढे येतात, ती ताल विसरली आहे तिला फक्त तोलच समजतात. ती भाव विसरली आहे तिला फक्त शब्द समजतात. ती काव्य विसरली आहे तिला फक्त हिशोब येतात अशी गद्य कविता मी लिहिली. माझी कविता ही अकविता वाटावी इतकी मी गद्य लिहिली कारण आजच्या स्त्रीचं गद्य आयुष्य मला वाचकांच्या मनावर ठसवायचं होतं. जीवनाचं स्वरूप बदललं, मग काव्याचं बदलायला काय हरकत आहे ? म्हणून मग अट्टाहासानं नव्हे, पण तरी विचारपूर्वक काही आकृतिबंध मी बदलले. एका कवितेत जन्माला चिकटलेली वाण सामानाची फक्त यादीच लिहिली आणि खाली त्याच ओळीत कंटाळा १ किलो, वैताग २ किलो असं सामान जोडून टाकलं. 'ती एक मिनी कॉम्प्युटर' या कवितेत प्रश्नांची उत्तर चोख देणाऱ्या कॉम्प्यूटरचं आणि स्त्रीचं नातं जोडलं गेलं. वधूकडून भरमसाट अपेक्षा करणाऱ्या वरपक्षाकडे 'पुरुष' या क्वालिफिकेशनशिवाय काहीच भांडवल कसं नसतं हे दाखवण्यासाठी वधू-वर विषयक



अनुक्रमणिका







जाहिरातीच्या स्वरूपात दोन बाजूंकडील विरोधाभास दाखवला. हुंड्यासाठी जाळण्याच्या हजारो बातम्या वाचून आपण निर्विकारपणे त्यांना कसे सामोरे जातो हे दाखवण्यासाठी एकामागोमाग एक बातम्या जोडत म्यूरल प्रकाराची कविता लिहिली. या सर्वांमध्ये काहीतरी वेगळं करण्याची सनसनाटी प्रवृत्ती मुळीच नव्हती, तर उलट जास्त नेमकेपणानं वाचकांपर्यंत पोचण्याची खटपट होती आणि त्याची पावती अनेकदा मिळाली. कवितेच्या वाटेला न जाणाऱ्या काही स्त्रियांनी आपल्या ऑफीसमध्ये मधल्या सुट्टीत या कवितांची अक्षरशः पारायणं केली. मला वाटतं, ही माझी सर्वांत आवडती कविता नाही, कारण सर्वांत आवडती कविता माझ्या हातून अजून लिहून व्हायची आहे आणि कदाचित ती केव्हाच लिहिली जाणार नाही. तिच्या हुकलेल्या निर्मितीची हुरहुरच कदाचित मला तिच्या निर्मितीपेक्षा अधिक प्रिय आहे.

(अश्विनी धोंगडे, झाला सहनिवास कर्वे रस्ता, कोथरूड, पुणे-४११०२९)

# 'होड्या' आधीचा पाऊस

हेमंत गोविंद जोगळेकर

कवितेची जन्मकथा सांगू पाहाणे ही फार धाडसाची गोष्ट आहे. कविता लिहिण्याहूनही अधिक धाडसाची. कारण, कवितेची निर्मिती कवीच्या मनात होत असते. अनेक घटक कवितेच्या निर्मितीस जबाबदार असतात. कवितेच्या रचनेबद्दल प्रत्यक्ष केलेला किंवा अप्रत्यक्ष झालेला विचार, कवीच्या अनुभवांचे / आठवणींचे त्यात गुंतत गेलेले धागे, विशिष्ट विषयाकडे आकृष्ट होण्याची मनाची प्रवृत्ती, कवीची काव्यलेखनासंबंधी तेव्हा असलेली धारणा, इतर कलाकृतींचा प्रभाव आणि मनात असलेल्या इतर अनंत गोष्टी, यांपैकी कुठल्याच घटकाची कोणतीच नोंद राहात नसते. हे घटक सुटे काढता येत नाहीत, ठामपणे आठवत नाहीत. शिवाय हे घटक मुळात पूर्णपणे शब्दांच्या पातळीवर नसतात; ते शब्दांत नेमके सांगता येणे अशक्य असते. तसा प्रयत्न करताना ते बदलण्याची, अधिक गडद किंवा पुसट होण्याची शक्यता असते. बऱ्याच कालावधीनंतर ते आठवताना, आपलेच मत त्यात काल्पनिक गोष्टीही आपल्याही नकळत, बेमालूम मिसळू शकते. हे घटक मांडताना अधिक तर्कसुसंगत करते. कवितानिर्मितीची प्रक्रिया, त्यामुळे जेवढी नसते तेवढी तार्किक, सोपी किंवा यांत्रिक वाटू शकेल. कविता वाचून वाचकांच्या मनात एक भावविश्व निर्माण झालेले असते. कवितेच्या निर्मितीबद्दल वाचकांनीही काही कल्पना केलेल्या असतात. कवीने सांगितलेली जन्मकथा त्याला धक्का पोहोचविण्याचीही शक्यता आहे. आणि कवीनेच असे करणे उचित होईल का ?



अनुक्रमणिका

कवितेची जन्मकथा सांगण्यातल्या या मर्यादा, धोके आणि अनौचित्य जाणवत असूनही मी ते धाडस करून पाहणार आहे. एक तर, कवितानिर्मितीच्या गुंतागुंतीच्या प्रक्रियेतले जे आकळता येण्याजोगे धागे असतील ते उलगडून पहावे असे मला स्वतःलाही कुतूहल वाटते. दुसरे म्हणजे, वाचकांनाही ते कवीकडून जाणून घेण्याची इच्छा असते. तिसरे म्हणजे, म.सा. पत्रिकेच्या संपादकांना ज्या अर्थी अनेक कवींकरवीं असा शोध घेण्याजोगा वाटतो आहे त्या अर्थी तो नक्कीच महत्त्वाचा असावा. आणि या शोधात मीही सहभागी होऊन पाहणार आहे. मात्र मी घेत असलेला हा शोध, हा केवळ एक ढोबळ अंदाजच असणार आहे, हे ध्यानात घेऊनच त्याकडे पाहिले पाहिजे.

या शोधासाठी, आपली प्रिय कविता घ्यावी असे संपादकांनी सुचविलेले आहे. ती जर बऱ्याच वाचकांपर्यंत पोचलेली, त्यांना आवडलेली असेल तर या शोधात रस वाटेल असे मला वाटते. म्हणून मी माझी 'होड्या' ही कविता या शोधासाठी घेत आहे. ती मला का प्रिय वाटते या संपादकांच्या प्रश्नाचे उत्तरही मी आधीच देऊन टाकतो आणि त्याबरोबरच ही कविता मला केव्हा सुचली (तेव्हा माझी काव्यक्षेत्रातील वाटचाल कितपत झालेली होती), तिला कुठे कुठे प्रसिद्धी मिळाली, तिचे टीकाकार, रसिक यांजकडून कोणते स्वागत झाले या इतर अपेक्षित प्रश्नांची उत्तरेही ओघाओघाने देऊन टाकतो.

मी ही कविता १९७२ च्या ऑगस्ट महिन्यात लिहिली. मी कवितालेखन सुरू करून तेव्हा एक दोन वर्षेच होत होती. मी वाङ्मयाचा विद्यार्थी नव्हतो. माझे कवितांचे वाचनही तेव्हा फारसे नव्हते. मात्र, आपल्याला काहीतरी व्यक्त करावेसे वाटते आहे आणि ते कविताच आहे असा विश्वास मला वाटत होता आणि मी अधूनमधून कविता लिहीत होतो. त्यातील एकच तेव्हापर्यंत प्रसिद्ध झालेली होती. नुकताच मी माझा आय. आय. टी. तील केमिकल इंजिनिअरिंगचा अभ्यासक्रम पूर्ण केला होता आणि नोकरीला सुरुवात करण्यापूर्वी मी पुण्याला घरी आलेला होतो. एका पावसाळी रात्री, साडेआठ-नऊच्या सुमारास मी ही कविता लिहायला घेतली. तासा दोन तासात ती लिहून टाकली आणि ठेवून दिली. फारशी कुणाला दाखविलीही नाही. १९७५ च्या नोव्हेंबरमध्ये महाराष्ट्र टाईम्सने 'कविता तुमची निवड पाडगावकरांची' अशी जाहिरात दिली. तिला उत्तर म्हणून, मी ही व आणखी एक अशा दोन कविता पाठवून दिल्या. १४ डिसेंबर १९७५ च्या म. टा. च्या रविवार पुरवणीत 'होड्या' कविता छापून आली. कविवर्य मंगेश पाडगावकरांनी, ५००० कवितांतून 'होड्या' कविता पहिल्या क्रमांकाने निवडली. आपल्या लेखात त्यांनी लिहिले :

'या कवितांपैकी श्री. हेमंत जोगळेकर यांची 'होड्या' कविता मला अतिशय आवडली. आपण नेहमी वाचतो त्या प्रेमकवितांहून ही कविता अगदी वेगळी आहे, पण या वेगळेपणाचे सावध भान तिला कुठेच नाही; इतक्या सहजपणे ती अवतरली आहे. पौगंडावस्थेतला अतिशय नाजुक अनुभव ही कविता व्यक्त करते. या वयात स्त्रीविषयी वाटणाऱ्या अबोध आकर्षणाची अत्यंत कोमल सूचना तिच्यात आहे- इतकी कोमल की, आहे-नाही च्या सीमेवर

उभी असणारी. होडीतून आपण एकीकडून दुसरीकडे जातो. भावना व्यक्त करण्याचे-कम्युनिकेशनचे- प्रतीक म्हणून ह्या होड्या येतात, पण भावना तर प्रत्यक्षात कुठेच व्यक्त केली जात नाही- म्हणून अर्थातच या कागदी होड्या आहेत आणि त्याही केलेल्याच नाहीत ! पाण्यात सोडलेल्याच नाहीत ! पाण्यात सोडणार कशा ? कारण पाऊसही पडलेलाच नाही. या सगळ्याच प्रसंगाचे विलक्षण सूचक चित्र या कवितेत आहे. या कवितेत 'बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी' ही ओळ धृवपदासारखी प्रत्येक कडव्याच्या शेवटी येते- पण हे यांत्रिक धृवपद नव्हे. प्रत्येक वेळी ती ओळ अधिकाधिक अर्थपूर्ण भावसंपन्न होत जाते.'

म.टा. ने कवितेसोबत माझा पत्ता छापलेला होता. त्यामुळे अनेक रसिकांची मला, कविता आवडल्याचे कळवणारी पत्रे आली. (एक पत्र संतोषीमातेचेही आले.) कवी म्हणून मला मान्यता मिळाली. माझे थंडावलेले कवितालेखन पुन्हा सुरू झाले. 'कविता दशकाची' या संग्रहात दशकाचा कवी म्हणून माझा समावेश झाला. माझा पहिला कवितासंग्रह याच कवितेच्या नावाने प्रसिद्ध झाला. त्याला प्रा. विजया राजाध्यक्षांनी प्रस्तावना दिली. कविवर्य बा. भ. बोरकरांच्या हस्ते तो प्रसिद्ध झाला. त्याला केशवसुत पारितोषिक मिळाले. अनेकांनी या संग्रहाबद्दल आणि विशेष करून 'होड्या' कवितेबद्दल, पत्राने किंवा प्रत्यक्ष भेटीत कौतुक केले. त्यात श्री. बा. रानडे, कुसुमाग्रज, विंदा करंदीकर, पु. ल. देशपांडे, विद्याधर पुंडलीक, रमेश तेंडुलकर, शंकर वैद्य, बाळ गाडगीळ, ह. मो. मराठे, आनंद यादव हे मान्यवरही होते. डॉ. अनुराधा पोतदार, अंजली ठकार, अविनाश सहस्रबुद्धे यांनी समीक्षालेख लिहिले. 'कवितारती'तून प्रा. जयश्री पाटणकरांनी 'होड्या' चे शैली शास्त्रीय विश्लेषण केले. अनेक कविसंमेलनांतून ही कविता श्रोत्यांची दाद घेऊन गेली. तिचे हिंदी, इंग्रजी अनुवादही झाले.

कधी ह्या कवितेतील बालसुलभ ओळींची टिंगलही झाली. कधी 'होड्यावाले जोगळेकर' अशी माझी ओळख करून दिली जाऊ लागल्यावर 'होड्यानंतर त्या तोडीचे आपण काही लिहिलेच नाही असे त्यांना म्हणावयाचे आहे काय' अशी मला शंकाही वाटली. माझा दुसरा कवितासंग्रह 'माझा (पण) बेहद्द नाममात्र घोडा' हा चक्क विडंबनकवितांचा संग्रह आहे, हे पाहून 'होड्या' वर प्रेम करणाऱ्या काही वाचकांनी 'तुमच्याकडून ही अपेक्षा नव्हती' असेही सुनावले.

पण, माझ्या काव्यलेखनाच्या सुरुवातीच्या काळात लिहिलेली, माझ्यातल्या 'कवी' ला जागृत करणारी, मला मान्यता आणि मानसन्मान मिळवून देणारी ही कविता, माझ्या इतर कवितांना अप्रिय न म्हणताही, मला सदैव प्रियच राहील. तीच माझी बऱ्याच वाचकांपर्यंत पोहोचलेलीही कविता असावी. म्हणून निर्मितीचा शोध 'होड्या' कवितेचाच घ्यायला हवा. तेव्हा नमनाचा घडा पूर्ण करून मी आता मुख्य आख्यानाकडे वळतो.

मी आधी सांगितल्याप्रमाणे, ही कविता एका बैठकीत, तासा-दोनतासाच्या अवधीत लिहिली. लिहायला घेण्याआधी तिच्यावर विचार केलेला नव्हता आणि लिहून झाल्यावर



अनुक्रमणिका

तिच्यात काहीही फेरफार केला नाही. या सर्व गोष्टींवरून, मला ही कविता उत्स्फूर्तपणे सुचली असे म्हणता येईल; पण शंभर टक्के उत्स्फूर्त असे काही असू शकत नाही. जागृत मनात नसेल तर सुप्त मनात काही विचार झालेला असतो. तथाकथित उत्स्फूर्तपणे सुचलेल्या गोष्टीची पाळेमुळे भूतकाळात, मनात असतातच. त्यांचाच मी एक वेध घेऊन पाहणार आहे.

या कवितेसाठी म्हणून केला नसला, तरी त्या आधी केव्हा तरी, मी गीतांमधल्या धृवपदाचा विचार केला होता. प्रत्येक कडव्यानंतर पुन्हा धृवपद गायले जाते. ते अर्थाच्या दृष्टीने तेथे आवश्यक म्हणून येते, की केवळ गायनाची सोय भागवते, याचा मला प्रश्न पडायचा. लिहिलेल्या गीतात तर प्रत्येक कडव्यानंतर नुसते ' ॥धृ ॥' असे लिहून धृवपदाची बोळवण केलेली असायची. धृवपदाच्या पुनरावृत्त होण्याच्या संकेताचा कवितेच्या आशयाला काही उपयोग करून घेता येईल का; असा काहीसा विचार मी करीत होतो. मी मुक्तछंदात लिहीत असताना धृवपदाचे आकर्षण मला का वाटत होते ? असाही प्रश्न विचारता येईल. त्याचे उत्तर शोधायला गेलो तर मला एक गोष्ट आठवते. लहानपणी, कुठल्या तरी (मोठ्यांच्या) मासिकात मी एक गोष्ट वाचली होती - तिचे नाव, लेखक हे काहीही मला स्मरत नाही - तिच्यातला नायक एक कवी असतो आणि त्याच्या कवितेत 'कालिंदीच्या तीरावरती' या ओळी पुनः पुन्हा येत असतात. का कुणास ठाऊक, ही आठवण माझ्या मनात लख्ख आहे. त्या अढळ आठवणीनेही मला धृवपदाकडे आकर्षित केले असावे. कडव्यांतून पुढे सरकणारी गोष्ट आणि तिला समांतर असे मानसिक पातळीवरचे पुनः पुन्हा येणारे धृवपद आणि हळूहळू स्पष्ट होणारा त्यांचा परस्परसंबंध अशी काहीशी रचना मी करू पाहात होतो.

मानसिक पातळीवरचे पण अजून मनालाही अस्पष्ट असलेले असे काही, धृवपदाच्या एका ओळीत आणण्यासाठी मी प्रतिमांकडे वळलो असावा. (पण तेव्हा मला प्रतिमा हा शब्दही माहीत नव्हता.) माझ्या कवितेत येणाऱ्या प्रतिमा बऱ्याचदा, रूढ सांकेतिक किंवा दुर्बोध वैयक्तिक अशा न राहता, सर्वांना माहीत असलेल्या पण तरीही वापरल्या न गेलेल्या असा असतात. त्यासाठी मी स्वभावतः अनेकदा बालकथा, बडबडगीते यांकडे जातो. (उदाहरणार्थ हिरवळ वाजूलाच होती, गोल गोल राणी इ.) टीकाकार त्यांना किशोरवयीन भावनांचे obsession म्हणतील. म्हणोत. या कवितेसाठी बडबडगीत नव्हे, पण बडबडगीत वाटू शकेल अशा दोन ओळी मला सुचल्या:

*मला पुष्कळ होड्या येतात*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*

ह्याच ओळी का सुचल्या, असा विचार केला तर मला आणखी एक, दोन आठवणी येतात. लहानपणी एकदा आईवडिलांबरोबर कुणाकडे तरी गेलो होतो. तेथे माझ्याच वयाचा एक मुलगा होता. त्याची ताई त्याला गोष्ट सांगत होती. त्याने मला विचारले, "तुला अमकी अमकी गोष्ट माहिती आहे का ?" मी म्हणालो, "हो. मला पुष्कळ गोष्टी येतात. रामाची, कृष्णाची, शिवाजीची, झाशीच्या राणीची - पण मी सांगणार नाही." मी असे का म्हणालो हे मला सांगता










येणार नाही. ही आठवण माझ्या मनात टिकून का राहिली ते ही सांगता येणार नाही, पण ते माझेच वाक्य माझ्या मनात घोळत असावे. त्यात थोडा बदल झाला. शिशुवर्गात आम्हाला कागदाच्या वेगवेगळ्या होड्या करायला शिकवीत असत. एखादी नवीन प्रकारची होडी शिकली, की आपल्याला कोणकोणत्या होड्या करता येतात, ते सांगितले जायचे.

'बंबी होडी, नांगर होडी. शिडाची होडी, साधी होडी'

आपल्याला कोणकोणत्या होड्या करता येतात हे सांगणारी ही ओळ एखादा मुलगा स्वतःला आश्वस्त करण्यासाठीच पुनः पुन्हा म्हणेल कवितेसाठी या ओळी घेतल्यावर त्याला समांतर असा एक प्रसंग मला सुचत (?) गेला. हा मुलगा- त्याचा एक पाय बालपणात आणि एक तारुण्यात. त्याच्या घरी काही पाहुणे फराळासाठी आलेले आहेत. त्यात एक मुलगी आहे. ह्याचे सारे लक्ष तिच्याकडे आहे- पण हे तो स्वतःशीही उघडपणे कबूल करीत नाही. मग तो काय म्हणेल ?

*बिट्टू काहीतरी म्हणत होता*
*तसा तो नेहमीच काहीतरी म्हणतो म्हणा.*
*कॉफी तर सगळेच प्यायलो*
*ती चालवीत आली होती म्हणे गाडी.*

आणि यानंतर पुन्हा धृवपद आले

*बंबी होडी. नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*

कडव्यातले शब्द बोलीभाषेतले– ह्या मुलाच्या मनात येतील असेच आले. कवितेला एक सहज लयही आली. या कडव्याच्या शेवटाचा आणि धृवपदाचा यमकाने सहजच सांधा जुळला होता, पण ते ही बंधन कवितेने ठेवले नाही. त्या मुलीपाशी तर राहूच देत, पण स्वतःपाशीही आपले भाव उघड व्यक्त न करणारे निवेदकाचे व्यक्तिमत्त्व - जे कदाचित माझ्याही स्वभावाशी मिळतेजुळते असेल - हळूहळू साकारू लागले. मग भराभरा या प्रसंगाचे इतर तपशील पुढच्या कडव्यांतून आले. ती सहजपणे वावरते आहे, बोलते आहे, कुत्र्याशी खेळते आहे, फरसाण आणते आहे, पपांना दटावते आहे आणि हा ? — ही फक्त अपेक्षा करतो आहे.

*दारापर्यंत सगळेच गेलो*
*ती ही म्हणाली, 'बराय अंकल, बराय आँटी*
*टाटा बिट्टू, टाटा चिंकू'*
*नंतर म्हणालीच नाही काही.*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*

एवढे लिहून होईपर्यंत कथानकाची आणि धृवपदाची नेमकी सांगड माझ्या मनात नव्हती, पण ह्या बिंदूवर मला लख्खकन् जाणवले:

हा आपल्याला इतक्या होड्या येतात असे सांगतो. मग, होड्या करत का नाही ? सोडत



अनुक्रमणिका






का नाही ? कसा सोडणार ? होड्या सोडायला पाणी कुठे वाह्यलंय ? पाऊस कुठे पडलाय ?

पावसाची समर्पक प्रतिमा निवेदकाच्या व्यक्तिमत्त्वाला आणि कवितेलाही पूर्णत्वाला घेऊन गेली. मी लिहून गेलोः

*पाऊस ना, पडलाच नाही*
*पाणी ना, वाह्यलंच नाही*
*होड्या ना, सोडल्याच नाहीत*
*होड्या ना, केल्याच नाहीत.*
*पण मला पुष्कळ होड्या येतात*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*

आणि कविता संपूर्ण झाली आहे हे जाणवण्याचे, क्वचितच लाभणारे समाधान मला लाभले.

**होड्या**

*मला पुष्कळ होड्या येतात,*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*बिट्टू काहीतरी म्हणत होता*
*तसा तो नेहमीच काहीतरी म्हणतो म्हणा.*
*कॉफी तर सगळेच प्यायलो*
*ती चालवीत आली होती म्हणे गाडी.*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*बोलणं तर बोलायचंच असतं*
*सगळेच काय काय बोलत होते*
*माझ्याशी नाही, पण तीही चिकार बडबडली*
*पुष्कळजण होते, मी बोललोच नाही काही.*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*चिंकू कुत्रा गोडीत होता*
*आँव-याँव, इकडे धाव-तिकडे धाव*
*तिच्याशी तर फारच गोडीत होता*
*तीही भलतीच गोडीत होती.*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*दास अंकलनी मला विचारला*
*पहिलाच प्रश्न दुसऱ्या वेळेला*
*मी सांगितलं म्हणा दोनदा*

*पण ती म्हणाली,'पपा तुम्ही कमालच करता.'*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*कॉफी तर तिनंच दिलीन*
*तेव्हा मी नि गंधेकाका चेस खेळत होतो.*
*फरसाण सुद्धा तिनंच आणलंन*
*एकदा घेतलं, दुसऱ्यांदा नाही म्हणालो.*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*दारापर्यंत सगळेच गेलो*
*तीही म्हणाली,'बराय अंकल, बराय आँटी*
*टाटा बिट्टू, टाटा चिंकू.'*
*नंतर म्हणालीच नाही काही.*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*
*पाऊस ना, पडलाच नाही*
*पाणी ना, वाह्यलंच नाही*
*होड्या ना, सोडल्याच नाहीत*
*होड्या ना, केल्याच नाहीत.*
*पण मला पुष्कळ होड्या येतात,*
*बंबी होडी, नांगर होडी, शिडाची आणि साधी होडी.*

(हेमंत गोविंद जोगळेकर. हेमलता,सी ९१७/१९, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणे ४११००४)

# प्रियदर्शन

विश्वास वसेकर

*'फक्त तुझी जर दगडी भिवई*
*चळेल थोडी सर्वांदेखत'*
*देशभराच्या पेशीपेशीतून*
*मतैक्य येईल वाहत वाहत*

*कोण फर्जीचा व्हावा प्यादा*
*आणि करावे वाद कुणाला*
*कुठला प्यादा व्हावा फर्जी*
*मर्जीतला अन् झाडूवाला*

*सामान्याच्या मतीस यावी*
*मंद मनोहर अगतिक भूल*
*असामान्य दावणीत यावे*
*विवेकमतीची उधळीत धूळ*

*प्रचंड फटकन् बार वाजले*
*रंगीत दारूच्या कानठळ्या*
*जाळिलेस तू त्यासचि रावण*
*मानून आम्ही वाजवू टाळ्या*

*भाकरी ? असू दे. भाजत राहील*
*स्वातंत्र्य ? तेही मिळतच राहील*
*धक्क्यांच्या पायऱ्यांवरुनी का*
*ठेचूनही जर मस्तक राहील !*

*वाण इथे ना मस्तकांचीही*



अनुक्रमणिका

*पशूही कमी ना नाचवायला*
*रिंग मास्टरच नव्हता असला*
*सकल सर्वदा वटारायला*

*बुतशिकन पाखंडी नास्तिक*
*टरकतील अन् जातील फाटत*
*फक्त तुझी जर दगडी भिवई*
*कुचळेल थोडी सर्वदिखत*

'प्रियदर्शन' ही कविता २५ जुलै १९८२ या दिवशी लिहिली. ती त्याच वर्षीच्या म्हणजे १९८२ च्या 'मराठवाडा' दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली.

'प्रियदर्शन' ही कविता स्पष्टपणानेच देशातील तत्कालीन राजकीय परिस्थिती आणि तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्याविषयी कवीच्या तीव्र अशा प्रतिक्रिया व्यक्त करणारी आहे.

इंदिरा गांधींच्या विरोधकांनासुद्धा त्यांची प्रभावी राजकारणशैली नाकारता येणार नाही. भारतीय मानसिकतेची नाडी अचूक ओळखून या खंडप्राय देशावर स्वतःचे वर्चस्व त्या दीर्घकाल टिकवू शकल्या. इथल्या लोकशाहीने रुजविलेल्या अनेक चांगल्या संकेतांना तिलांजली देऊन लोकशाहीविरोधी अशा अनेक अनिष्ट रूढींचा त्यांनी पायंडा पाडला. घटक राज्यांच्या अधिकारांचा संकोच करून विकेंद्रीकरणाच्या मूलभूत तत्त्वाची पायमल्ली केली गेली. आमदारांचा अधिकार असलेले नेतेपद किंवा मुख्यमंत्री ठरवणे दिल्लीकडे गेले. स्वतःचे सहकारी मंत्री ठरविण्यासाठी मुख्यमंत्र्याला दहादा दिल्लीच्या खेपा कराव्या लागत असत. विरोधी पक्ष वा विरोधी आवाजाची मुस्कटदाबी करून लोकशाहीच्या पायावरच कुऱ्हाड घालण्यात आली. बँकांचे राष्ट्रीयकरण, बांगलादेश मुक्तीत हस्तक्षेप यांसारखे चमकदार, धाडसी निर्णय घेऊन स्वतःची प्रतिमा सतत उजळती ठेवण्याचा त्या प्रयत्न करीत. मोहन धारियांच्या 'सफर' मध्ये याचे फार सुरेख वर्णन आले आहे. परकीय आक्रमणासारख्या व्याज प्रश्नांचा बागुलबोवा जनतेसमोर उभा करत मूळ प्रश्नांच्याबाबतीत धूळफेक करायची, जनतेचा बुद्धिभेद करायचा हे त्यांचे खास तंत्र होते. भाकरी दुष्प्राप्य करून स्वातंत्र्याच्या मोबदल्यात ती देण्याचे षड्यंत्र आणीबाणीच्या आधी, वेळी आणि नंतरही त्यांनी रचले.

प्रस्तुत कवितेत २५ जुलै १९८२ च्या आधीच्या घटनांचे उल्लेख अध्याहृत; परंतु ठायीठायी आहेत. दगडाची खौळ घेऊन बसलेल्या परमेश्वराला मर्ढेकर म्हणाले होते, 'फक्त तुझी जर दगडी भिवई, चळेल थोडी सर्वदिखत.' मर्ढेकरांच्या या ओळींना तिरप्या टाईपात छापून तिथूनच या कवितेची सुरुवात होते. मर्ढेकरांचा संदर्भ बदलून या कवितेत सुरुवातीलाच १९८२ च्या सुमारास शासनकर्त्यांना आलेले परमेश्वरपण आणि त्यांची करडी नजर सुचवली

जाते. त्यानंतरच्या कवितेतून निरनिराळ्या संदर्भांनी राजकीय घटना आणि परिस्थितीचे चित्रण येते.

फर्जीचा प्यादा करावयाचा हा यशवंतराव चव्हाणांबद्दलचा बाईंचा निर्णय तर मर्जीतल्या झाडूवाल्याला प्याद्याचा फर्जी बनवायचा हा ग्यानी झैलसिंगांच्या बाबतीतला निर्णय. (राष्ट्रपतीपदासाठी इं.कॉं.चे उमेदवार म्हणून बाईंनी ग्यानीजींचे नाव घोषित करताच अत्यंत कृतज्ञतेने ग्यानीजींनी तेव्हा असे उद्‌गार काढले होते की, इंदिराजी सांगतील तर आपण झाडू मारावयाचे काम करायला देखील तयार आहोत.) पहिला पदावनतीचा तर दुसरा पदोन्नतीचा; पण दोन्ही लहरी. विनोबा, चित्रकार हुसेन, 'माँ तेरे बीसों सपने साकार करेंगे हम' लिहिणारे बालकवी बैरागी आणि त्याला संगीतबद्ध करणारे वसंत देसाई, इंदिराजींचे प्रचारप्रमुख कवी श्रीकांत वर्मा हे सगळे, कवितेत ज्यांचा उल्लेख 'दावणीत बांधून घेणारे असामान्य' असा आला आहे त्यात जमा होतात.

'बुतशिकन' म्हणजे मूर्तिभंजक. विरोधी पक्षांचा उल्लेख बुतशिकन, पाखंडी, नास्तिक या प्रतिमांतून आला आहे. इंदिरा माँच्या तुलनेत ते इतके दुबळे आणि निस्तेज आहेत की तिने मामुली वार केले तरी ते नेस्तनाबूत होतात. शेवटच्या ओळीत पहिल्या दोन ओळींची पुनरावृत्ती 'चळेल' ऐवजी 'कुचळेल' असा एक शब्द बदलून होते. नंतरचा 'कुचळेल' हा शब्द कुचाळी आणि वक्रदृष्टी हे दोन्ही अर्थ सुचवण्याकरता घडवला आहे.

या कवितेचे 'प्रियदर्शन' हे शीर्षकदेखील तत्कालीन एका महत्त्वाच्या घडामोडींचे वाचक आहे. देशभरातील जनतेच्या सतत समोर आपली प्रतिमा राहावी म्हणून दूरदर्शनचे जाळे इंदिराजींनी निर्माण केले. या दूरदर्शनवरील प्रियदर्शनीचे दर्शन ते 'प्रियदर्शन'.

मराठवाडा दिवाळी अंकात जेव्हा ही कविता प्रसिद्ध झाली, तेव्हा अनेकांनी ती आवडल्याचे कळवले. 'मराठवाडा' सारख्या इंदिरा गांधींच्या विरोधात लढाऊ राजकीय भूमिका घेणाऱ्या दैनिकाच्या वाचकांना ती अधिक स्पर्शून जाणे शक्य होते. तसेच झाले. 'काळा गुलाब' या माझ्या तिसऱ्या काव्यसंग्रहात ही कविता होतीच. त्यासंबंधी डॉ. आनंद यादवांनी विस्तृत पत्राने अभिप्राय कळवताना मर्ढेकर, त्यांचा पादाकुलक यांचीमाझ्या कवितेच्या तुलनेत चर्चा केली ती या कवितेला समोर ठेवूनच असावी. नरेश कवडींच्या पत्रात त्यांना आवडलेल्या कवितांत या कवितेचा उल्लेख असल्याचे आठवते.

'काळा गुलाब' या माझ्या काव्यसंग्रहाची मोजकी परीक्षणे प्रसिद्ध झाली. त्यातले मला सर्वांत आवडलेले परीक्षण डॉ. सूर्यनारायण रणसुभ्यांचे होते. त्यांनी माझ्या या संग्रहातील कवितेला असलेल्या व्यापक राजकीय, सामाजिक पार्श्वभूमीची चर्चा करताना या कवितेचा इतर अनेकींसह उल्लेख केला होता.

'प्रियदर्शन' ही मला स्वतःला आवडलेल्या माझ्या कवितांपैकी एक असण्याचे कारण तिच्यातून मला जो परिणाम साधायचा होता त्यात मी यशस्वी झालो असा माझा समज आहे. दुसऱ्या कवीच्या कवितेतून मुखड्याचा शेर घेऊन त्याचे संदर्भ बदलत तो आपल्या कवितेचा










सेंद्रीय घटक बनवायचा हा गुलजार या माझ्या आवडत्या कवीला साधलेला प्रयोग मला फारच आकर्षक वाटला होता. 'मौसम'मधील 'दिल ढूंढता है' या गाण्याच्या संदर्भात हा चमत्कार अनुभवण्यासारखा आहे. या प्रयोगाला 'हयवदन'ची उपमा देऊन त्याची विस्तृत चर्चा मी 'सोबत'च्या गतवर्षीच्या दिवाळी अंकातील माझ्या 'गुलजार'वरील लेखात केली आहे. असे आपल्याला कधी जमले तर_असे मलाही वाटायचे. 'प्रियदर्शन'मध्ये मर्ढेकरांच्या ओळी घेऊन मी ते कलम यशस्वीपणे करू शकलो. हा अनोखा प्रयोग सफल करणारी माझी कविता म्हणूनही 'प्रियदर्शन' मला आवडते.

'जगण्याचं पात्र' ही अनुराधा पोतदारांची कविता अकरावीला पाच वर्षांपासून शिकवताना कवितेची निर्मितिप्रक्रिया समजून सांगणे किती कठीण काम असते यावर मी खूप सांगत असतो. हे कठीण काम आपल्याला कधी करावे लागेल असे वाटले नव्हते. 'प्रियदर्शन' या कवितेने तेही करायला लावून ज्ञानेश्वरांच्या निकषाने 'पढियंता' होण्याचा मान मिळवला आहे.

(प्रा. विश्वास वसेकर, मितवा, अत्रेनगर, सेलू ४३१५०३)

---

# गोष्ट

निरंजन उजगरे

---

कधी असं होतं की, आपलं बाळपण, शैशव आणि तारुण्याच्या सीमेवरचं प्रौढत्व, काळाचा संदर्भ विसरून आपल्या वर्तमानावर शाकारून येतात. आपल्याला जाणवतात ती, आपल्या भूतकाळातील कळ्यांची झालेली फुलं आणि क्वचित फुलांचं निर्माल्य झाल्याची जीवघेणी कल्पना.

मनाच्या अशा दिङ्मूढ अवस्थेत रात्रीच्या वेळी आपल्या छोट्या मुलाला गोष्ट सांगण्याचा साधा प्रसंगही एखाद्या तरल, गंभीर कवितेचं रूप घेऊन येतो. प्रसंग निमित्तमात्र, पण मनाच्या तळाशी होणारी मंद लयीतली हालचाल ह्या कवितेला जन्म देते.

आयुष्याचा खुजेपणा, लौकिक यशापयशाचे तकलादू आलेख, आपल्यापाठून येणाऱ्या पिढीची आपल्यावरील भिस्त आणि त्यांच्यासाठी आपण काही करू शकणार की नाही ह्या बोचऱ्या जाणिवेने हृदयात उमटणारी अणकुचीदार कळ ह्यासर्वांचा एकत्रित परिणाम म्हणून वात्सल्याच्या क्षितिजावर रेललेलं मन अधिकाधिक मृदू होत जातं आणि कागदावर उतरत जाते ती एकटाकी, सलग, पुन्हा कधीही संस्करण करण्याची गरज न पडणारी कविता, 'गोष्ट'.



अनुक्रमणिका






**गोष्ट**

*किंचित प्रौढ पिंपळाच्या पानावर*
*इवलाले पंख निवान्त विस्तारून*
*विसावलेल्या फुलपाखरासारखा,*
*तुझा निरागस तळवा माझ्या तळहातावर.*
*बरीच रात्र झाल्याची मला जाणीव.*
*मी तुला गोष्ट सांगतोय.*

*तुझ्या डोळ्यांतलं*
*हुश्शार ससोबाचं कौतुक*
*हळूहळू शिरत चाललंय,*
*तुझ्या स्वप्नांच्या पारदर्शक राज्यात.*

*मी अजून गोष्ट सांगतोय*
*आणि तू झोपलास देखील.*
*माझी गोष्ट आता मलाच ऐकू येतेय.*
*आजूबाजूला वाऱ्याची अस्वस्थ सळसळ;*
*तुझा तळवा अजूनही निवान्त*
*माझ्या तळहातावर.*

*फुलपाखरू उडण्याआधी*
*पिंपळाचं पान गळणार नाही,*
*ह्याचा हवाला कोणी द्यावा ?*

*माझेही डोळे आता मिटत चाललेयत_*

कविता लिहिली १९८३ साली. प्रथम प्रसिद्ध झाली १९८४ च्या 'मौज' दिवाळी अंकात. नंतर तिचा हिंदी अनुवाद भारतीय ज्ञानपीठ प्रकाशनतर्फे प्रसिद्ध झालेल्या 'भारतीय कविताएँ-१९८४' ह्या संपादित ग्रंथामध्ये समाविष्ट करण्यात आला. १९८४ च्या 'अक्षर दिवाळी' मध्ये ह्या कवितेला स्थान मिळाले. ही समीक्षकांकडून 'गोष्ट'ला मिळालेली पावतीच होती. १९८७ साली प्रसिद्ध झालेल्या 'परिच्छेद' ह्या माझ्या कवितासंग्रहामध्ये 'गोष्ट' कायम स्वरूपात ग्रंथरूपाने स्थिर झाली.

आज इतक्या वर्षांनीही जेव्हा मी ही कविता रसिकांना वाचून दाखवतो, तेव्हा त्यांना एक

निराळाच अनुभव मिळाल्याचं ते मला सांगतात आणि खरं म्हणजे, ही कविता वाचून झाल्यावर, नवीन कवितेचा जन्म होण्याची कोवळी चाहूल जिथे मनाला ऐकू येते, अशा एका बेटावर मी स्वतः जाऊन पोहोचतो.

(निरंजन उजगरे. सी ९/१ वीणानगर, शास्त्री मार्ग, मुलुंड (प), मुंबई ८०).

# आपणच एक आभाळ बांधावं

**हेमा लेले**

माझ्या बाबतीत तरी, कविता म्हणजे स्वतःच्याच अधिकाधिक जवळ जाण्याचा केलेला प्रयत्न. स्वतःशी जवळीक साधणं ही गोष्ट तशी सोपी मुळीच नाही. इतर नात्यांच्या बाबतीत जशी अनेक मानसिक, शारीरिक बंधनं, गंड आडवे येत असतात, तसेच स्वतःशी नातं जोडण्याचा प्रयत्न करतानाही येतातच. तरीही इतरांशी असलेल्या नात्याच्या बाबतीत, जसा एखादा समंजस क्षण अवचित हाती लागतो नि मग आपण ते नातं पुरेपूर जगू लागतो. तसाच क्षण स्वतःशी स्वतःचं असलेलं नातं फुलवतानाही अनुभवाला येतो.

असा जिवंत, रसरशीत क्षण जेव्हा शब्दांमुळे जरासुद्धा भ्रष्ट न होता कागदावर जसाच्या तसा उतरतो. तेव्हा त्या शब्दांमध्ये निबद्ध झालेली कविता माझी मला आवडते. अशा कवितेमध्ये, प्रत्यक्ष अनुभवाची लय तशीच कायम असते. अनुभवाचा आरंभ, अंत, उच्चबिंदू सारे काही अबाधित राहते. अनुभवाच्या तेजाला डागाळणारी शब्दांची फितुरी जरासुद्धा नसते. म्हणूनच अशी कविता लिहून संपल्यावरचा क्षण एका विचित्र मुक्ततेचा नि विलक्षण तरल समाधान देणारा असतो.

*आनंदात मूक रहावं_*
*वेदनेत बोलकं व्हावं*
*पण, एकेका क्षणाचं वारं*
*कसं आकंठ झोकीत जावं !*

*सहवासात हरवून जावं,*
*विरहात शोधत रहावं*
*पण, नात्याचा एकेक धागा*
*कसा तनमनानं विणत रहावं !*



अनुक्रमणिका

*घर आपलं उन्हात बांधावं*
*आठवणींनी श्रावण व्हावं !*
*मग गाणारा पक्षी होऊन*
*आपणच एक आभाळ बांधावं !*

ही माझी छोटी कविता मला आवडते ती वर सांगितल्या कारणांमुळे. प्रत्येक कविता खरं तर आपापल्या जागी अर्थपूर्णच असते. तरीही काही मोजक्या कवितांचंच बोट धरून आपण आयुष्यभर चालू शकतो. या कवितेमधे व्यक्त झालेल्या स्वतःच्या मनाच्या जातीचा जर काही कारणांमुळे आपल्याला विसर पडला तर अशा घायकुत्या अवस्थेत काही कविता आपल्याला पुन्हा सामर्थ्य देतात. स्वतःचा स्वतःलाच विसर पडला आहे याची हळुवार जाणीव देतात नि स्वतःशी समेटही घडवून आणतात.

ही माझी कविता मला अशीच वाटते. अशी कविता खरं तर मनाच्या तळाशी सतत झुळझुळत असते. पेट घेणाऱ्या वस्तूला एखादी ठिकाणी पुरेशी होते, तसाच एखादा उल्लेख; लहानशी घटना ठिणगीचं काम करते. मग तो तळाशी झुळझुळणारा निःशब्द अनुभव शब्दबद्ध होतो.

काही वर्षांपूर्वी मी एका अधिवेशनासाठी दिल्लीला गेले होते. तिथे सुप्रसिद्ध हिंदी लेखक व 'धर्मयुग'चे माजी संपादक श्री. धर्मवीर भारती यांचं एक हार्दिक भाषण ऐकण्याचा योग आला. ते भाषण ऐकताना मला वाटत होतं की, 'यांना माझ्या मनातलं कसं बरं कळलं ?' त्या केवळ दहा मिनिटांच्या सुबद्ध भाषणाचा विसर मला कधीही पडणार नाही. एका लेखकानं, कवीनं व्यक्त केलेलं ते 'स्वगत-काव्यच' होतं ! त्यात एक वाक्य भारतीजी असं बोलले, "वेदना मुझे मुखर बनाती है और सुख निःशब्द !" या वाक्यानं ठिणगीचं काम केलं. मी लॉजवर आले नि इतके दिवस निःशब्दपणे साद घालणारी प्रचीती शब्दबद्ध झाली.

*"आनंदात मूक रहावं*
*वेदनेत बोलकं व्हावं !"*

पुढच्या साऱ्या ओळी जणू पाठच होत्या !

माझ्या या कवितेची जात नि माझी जगण्याची जात एकच आहे. आयुष्य आकंठ जगण्यावर माझा प्रथमपासून विश्वास आहे. जे आपण जगतो तेच लिहावं यावरही विश्वास आहे. आकंठ जगणाराच शब्दांनाही न गवसलेला अर्थ जाणवून देऊ शकतो यावरही विश्वास आहे. 'आनंद' या भावनेपेक्षा दुःख, वेदना तुम्हाला आयुष्याच्या अधिक जवळ नेऊन उभी करते याबद्दल माझी खात्री आहे. वेदनेचे हजारो रंग आहेत. आनंदापेक्षा वेदना अधिक बोलकी आहे. ऋतू, निसर्ग या गोष्टी खरं तर 'मानसिक' आहेत, असंच मला वाटतं. तुमच्या मनाची अवस्था हाच त्या वेळचा तुम्हाला सामोरा येणारा निसर्ग ! म्हणूनच तुम्ही क्षणात वसंत बोलावू शकता_ क्षणात श्रावण_ आपणच बांधलेल्या आभाळावर माझी श्रद्धा आहे. कारण अशा

आभाळाचा पसारा अनावश्यक नसतो. फुटकळ, निरुपयोगी तत्त्वांच्या खुरट्या घिरट्याही या आभाळात संभवत नाहीत. मनस्वी, स्वच्छंद, सुरेल जगण्याची असोशी माझ्या मनात जशी आहे तशीच या कवितेतही उतरली आहे.

ही कविता जेव्हा मी एका कविसंमेलनात प्रथम वाचली तेव्हा एका नाणावलेल्या ज्येष्ठ कवीनं ती जिथल्या तिथे जवळजवळ पाठ केली. आजपर्यंत अनेकांनी ही कविता माझ्या हस्ताक्षरात मुद्दाम लिहून घेतली आहे. माझी ही कविता इतरांच्या मनात झिरपून त्यांनाही स्वतःची खूणगाठ पटवायला जर मदत करीत असेल, त्यांनाही जर स्वतःचं वेगळेपण आकळून घ्यायला मदत करीत असेल तर ती फक्त माझी राहतच नाही. माझ्या या कवितेनं मला दिलेला अनुभव असाच आहे. मी जे लिहिते ते इतरांनाही आपलंसं वाटावं या इतकं दुसरं समाधान कुठलंच नाही. असं समाधान देणारी ही माझी कविता म्हणूनच मला आवडते.

(हेमा लेले, स्वाती, वेदगंगा सोसायटी, वारजे, पुणे २९)

---

# झाड

**अरुणा ढेरे**

---

*आईच्या उबेतून तो दूर झाला. तेव्हापासूनच ते वेड त्याचे.*
*बहरलेल्या घोसतुऱ्यासारखा शब्दांभोवती*
*त्याचे कोवळे अनुभव नुसते घमघमत असायचे.*

*नंतर सगळे झाडच त्याच्या ओळखीचे झाले.*
*हिरवा रस शोषून घेत पानांतून पसरणारी पिवळी नश्वरता*
*गळून पडणारे एकेक पान मुळीच आवाज न करता*
*खोडाचा विटकरी खरबरीत स्पर्श, निर्मम सत्यासारखा*
*अन् सालीआड दबा धरून बसलेली वाळवी– तिचा फौजफाटा–*
*त्याने सगळे झाडच पाहिले*
*तेव्हा पूर्वीचे बेभान वेड पुष्कळ कमी झाले.*

*आणि मग एक दिवस अचानक.*
*अर्ध्या झोपेसारख्या जागेपणी त्याला दिसले जमिनीखालचे खरे झाड*

*त्याचा परिसर, त्याचा पसारा, उम झुंजीतून होणारी त्याची वाढ*
*ती प्रतिकार करणारी जमीन- त्याचा आग्रह तिला मुठीत ठेवण्याचा*
*ते भुलवून तडफडत ठेवणारे मायावी पाणी*
*आणि मधूनच ऐकू येणारी पाताळातल्या अरिपुरुषांची विषारी गाणी–*

*भयाने थरथरत पळत सुटला तो.*
*त्याने झाडाची ओळखच नाकारली*
*झाड मात्र तसेच घोसतुऱ्यांनी लहडलेले, पसरून उभे दाट सावली*
*नित्यनेमाने गळणारी पाने, खोडातली वाळवी, जमिनीतली झुंज.*
*साऱ्यासकट झाडाचे जगणे–*
*त्याच्या स्वीकारण्या-नाकारण्याच्या पार पलिकडचे*
*स्वयंभू, स्वतंत्र, अखंडपणे.*

जे जे जीवाला झोंबतं, जखमी करतं किंवा बिलगतं आणि सुखावतं, ते ते शब्दात व्यक्त करण्याची हळूहळू सवयच लागून जाते. प्रत्येक मर्मस्पर्शी अनुभवणं, झगडणं, कोसळणं आणि उसळी घेणं शब्दात आलंच पाहिजे असा नकळत हट्ट सुरू होतो. मग शांतपणे स्वतःला मौनाच्या स्वाधीन करणं अवघड होऊन बसतं.

खरं म्हणजे आपल्याला पुरेपूर माहीत असतं की आपल्यासमोर येणाऱ्या क्षणामागे लांबवर दूरात पसरलेला त्याचा वास असतोच. तिथवरच्या संदर्भांचा माग काढणं कठीण असतं. तरीपण तो सामोरा क्षण जमेल तितका आपण धरतो अन् शब्दांत भरतो. शिवाय हेही माहीत असतंच आपल्याला की आपण जेवढे स्वतःला ओळखतो त्यापेक्षा कितीतरी पलीकडे आपण असतोच. स्वतःलाही अज्ञात असे. अन् तरी आपण जमेल तितके शब्दांत येतो.

शब्दांना पलीकडे सारून संथपणे अनुभवात विरघळत जाणं, गोष्टी मुकेपणांत कशा आकार घेतात ते थांबून निरखून राहणं, असंही कधीकधी घडतं. नाही असं नाही, पण ते घडून गेल्यावर लगेचच एक तीव्र इच्छा आपला ताबा घेते. जे घडून गेलं ते शब्दात आणण्याची इच्छा आणि आपण लिहीत जातो. शब्दांच्या अलीकडे थांबणं आपल्याला शक्य नाही होत. उलट शब्दांजवळ जाता येत नाही अशी नुसती शंका आली तरी आपण तडफडू लागतो.

प्रत्यक्षात लिहिणं ही गोष्ट काय पूर्ण सुखाची असते का ? पुष्कळ यातना तिच्यातही भरलेल्या असतातच की. शब्दांचा ताठरपणा, कधी अनावश्यक मऊपणा, त्यांच्या सहकार्यातली हुकमी वृत्ती, त्यांच्या असहकारातला निर्विकारपणा. ह्या गोष्टींचं दुःख कमी नसतं. शिवाय स्वतःमधले अभाव, स्वतःच्या ठायी कमी-अधिक होणारा विश्वास, स्वतःचं कमी-अधिक पाझरणं यांचंही दुःख ! मिळून ते लिहिणं पुष्कळ छळणारं असतं.

तरीपण त्या दुःखाचं, त्या छळण्याचं एक प्रकारचं वेडं आकर्षण असतं. त्याचा नाद लागून



अनुक्रमणिका







जातो. अन् हळूहळू ती निकडीच्या गरजेची गोष्ट होऊन बसते. शब्दांच्या अलीकडे थांबण्याचं दुःख पचवता आलं तर फार मोठी ताकद साहित्यिकाला मिळते असं मला वाटतं. तशी ताकद अगदी थोड्या प्रतिभावंतांजवळ असते.

ती ताकद माझ्याजवळ नाही. मी त्या दुःखाला सहन करू शकत नाही. त्याऐवजी मी लिहिण्यातल्या यातनांना 'हो' म्हणते. तुलनेनं कमी अंतर्मुख दुःखाला स्वीकारते. म्हणून दरवेळी स्वतःच्या कविता वाचताना मला ती खंत अस्वस्थ करते. माझं अपुरेपण असं की, मी जीवनाचं रहस्य शब्दांच्या हृदयातच शोधते. मला मौनाशी थांबता येत नाही. जीवनाच्या गाभ्याशी सुटेपणानं, स्वतंत्रपणानं, शब्दांशिवाय जाण्याची माझी तयारी नाही. सहानुभूतीच्या गाढतेनं जीवनाचा पैस आपलासा करीत असताना ज्यांचं मौनही बोलकं होऊन जातं अशांच्या जातीची मी नाही. मला असं सारखं वाटत राहतं.

गमतीची गोष्ट अशी की, तरी मी लिहिणं थांबवत नाही. जमेल तसं, जमेल त्या प्रकारे मी लिहीत जाते. स्वतःच्या मर्यादा, शब्दांचा स्वभाव आणि जीवनाचं प्रचंडपण लक्षात येऊनही लिहिते. मग ते लिहिणं म्हणजे आपण, जीवन आणि शब्द यांच्या संबंधांचा एक बरावाईट गुंता होऊन बसतो.

बऱ्याच वेळा ह्या गुंतलेल्या धाग्यांतून मला सवयीच्या आकृती दिसतात. शब्दांना सवयीच्या झालेल्या. मला सवयीच्या आणि सोयीच्या झालेल्या; पण कधीकधी मात्र ही सवयीची, ओळखीची जाणीव अगदी मिटूनच गेलेली दिसते. शब्दांना स्वतःची आठवण राहत नाही. मला मी सापडत नाही आणि असतो फक्त जीवनाचा गुंता. कधी विराट अंगावर येणारा. कधी एखादाच नाजुक धागा. पण हलला की जिवापासचं सगळं दुखवत उठवणारा. असं जिथे जिथे होतं तिथे मला थांबावसं वाटतं. मला माझी ती ती कविता फार आवडते. त्यातलीच ही एक कविता.

ही कविता म्हणजे माझ्या मनात घोळणाऱ्या सततच्या विचारांच्या सावलीतली कविता आहे. अतिशय दीर्घ अशी ही सावली अलीकडच्या माझ्या पुष्कळ कवितांवर पडलेली मला दिसते. या सावलीतल्या कवितांचा एक मोठा गटच तयार होतो आहे म्हणा ना ! म्हणून या कवितेबद्दल सांगायचं तर या सावलीबद्दल आधी थोडं बोलायला हवं.

अलीकडे पुष्कळ वेळा कलावंत आणि त्याचं माध्यम यांचा विचार मी साहित्याच्या अंगानं करते आणि आपली सबंध वाङ्मयीन परंपरा माझ्या डोळ्यापुढे उभी राहते. असं वाटतं की, कलावंतांना किती तऱ्हांनी शब्द भेटलेला आहे ! किती प्रकारे त्यांनी शब्दाला भोगलं आहे किंवा शब्दांनी त्यांना कसं खेळवलं आहे ! किती पातळ्यांवर, किती शतकं चालत आलं आहे हे नातं ! मग 'कलावंताला भेटलेला शब्द' हाच माझ्यासाठी एक कुतुहलाचा विषय बनून गेला.

शब्दाची कलावंताशी असलेली शतरूपी नाती मला आयुष्यातल्या अनेक घटना प्रसंगांमध्ये विरघळताना दिसली आणि सुरू झाली एका अखंड विचारसूत्रातली निर्मिती, संस्कृतीच्या प्रवासात कलावंत आणि शब्द यांच्या नात्याचा शोध सुरू झाला. त्या शोधाच्या

कवितांपैकीच ही एक आत्ता मी सांगितलेली.

या कवितेच्या जन्माशी माझ्या लहानपणच्या अनुभवांचं सुंदर स्मरणही जडलेलं आहे. माझं लहानपण शनिवार पेठेतल्या मोठ्ठ्या वाड्यात गेलं. तिथे मागे-पुढे अंगण होतं. मागच्या अंगणी लहानशा विष्णूच्या देवळावर फांद्या पसरून एक औदुंबराचं झाड होतं. लाल टपोऱ्या उंबरांनी लहडलेलं ते झाड, आमच्या स्वयंपाकघराच्या खिडकीशी हलणाऱ्या त्याच्या फांद्या, त्यावर येऊन बसणारे गर्द हिरवे पोपट आणि घरात पसरणारा पिक्या उंबरांचा कोमटसर वास–

माझ्यासाठी तो औदुंबर म्हणजे केवढं काही होता. स्वयंपाकघराच्या उंच उंबऱ्यावर बसून त्या झाडाकडे पाहत राहणं किंवा झाडाखाली बसून कुठली कुठली गाणी म्हणणं मला अजून आठवतं. किंबहुना कविता समजायची माझ्या मनातली एक वाट त्या औदुंबरापासूनच होती. ते झाड तोडलं तेव्हाचं दुःख किती भाबडं आणि म्हणून किती जबरदस्त होतं हे मला अजून विसरता येत नाही.

त्यानंतर मी केवढे तरी औदुंबर पाहिले. पुष्कळ ठिकाणी पाहिले. प्रसन्न मनाने. दृष्टिसुखद परिसरातही पाहिले, पण ते गाठाळ, चरबरीत पानांचं झाड मला कधी सुंदर वाटलं नाही. कधी फारसं आवडलंही नाही.

मात्र या कवितेच्या जन्मापाशी अचानक माझ्या बालपणीचा औदुंबर लाल लाल फळांनी लगडून आला. वाटलं की ते झाड म्हणजे शब्दही आहे प्रारंभकाळी भेटणारा आणि आयुष्यही ! त्या काळी औदुंबर ही माझ्यासाठी नुसती जीवशास्त्रीय घटना नव्हती. किंबहुना त्या झाडाचं जीवशास्त्रीय अस्तित्व वस्तुनिष्ठपणे माझ्या ध्यानातच आलेलं नव्हतं. माझ्यासाठी पंचेंद्रियांच्या शक्तींना जागं करणारं, साद घालणारं ते एक लाल हिरवं सौंदर्य होतं. त्याचं दुसरं नाव शब्द किंवा आयुष्य असं काहीही असतं तरी मला चाललं असतं.

तो प्रारंभ काळातला समज पुढे नकळत कधीतरी संपला. त्याबरोबर त्या लहानपणच्या औदुंबराचं अस्तित्वही संपलं. मग उरली ती जगातली यच्चयावत् औदुंबराची झाडं म्हणजे माझ्या लेखी नुसती एक जीवशास्त्रीय वस्तुस्थिती ठरली– 'उंबराचं झाड' नावाची.

पुष्कळदा कलावंत शब्दाचा माध्यम म्हणून स्वीकार करतो तेव्हा माझ्या आणि औदुंबराच्या त्या बालपणाच्या नात्याचंच प्रतिबिंब मला त्या स्वीकारात दिसतं. वागर्थाचा प्रौढ समंजस स्वीकार तर कित्येक कलावंतांनी आयुष्यभर केलेला दिसत नाही. कित्येक वेळा समंजस स्वीकाराच्या पातळीवर आला की तो संबंध टिकतही नाही. त्यातला पहिला कोवळा रोमँटिक भाग हरवत चालला की कलावंत कित्येकदा अस्वस्थ होतो. शब्दाकडे पाठ फिरवतो किंवा त्या कोवळेपणाचा आभास आयुष्यभर जपत राहतो. म्हणून माझा औदुंबर मला दिसला शब्दमाध्यम म्हणूनही.

आणि आयुष्य म्हणूनही तो तितकाच स्वयंभूपणे भावतो पहा. जगण्याविषयीचं आपलं पहिलं बेभान आणि कोवळं प्रेम हळूहळू मागे सरत जातं. वास्तवाचं स्पष्ट आणि प्रौढ भान










येतं तेव्हा काय होतं ? काहीजण मोडतात, काही करपतात, काही कडू तर काही निबर होतात. काहीजण खरं जगणंच नाकारतात.

पहिला औदुंबर तेव्हा पहिल्यासारखा लाल घोसांनी लगडलेला सुंदर हिरवा अनुभव राहत नाही. तो झुंजणारा, आक्रमण करणारा, वाळवी लागलेला, पानगळ सोसणारा आणि तरीही रंगीत असलेलाच असा एक गुंतागुंतीचा वृक्ष बनून जातो. तुम्ही हवंसं म्हणा, नकोसं म्हणा, तुमच्या स्वीकाराच्या अन् नकाराच्या पार पलीकडे स्वतंत्र वाढणारं ते आयुष्य असतं.

हे सगळं मी कवितेत उतरवू गेले. तीन पातळ्यांवर मला या कवितेतलं झाड रुजवायचं होतं. ते रुजलं. स्वतंत्रपणे, माझ्या शब्दांच्या अडसराला न जुमानता ते भरभरून वाढत गेलं. मी तर त्याच्या लेखी अजिवात नव्हते. त्याचं समाधान मला भरभरून मिळालं.

लहानपणचा औदुंबर असा जगला. तेव्हा लहानपणी, औदुंबराला फुलं येत नाहीत किंवा आलेली कळत नाहीत याची मुळीसुद्धा जाणीव नव्हती. त्याच्या लालगर्द फळांचे घोस मला पुरेसे होते. तेच त्याचे तुरे होते. तीच फुलंही. ह्या कवितेत मात्र माझ्या औदुंबराला स्वतःच्या, शब्दांच्या विस्मरणाची लहान लहान बुंदक्यांएवढी फुलंही आली.

'रुमडाला सुम' येण्याचा हा चमत्कार फक्त हरीच्याच परसात नव्हे तर केव्हा केव्हा आपल्याही अंगणात घडतो, हे केवढं भाग्य !

(डॉ. अरुणा ढेरे, अभिराम, तुळशीबागवाले कॉलनी, पुणे-४११००९)

# तुझे नाव लिहिताना

**मधु जामकर**

श्री. शंकर सारडा यांचे पत्र आले, 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा १९९० चा दिवाळी अंक काव्यविशेषांक म्हणून काढण्यात येत आहे. या अंकासाठी आपले लेखन साहाय्य हवे आहे. आपल्या आजवरच्या प्रसिद्ध वा अप्रकाशित कवितांपैकी आपली सर्वांत प्रिय कविता आपण पाठवायची आहे. त्याचबरोबर त्या कवितेची जन्मकथाही.' सारडांचे पत्र वाचून मी क्षणभर गोंधळून गेलो. आजवर आपण ज्या कविता लिहिल्या, त्यात नेमकी कोणती कविता आपल्या आवडीची आहे. 'कविता गवताऐसी उदंड' या प्रचारात आपल्या या कवितांना कोण, किती व कसे स्थान देईल याची मला चिंता नाही. कारण गंधवेड्या फुलांनी केवळ फुलायचे असते व इतरांच्या गंधासाठी तिष्ठत बसायचे असते, एवढेच आजही मला ज्या कवितेने आपला परिमल चिरकाल असा आणून दिला आहे, ती कविता मला हवीहवीशी वाटते, सुगंधित होते. ही कविता काळजाच्या एका कोपऱ्यात अजूनही ताजेपणाने रुजलेली आहे. कविता अशी :











*“तुझे नाव लिहिताना*
*भरायचा रंग निळा*
*लाल नक्षी काढताना*
*दाटलेला आर्त गळा*
*तुझे नाव लिहिताना*
*घुमे पारव्याचा नाद*
*मुका जीव घरट्यात*
*खोल जाई पडसाद*
*तुझे नाव लिहिताना*
*केली कागदाची घडी*
*तुडंबशा मनामधे*
*शब्द घेई उंच उडी*
*तुझे नाव लिहिताना*
*रिमझिम डोळियाची*
*शब्द गेला मिटुनिया*
*ओली घडी कागदाची”*

हो कविता ज्या हिरव्या मनातून, प्रेमातून आकार घेत गेली, तो काळ आजही मला जवळचा वाटतो. ‘नवयुग’ दिवाळी १९६४ च्या अंकात ही कविता प्रथम प्रसिद्ध झाली. पुढे ‘क्षितिजा’ या काव्यसंग्रहात तिचा मी समावेश केला आहे. आज या कवितेचे रौप्य-महोत्सवी वर्ष झालेले आहे. तरीसुद्धा ती मला तितकीच नवी, ताजी वाटते. मराठी कवितेच्या वाटचालीत कितीतरी वळणे आलेली आहेत. तिचे आशय, अभिव्यक्तीचे क्षेत्र विस्तारीत झाले आहे. तरीसुद्धा माझी कविता ही या वाटचालीशी समांतरच वाटते. या कवितेने मळलेल्या वाटेवरून जाताना स्वतःची वाट मला पुढे दाखवून दिली आहे. कवितेच्या क्षेत्रात मी अनेक वळणे गिरवली आहेत, पण या प्रत्येक वळणावर मला याच कवितेचा महत्त्वपूर्ण ठसा कायमचा दिसून येतो. ज्या विविध अशा भाववृत्ती जोपासल्या, त्या मी या कवितेतूनच चिंब करून कलाबद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. मी कवितेवर मनसोक्त प्रेम केले ते याच कवितेमुळे. इतरांच्या कवितेवर अलोट प्रेम करण्याची किमया मला जी मिळाली ती देखील याच कवितेमुळे. अशी ती मला ‘हृदयस्वामिनी’ वाटते.

‘नवयुग’ दिवाळी १९६४ च्या अंकात आपण ही कविता स्वीकारत आहोत या आशयाचे पत्र जेव्हा सौ. शिरीष पै चे आले, तेव्हा मी किती सुखावलो हे आजही मला आठवते. कलानंद हा अनिर्वचनीय असतो. निर्मितीचा आनंद शब्दातीत असतो, तर प्रत्यक्ष कलाकृती पुनः पुन्हा वाचताना मिळणारा आनंद हा कालातीत असतो. तरीसुद्धा कवितेला कुठल्याना कुठल्यातरी

कालाने जखडलेले असतेच. खरे तर स्वतः कवीच या कालाशी बहुतांशी जखडलेला असतो. इ.स. १९६४ हे साल माझ्या जीवनात एक संक्रमण घडवून आणणारे होते. दारिद्र्य हे माझ्या जीवनात या वेळी पाठशिवणी होऊन आलेले. त्यात माझ्या आयुष्यात ज्यांनी मला आधार दिला त्या आजोबांचा या वर्षी मृत्यू झाला. मी हैद्राबाद येथे विवेकवर्धिनी शाळेत अध्यापक होतो. वय तारुण्याच्या सीमेवर स्थिरावलेले असल्याने प्रेमाकडे अधिक आकर्षक झालेले होते. एका स्वच्छंदवादी मनाने मी हे प्रेम टिपत होतो. कवितेकडे पाहणे असेच निर्भरशील वृत्तीचे होते. मी जेव्हा आयुष्यातील सुख-दुःख आणि प्रेम आपलेसे करतो तेव्हा एका अर्थाने कविताच माझी व मी तिचा झालेला असतो. ही सवय मला या काळापासून जडलेली आहे. आज जेव्हा मी या काळातील कविता वाचतो, एकांतात पुन्हा एकट्याने वाचतो, तेव्हा मी कधीच माझा राहत नाही. हे उफाळून आलेले प्रेमच या कवितेचे प्रेम असते. चांगली कविता ही नेहमी पुनःप्रत्ययाचा आनंद देत असली तरी, तीत आत्मप्रत्यय असल्याशिवाय हा आनंद दुर्मिळ असतो, हे तितकेच खरे आहे. आत्मप्रत्ययातून आलेली कविता ही प्रासंगिक असेल, स्थूलता देणारी राहील, परंतु तिच्या अंगभूत मर्यादेचा परीघ हा कलेची त्रिज्या विस्तृत करणारा असेल. ही कविता संकेतबद्ध प्रतिमांनी व्यापलेली कारागिरी असली तरी तिच्या आत कुठेतरी कलाकृतीचा अक्षय सूर लपलेला असतोच. मी या काळात विविध कवींच्या कवितांवर एवढे प्रेम केले की या प्रांतात स्वतःच एक प्रेमवीर होऊन गेलो. या प्रेमाची कविता होताना, प्रेम हीच कविता झाली. जे वय प्रेमासाठी आकर्षण होते, तेच वय कवितेचे आकर्षण झाले. माणूस जेव्हा प्रेमात पडतो तेव्हा त्याला काय होते? या प्रश्नाचे उत्तर मराठी कवितेच्या उगमापासून ते आजच्या तिच्या विविध अशा प्रवाहापर्यंत कुणालाही देता आले नाही. या प्रश्नाचे उत्तर कवीची प्रेमकविता तरी देते का, याचाही अंदाज सांगता येत नाही. फुलाला आपला सुगंध वाटता येत नाही, घेता येतो. सतारीचे बोल ऐकावेच लागतात. स्वर हे अनुभवण्यासाठी मैफल गाजवितात आणि चित्र हे डोळ्याने पाहावे लागते. प्रेमकवितेचा नव्हे कुठल्याच चांगल्या कवितेचा उगम सांगता येत नाही. अशी कविता ओघवत्या प्रवाहाप्रमाणे वाहाते, गतिमान होते आणि एका व्यापक प्रवाहात आपले विसर्जन करते. मी या भूमिकेने शाळेत अध्यापन करताना कवितामय झालो होतो. एका अनामिक प्रेमाकडे बांधला गेलो, एक हुरहुर माझ्या दैनंदिन जीवनात व्यापून गेली. मला काय होते हे सांगता येत नव्हते आणि जे होत होते ते सहनशील नव्हते. मी वर्गात शिकवीत होतो आणि माझ्यात असलेली कविता मला शिकवत होती. अशाच एका थरथरत्या क्षणी आकाशातून अनाहूतपणे तारा खाली निखळावा तसे मी लिहून गेलो–

*तुझे नाव लिहिताना*
*भरायचा रंग निळा*
*लाल नक्षी काढताना*
*दाटलेला आर्त गळा*

आणि जुईची वेल अंगच्या फुलाने सबंध मोकळी व्हावी तशी समग्र कविता लिहून मी

मोकळा झालो. मला 'शब्दांनो मागुते या' असे म्हणण्याची वेळ आली नाही. फुलांची ओंजळ गंधामुळे कृतार्थ व्हावी तसे या कवितेमुळे तिचा कागद कृतज्ञ झाला. वस्तुतः कागद आणि कविता यांचे नाते फूल आणि गंध या सारखे अद्वैत असते. अमूर्त कविता कागदावर मूर्त होते या कवितेत अवतरणारा भावानुभव त्या कागदामुळे साक्षात होतो. 'तुझे नाव लिहिताना' या शब्दांचे पुनरावर्तन एका नव्या संवेदनाची निर्माणक्षमता होताना जणू काय हा कागद मला अप्रूप झाला होता. कापऱ्या अंगाने मी एका प्रेमाचा अविभाज्य भाग होऊन गेलो. माझी क्रिया ओथंबून गेली होती आणि नेमकी प्रतिक्रिया विरुद्ध दिशेने घाव देत होती. प्रेम आणि मी, कविता आणि कागद ही द्वंद्वे एकातून वेगळी जात होती : मी मात्र पुनः पुन्हा नाव लिहीत होतो

*तुझे नाव लिहिताना*
*केली कागदाची घडी*
*तुडुंबशा मनामधे*
*शब्द घेई उंच उडी*

अंधाऱ्या खोलीत एका कवडश्याने लख्ख व्हावे तसा मला भावानुभव लख्ख करीत होता. आपण काय लिहिले, कसे लिहिले याचे भान राहिले नाही. जणू काय तो भावानुभव कागदावर सलगपणे, अनाहूतपणे साकार होत होता. लाल नक्षी, निळा रंग, दाटलेला आर्त गळा पारव्याचा नाद, घरट्यातला मुका जीव, तुडुंब भरलेले मन, कागदाची केलेली घडी या साऱ्या एका मागोमाग येणाऱ्या भावावस्था कवितेशी सुसंगत नाते जोडीत होत्या. मी या कवितेने ओढला गेलो, कवितेत ओढला गेलो आणि म्हणून कागदावर तिला आकार देताना कसलीच ओढाताण झाली नाही. संवेदना, भावना, कल्पना, प्रतिमा आणि विचार यांचा ओघ क्रमश येताना तो शेवटी भावानुभवाचा एक भाग होऊन गेला आणि मी उरलो तो असा

*तुझे नाव लिहिताना*
*रिमझिम डोळियाची*
*शब्द गेला मिटोनिया*
*ओली घडी कागदाची*

चांगली कविता मौन असते, चांगली निर्मितीदेखील मौन असते आणि या कवितेचा आस्वाद देखील मौन असतो. कवितेतील शब्द हे मौनी असल्याने ते शब्दबंबाळ होत नाहीत अशा कवितेला पुन्हा सस्कार करण्याची गरज काय ? प्रेम हे एकदाच जडते आकार घेते. ते प्रसंगी एकेरी असले तरी एकव्रतासारखे असते. कवितेवर केलेले संस्कार शब्दांशी केवळ तडजोड करतात. ही तडजोड भावानुभव दुभंगवून देते. भावानुभव ही कवीची वृत्ती असल्याने या कवितेचे वृत्त हे त्या वृत्तीशी एकजीव झालेले असते. भावानुभवास ओघ असतो. शैली नसते. या भावानुभवाचे चिंतन हेच पर्यायाने शैलीचे चिंतन असते. इथे एकाने मागून यावे, दुसऱ्याने पुढे जावे असा क्रम नसतो. सारे कसे आपोआप एकसंध होऊन जाते. आपण कवितेत



अनुक्रमणिका







शब्दांचे वाचन करतो, म्हणजे या भावानुभवाशी नाते जोडतो ना? शब्दातून शब्दातीत कल्पनेतून कल्पनेपलीकडे तशी भावनातुर असलेली पण भावनेत विरघळलेली कविता ही एक मूर्तानि घडवलेली एक अमूर्त प्रत्ययकारिता असते. तिला विशिष्ट वृत्त, छंद, शैली किंवा शब्दसामर्थ्य मुळी नसतेच. एका ओघाने दुसऱ्या ओघाकडे यावे आणि दुसऱ्याने पुन्हा पहिल्या ओघात मिसळावे एवढेच या कवितेला माहीत असते. कवितेचे सांकेतिक रूप, तिच्या वेळचे स्वच्छंदवादी वातावरण हे समीक्षेची भाषा होऊन आले तरी ती प्रत्येक कवीच्या जीवनाशी एकरूप झाल्याने या कवीची एक अटळ अवस्था असते. ती कधीच इतिहास जमा होणारी नाही. कवीला इतिहास असतो, कवितेलाही कुठलातरी इतिहास दाखविता येईल, परंतु त्यातील भावानुभवाचा इतिहास कसा सांगता येईल? म्हणून या वेळचे वातावरण हे A Thing of beauty is a joy forever या अनुभवाने समृद्ध होणारे असते. चांगल्या कवितेतून साक्षात होणाऱ्या भावानुभवास आदी आणि अंत नसतो. फांदीवर फूल देठातून उमलते आणि सुगंधित होते, एवढेच दाखविता येईल.

या कवितेचे स्वागत प्रथम सौ. शिरीष पैंनी केले. कविता मनापासून आवडल्याचा निर्वाळा दिला. दिवाळी अंक वाचून अनेक सुहृद मला विचारू लागले, यातील 'तू' कोण? कै. गुरुवर्य भालचंद्र कहाळेकरांनी या कवितेवर माझ्या पश्चात सुरेख भाष्य केले. तिचे संकीर्ण स्वरूप उकलताना मी स्वतःच घायाळ झालो. पारध्याने धरलेला नेम महत्त्वाचा असतो. तो चूक की अचूक याला महत्त्व नाही. नेमबाजीत बाणाचा होत असलेला प्रवास, ज्या परिसरातून जातो, तो या बाणामुळे कृतार्थ झालेला असतो. आज जेव्हा मी 'तुझे नाव लिहिताना' ही कविता वाचतो, तेव्हा माझ्या भूतकाळाचे रूपांतर वर्तमानकाळात झालेले असते आणि भविष्याकडे लागलेले डोळे यामुळेच तेजःपुंज झालेले असतात. माणसाला बालपण, तारुण्य आणि वार्धक्य या अवस्था असतात. कविता मात्र या अवस्था ओलांडून ताजीतवानी व चिररुचिर झालेली असते. ती लक्षात राहते ती छंदामुळे, वृत्तामुळे किंवा मुक्तछंदामुळे नव्हे, तर तिच्या अंतर्यामी असलेल्या कलापूर्ण आशयामुळेच. अशी एखादीच कविता कवीचा न संपणारा एक विरंगुळा होऊन जाते. एरवी तिची निर्मिती प्रेरणा, बैठक आणि पार्श्वभूमी यांना काहीच अर्थ नसतो. केशवसुतांच्या 'व्यर्थी अधिकच अर्थ असे' यातून हे तर सुचवायचे नाही ना?

(प्रा. मधु जामकर 'दिलासा', स्नेहनगर, परळी वैजनाथ, ४३१ ५१५)










# नटासाठी पार्श्वसूचना

वसंत आबाजी डहाके

*पडदा उघडला जाईल तेव्हा रंगमंचावर काळोख असेल.
तुला त्या काळोखात चाचपडत चालावं लागेल. मग रंगमंच हळूहळू
उजळत जाईल. तुझ्या चेहऱ्यावर, हातांवर अंधुक पिवळसर उजेड पसरलेला असेल.
रंगमंचामागे कोणीतरी काचेच्या रिकाम्या बाटलीत फुंकर मारील, कोणी
पितळेच्या चकत्या जमिनीवर सांडील. तोपर्यंत तू चाचपडत रंगमंचाच्या
मध्यावर पोचलेला असशील. तुला नीट चालता येत नाही आणि मधून मधून जो
ठकठक आवाज येतो आहे, तो तुझ्या एका पायाचा आहे
हे स्थापित झालेलं असेल. तू उभा असताना तुझी केवढी तरी मोठी सावली
मागच्या पांढऱ्या पडद्यावर पडलेली असेल. तू चाचपडत चालणारा आहेस,
तसाच तू चाचरत, अडखळत बोलणाराही आहेस. आणि तू एका ठिकाणी उभा
असताना स्थिर राहू शकत नाहीस, तुझे हात थरथरत असतात
हेही दिसेल. तसा तू मध्यावर उभा असताना आमच्याकडे हळूहळू वळशील
तेव्हा तुला डोळे नाहीत, तर त्या ठिकाणी नुसत्या खाचा आहेत, असं दिसेल.
तू हळूहळू हात वर करशील आणि याचकाप्रमाणे तुझे तळहात उघडशील. ते थरथरत
असतील. आता आसपास कसलाही आवाज नसेल. तुलाच आता बोलायचं आहे.
तू ओठ उघडशील, मिटून घेशील, पुन्हा उघडशील. शब्द येत नाहीत, घशातून
अस्पष्ट घरघर निघते आहे, असं जाणवेल. मग तू हसण्याचा प्रयत्न करशील. चेहरा
क्षणभर वेडावाकडा होईल. तुला हसता येत नाही आहे. मग तू एकदम जबडा
उघडून बोलू पाहशील. अर्थहीन, कर्कश आवाजाचा एक तुकडा. रंगमंचामागे समूह
पुटपुटू लागेल. ते सामूहिक पुटपुटणं विधिनाट्यासारखं असेल. मग तुझा चेहरा
खूपच पिळवटेल आणि जबरीनं काढावा तसा तू एक शब्द बोलशील.
तू म्हणशील : "या शतकांत..."
पुढं तुला दुसरा शब्द उच्चारताच येत नाही. तुझा चेहरा, तुझे दोन्ही हात
वेडेवाकडे होत आहेत. तुझ्या छातीत तो शब्द अडकून पडला असावा. वर निघतच
नाही. तुझा चेहरा घामानं थबथबून गेलेला असेल. दुसरा शब्द बाहेर येतच नाही.
तुझे हात वळवळतील. तू थकून उभा असशील. मागच्या पडद्यावरची तुझी सावली*



अनुक्रमणिका






*विरून गेलेली आहे. तिथं एक चेहरा उगवेल. दगडासारखा निर्विकार. मग दुसरा.*
*तिसरा. चवथा. पाचवा. त्यांच्या पापण्या हलत नाहीत. स्थिर नजरेनं ते*
*तुझ्याकडे पाहत आहेत. तुला स्तब्ध करण्यासाठी ते आलेले आहेत.*
*पण तू तर स्वतःच स्तब्ध होऊन गेलेला आहेस.*
*आता तुला बोलायचं आहे. बोल.*

१९६० पासून आजतागायत बऱ्याच कविता लिहिल्या. त्यांचे दोन संग्रह झाले. काही तिसऱ्या संग्रहाची वाट पाहत आहेत. एवढ्या कवितांमधून 'सर्वात प्रिय कविता' निवडणे कठीण आहे. काही बऱ्या आहेत, काही ठीक आहेत, काही आठवत नाहीत. या पलीकडे काही बोलता येत नाही. काही कविता लक्षात राहून गेल्या आहेत. त्यांपैकी एक आत्ता निवडली आहे. 'नटासाठी पार्श्वसूचना' हे या कवितेचे नाव. 'शुभवर्तमान' या संग्रहात आहे.

ही कविता कशी सुचली या विषयी विचार करताना तीन-चार ठळक गोष्टी आठवल्या. एकतर, आमचा नाटक करणाऱ्यांचा एक ग्रुप होता. हौशी, तरुण मुले एकत्र येऊन काही नवे, निराळे करावे असे सुचवीत होती. तोपर्यंत नाटकाची पुस्तके वाचणे आणि वर्षातून एखादा नाट्यप्रयोग पाहणे या पलीकडे नाटकाशी काही संबंध नव्हता. नाट्यसंहितांबरोबरच रंगभूमीविषयक सिद्धांतांचे थोडे वाचन केले होते आणि त्या विषयात रसही होता. मग प्रत्यक्ष प्रयोग करायचा म्हटल्यावर अनेक गोष्टी सुचत गेल्या. संहितालेखनापासून रंगमंच व्यवस्थेपर्यंत विविध विषयांवर पाठ घेण्याचे काम मी स्वतःकडे घेतले. हे पाठ रस्त्यावर, चौकात, तालमीच्या जागी किंवा चहाच्या हॉटेलात कुठेही मिळेल तेवढ्या वेळात घेत असे. ग्रुपमधल्या मुलांचे विचार आणि कल्पना समजत आणि त्यांच्या व आपल्या विचारांना, कल्पनाशक्तीला चालनाही मिळे. नाट्यसमूहातल्या या वातावरणाचा प्रस्तुत कवितेवर गडद प्रभाव आहे.

आमचा एक विद्यार्थी होता. तो कविता लिहायचा, वाचायचा. आता तो विद्यार्थीप्रिय प्राध्यापक आहे. त्याला साधे बोलणेदेखील महाप्रयासाने करावे लागे. एखादा शब्द उच्चारायचा तर सगळा जीव गोळा करून तो उच्चारतो आहे असे वाटे. चेहऱ्याच्या सगळ्या नसा ताणलेल्या दिसायच्या. कविता ऐकवतानाचा त्याचा चेहरा मनात चित्ररूपाने राहिला.

मला पुष्कळदा वाटायचे की, त्याच्यासाठी, तो प्रमुख पात्राच्या रूपाने वावरू शकेल असे एखादे छोटेसे नाटक लिहावे.

अशातच एका सकाळी वृत्तपत्र आले. ते उचलून पाहिले तर काही जागा रिकाम्या, अग्रलेखाची जागा कोरी, काही जागा काळ्या केलेल्या. दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या दिवशीही असाच प्रकार. काही साप्ताहिके, मासिके. एक कथामासिक होते, त्यातली पानेच्या पाने काळीकुट्ट. एक प्रख्यात समाचार साप्ताहिक होते. तिथेही असाच प्रकार.

दुसऱ्याच दिवशी सहज लक्षात येणारा प्रकार म्हणजे, सापडेल त्या मोकळ्या जागांवर

अवाढव्य अक्षरात घोषणा लिहिलेल्या. त्यानंतर कुठेही गेलो तरी काही शब्दांनी डोळ्यांचा पाठलागच सुरू केलेला होता. आणखी सहज लक्षात आलेली गोष्ट म्हणजे लोकांचे उंच आवाजात बोलणे एकाएकी नाहीसे झाले.

आपल्याकडे काही काळासाठी हा जो काही प्रसंग आलेला होता त्याच्या योग्यायोग्यतेविषयी अनेकांनी नंतर चिकित्सा केलेली आहे. तो आपल्या अनुभवाचा एक विषय होता यात काही शंका नाही. घुसमटून जावे, श्वासात अवरोध निर्माण व्हावा असे काहीसे वातावरण आपल्या अवतीभवती आहे असे वाटायचे. त्यात भर म्हणजे मानस-शारीर अशा एका किरकोळ व्याधीचा उपसर्गही मी त्या वेळी अनुभवत होतो.

हे सगळे वेगवेगळे अनुभवघटक या कवितेत एकत्र आले. ते नेमके एकत्र कसे आले या विषयी काही सांगता येत नाही. परंतु आपल्याला काही म्हणायचे आहे आणि ते म्हणता येत नाही असा एक अनुभव या कवितेतून व्यक्त झालेला आहे आणि त्याचा संदर्भ समकालीन दडपशाहीशी निगडीत आहे. "...तुला डोळे नाहीत, तर त्या ठिकाणी नुसत्या खाचा आहेत..." या ओळीत भागलपूर प्रकरणाचा प्रतिध्वनी उमटलेला आहे. त्या काळातल्या एका समाचार साप्ताहिकातून तालुक्याच्या गावातल्या एका पत्रकाराला स्तब्ध करण्याबाबतची क्रूर सत्यकथा प्रकाशित झालेली होती. खीळमुद्रित अथवा चक्रमुद्रित पत्रके, पाठवणाराचे नावगाव नसलेली, येत असत. सुरक्षित आयुष्याला नुकतीच सुरुवात केलेली असल्याने ती उघडून वाचण्याचे भय वाटायचे.

मग जे काही नाटक लिहायचे म्हणत होतो, ते या कवितेच्या रूपाने व्यक्त झाले. कवितेची सुरुवात एखादे नाटक लिहावे तशी केलेली आहे. नाटककार नेपथ्य, प्रकाश या विषयी कंसात सूचना लिहितो, तसेच पात्रांनी प्रवेश केव्हा, कसा करायचा, त्याने आपला संवाद केव्हा सुरू करायचा वगैरे. याच पार्श्वसूचना होत. नाटकाच्या संहितेत या गोष्टी वस्तुनिष्ठ पातळीवर सांगितलेल्या असतात. येथे रंगमंचावर वावरायचे असलेल्या पात्राला उद्देशून कवी बोलतो आहे. कदाचित ते पात्र म्हणजे तो स्वतःच, त्याचा 'स्व' असेल.

या कवितेत रंगमंच-नाट्यप्रयोग यातल्या बऱ्याच गोष्टींना 'व्यंगार्थ' प्राप्त होतो. रंगमंचावरला काळोख. त्यानंतर येणारी सूचना : 'चाचपडत चालावं लागेल' ही सावधगिरीची सूचना नसून वस्तुस्थिती स्पष्ट करणारी आहे. मग रंगमंच उजळत असताना चेहऱ्यावर, हातांवर अंधुक 'पिवळसर' उजेड पडेल असे म्हटले आहे. या शब्दातून अशुभाची आणि रोगग्रस्ततेची जाणीव होते. काचेच्या बाटलीत फुंकर आणि पितळी चकत्या भय निर्माण करणारे आवाज सुचवतात. हा नायक अधू आहे. त्याच्या लाकडी पायाचा ठकठक असा आवाज येतो. प्रकाशयोजनेच्या साहाय्याने 'केवढी तरी मोठी सावली' मागच्या पडद्यावर दाखवता येते. नायकाची सावलीच लक्षात येते असे नाही, त्याचे अधू असणे, थरथरणे, स्थिर न राहता येणेही कळते

त्याला बोलायचे आहे. रंगमंचावर पात्र आले की, काही क्षणातच त्याने बोलावे ही अपेक्षा



अनुक्रमणिका

असते. सगळे आवाज बंद झालेले आहेत. त्याचेही वजन येतेच. पण त्याला बोलता येत नाही. त्याला काय मागायचे आहे, काय सांगायचे आहे काय म्हणायचे आहे हे कळत नाही. विधिनाट्यासारखं पुटपुटणं त्याला बोलायला भाग पाडतं. तो ईश्वराला उद्देशून काही बोलत आहे की काय ? याचकाप्रमाणे तळहात उघडून तो काही मागतो आहे. 'या शतकात –' बस. तो थांबतो. पुढे काय ? या शतकात काय ? दुःख, भय, क्रौर्य, हिंसा, जुलूम – काय ? काय सांगायचे आहे ? की सांगायची काही गरजच नाही – ? तो आपल्यासमोर आहे. त्याचा एक पाय कुठे गेला ? डोळ्यांचे काय झाले ? तो चाचरत आहे ते का ? हे आपल्याला समजून घ्यायचे आहे का ? मग 'या शतकात' एवढेच शब्द तो उच्चारतो आणि पुढे काहीही बोलत नाही. किंबहुना एवढेच उच्चारून तो पार थकून गेलेला आहे. पण पुढे बोलायचे आहे. तो बोलणार आहे किंवा नाही ते माहीत नाही. पण त्याने बोलायचे आहे हे मात्र निश्चित.

रंगमंचावरील विविध घटकांचा काव्यसामुग्री म्हणून इथे उपयोग करण्यात आलेला आहे. ती सामुग्री काव्यानुभवाने भारलेली होते. एका शब्दाचा उच्चार करण्यासाठी अतिशय प्रयास करणारे, घामाने थबथबून गेलेले एक अधू पात्र आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते. ते रंगमंचावर असेल अथवा आपल्या आंतर रंगमंचावर असेल.

पार्श्वसूचनांचा रचनाबंध या कवितेसाठी अगदी सहजतेने आलेला आहे.

ही कविता एकाच बैठकीत पूर्ण केली होती. 'योगभ्रष्ट' ही दीर्घकविता सोडल्यास बहुतेक कविता सलग एका बैठकीत एकतानतेने लिहिल्या गेल्या. 'सर्वत्र पसरलेली मुळं कावळे' या दीर्घकवितादेखील एकाच बैठकीत लिहिल्या. कविता लिहून झाल्यानंतर एखादा शब्द बदलणे, एखादी ओळ मागे पुढे करणे यापलीकडे फारसे बदल करीत नाही.

वृत्त, छंद, शैली या बाबतीत या कवितेच्या संदर्भात काही विचार केलेला नव्हता. 'पार्श्वसूचना' हा प्रकार या कवितेला सहज मिळाला. संपूर्ण कविता वाचल्यानंतर एक लघुनाटक वाचत असल्याचा अनुभव येतो. मुक्तछंदात लिहिलेले छोटेसे नाटक. त्याचा प्रयोग पाहत असताना जो अनुभव आपल्याला येऊ शकेल तोच अनुभव ही कविता देते असे माझे मत आहे. कविता आणि नाट्यप्रयोग यातला फरक हा की यातल्या सूचनावजा ओळी केवळ सूचना देणाऱ्या नाहीत. त्या स्वतःच 'कृतिरूप' आहेत. स्तब्ध करण्यासाठी आलेल्या क्रूर चेहऱ्यांनी वेढलेल्या चतकोर जागेत सगळे शरीर ताठ ठेवून निर्भयपणे बोलणे फार कठीण आहे.

आणि तेच त्याला करायचे आहे. साऱ्या भयापासून मुक्त होऊन त्याचा शब्द त्याला उच्चारायचा आहे. हा या कवितेचा 'आशय' आहे असे म्हणता येईल.

ही कविता 'सत्यकथे'त प्रकाशित झाली होती फेब्रुवारी १९८२ च्या अंकात.

काही वाचकांनी कविता आवडल्याचे खाजगीत सांगितले होते.

पुष्कळांना ती कविता नव्हे असेही वाटले असेल. गद्य आहे. पण हे 'गद्यकाव्य' नव्हे.

कविताच आहे. तिच्यातली अंतर्गत लय सहज जाणवते. यमकेही सहजच आलेली दिसतात.

या कवितेतून आपला काळ, आपल्या काळातील उच्चाराची दडपणूक, अतिप्रयासाने उच्चाराची चाललेली घडपड या गोष्टी जाणवतात. म्हणून माझ्या लक्षात ती राहिली असावी.

या कवितेतला 'मी' स्वतःला 'तू' असे संबोधून बोलतो ही गोष्टदेखील मला आवडलेली आहे.

आता ही कविता वाचत असताना या कवितेत एक प्रचंड ताण एकवटलेला आहे असे जाणवते. शेवटच्या शब्दात तो सुटत नाही. अधिकच वाढतो.

(वसंत आबाजी डहाके, २४ न्यू शेल्टर, बी रोड, चर्चगेट, मुंबई २०)

# शिलालेख

बा. ह. कल्याणकर

मला आवडणारी कविता आणि त्या कवितेची प्रेरणा या संबंधी काही लिहिणं तसं खूप अवघड आहे. श्री. शंकर सारडा यांनी हा विषय महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या दिवाळी अंकासाठी कळविला आणि मी त्या संबंधी विचार करू लागलो. स्वतःच्या कवितेसंबंधी परीक्षण करणं ही महत्त्वाची गोष्ट यामुळे घडत आहे.

माझे १९८० पासून 'उठाव', 'जागल', 'माळझरे', 'तांबडं फुटलं' हे कवितासंग्रह प्रकाशित झाले. त्यातील काही कविता विविध अभ्यासक्रमालाही लागल्या. आता 'शिलालेख' हा कवितासंग्रह प्रकाशित होत आहे. या पाच कविता संग्रहांव्यतिरिक्त आणखी एका कविता संग्रहाच्या कविता आहेत. या सर्व कवितांच्यापैकी आवडणारी अशी एक कविता काढणं मला अवघड आहे. गवताच्या गंजीतून सुई शोधून काढण्यासारखं हे काम अवघड आहे.

मी कविता करतो याचा माझ्यादृष्टीने असा अर्थ आहे की मी माझ्या भोवतीच्या जीवनाचा विचार करतो. माझ्याभोवती अस्तित्वात असलेल्या जगाचा माझ्या जाणिवेवर जो बरा-वाईट परिणाम होत असतो तो माझ्यासाठी जेव्हा अपरिहार्य असतो, तेव्हा मी त्या दिशेनं विचार करतो. माझ्याभोवतीच्या जीवनासंबंधी मला खूपखूप ओढ आहे. त्या जीवनाच्या आणि जीवनातल्या विविधतेमुळे मी आनंदी होत असतो. आपल्या भोवतीच्या जीवनात प्रचंड सौंदर्य आहे. तसंच त्या जीवनात कुरूपताही तितकीच आहे. या दोन सत्य बाबींचा प्रतिभेवर जेव्हा खोलवर ठसा उमटतो, तेव्हा चिंतनाचे झरे आपल्यात झुळझुळायला लागतात आणि मग कवितेचा ओढा आपल्यातून वाहायला लागतो. कविता करणं म्हणजे त्याआधी विचार करणं आलं. ज्या कवितेच्या मुळाशी मानवी जीवनातील वास्तव सत्यासंबंधीचं चिंतन नाही आणि

विचार नाही ती कविताच नाही अशी माझी कवितेसंबंधी भूमिका असते. जीवनातील मूलतत्त्वांची बैठक कवितेला असली तर ती आणखी गहिरी होते.

तुम्ही का लिहिता ? तुमच्या लेखनाच्या प्रेरणा कोणत्या ? अशा स्वरूपाचे प्रश्न लेखक आणि कवींना पुन्हा पुन्हा विचारले जातात. आणि ते खूप रास्त आहेत. लेखनातून लेखक जसा कळतो तसा लेखकातून त्या लेखनातला माणूसही कळतो. माणूस समजून घेणं ही फार चांगली गोष्ट आहे. लेखन म्हणजे माणसाचा माणसानं घेतलेला सततचा शोध असतो. हा शोध जितका आनंददायी तितकाच कष्टप्रद असतो. तरी तो हवाहवासा आणि सारखा जपावा असा असतो. त्याची मुळं जीवनातील वास्तवात रुजलेली असतात. जीवनातील वास्तवाला समजून घेण्याची माणसाची जिज्ञासा त्याच्या जन्मापासूनची आहे. हा माणसाला त्याच्या जन्माचा एक शाप आहे आणि हा शाप त्याला वरदान ठरत आला आहे. शापाचं वरदानात रूपांतर करणारा महान प्राणी या पृथ्वीवर कोण असेल तर तो मानवप्राणी आहे. त्याला असलेल्या विचार करण्याच्या सामर्थ्यातून मानवानं निसर्गात माणसातील आणि माणसातला नवा निसर्ग निर्माण केला. त्यालाच संस्कृती म्हणतो. सतत नवं निर्माण करणं हे माणसाचं दुसरं नाव आहे. विचार करण्याएवढा दुसरा भयंकर रोग नाही, असं आजचं सारं वास्तव आपल्या अस्तित्वावर चवताळून उठलं आहे. अशा वेळी पुरुष आणि स्त्री ही मानवी संस्कृतीची दोन चाकं एकमेकांना साथ देतात. सुखावतात. ते आपल्यातील गरजांच्या अस्तित्वातून त्यांचा 'शिलालेख' निर्माण करतात. प्रेम हा माणसांचा सततचा श्वास आहे. माणसाच्या जीवनात प्रेम नसेल तर माणूस म्हणजे निव्वळ दगडी इमारतीचा सांगाडा ठरेल. मी माझ्या 'शिलालेख' या कवितेत असा विचार करताना लिहू लागतो.

*"समुद्र असतो उफाळलेला आकाश भरून*
*आणि तुझ्या आठवणींचा पाऊस माझ्या अंगणभर*
*हा केवढ्याचा पाऊस असतो तुझा-माझा*
*आणि ढगांच्या डोळ्यांनी रडणारा मी*
*माझ्या समोरील या कोऱ्या कागदाला*
*लागलेली असते केवढी*
*तुझ्या माझ्या अश्रुंची तहान*
*ही असते माणसाला लागलेली माणसाच्या*
*प्रेमाची भूक– माणसापासुनची– आपल्यापर्यंत*
*ही भूक म्हणजेच माझी तुझी कविता*
*असते. जीवनाच्या अस्तित्वालाच असतो प्रिये मरण्याजगण्याचा अर्थ*
*माझी कविता उतरते तुझ्या*
*आठवणींच्या कागदावर पाय ठेवत*

ती उतरते अनेक भुकांचा हिशेब घेऊन–
तुझ्या माझ्या त्वचेच्या पारड्यात दरवळणारे
सारखे हे आदिम शतकाचे गंधच गंध
तू आणि मी त्या गंधांचं नाव असतो– !
रूप असतो आणि असतो श्वासही त्या गंधांचा !
बाहेर कोसळतोय पाऊस आणि पाऊसच फक्त
तुझ्या पावसाळ्यातल्या त्या भेटी आत ओल्या-ओल्या
आता तुझ्या आणि माझ्या भेटी असतात
फक्त कागदावर
अश्रूंचं गावच्या गाव येते वस्तीला माझ्या
या कागदावर
माझा कागद आहे जसा जमिनीचा तुकडा
इथं ओघळणाऱ्या प्रत्येक अश्रूसाठी !
पाऊसच पाऊस तुझा–
अश्रूंच्या आयण्यात स्वतःला डुंबवून घेणारं अंगण
आणि हा मी !
हे सारं सार माझ्याजवळ असतें !
फक्त आज तू नाहीस
माझ्या कवितेच्या कागदाचा हा तुकडा
नसतो, फक्त कागद
प्रिये, अश्रूंचं बी पेरावं असं हे
माझं तुझं पांढरं वावर असते–
त्यात आपण पेरत आहोत
आपल्या अंतःकरणातलं पृथ्वीचं गाणं !
आपण म्हणजे प्रिये माणसांची खूप सनातन
अंधारजलानं तुडुंब अशी विहीर
ही विहीर– ते पृथ्वीचं गाणं
आणि माती
हे सारं, असतं तुझ्या-माझ्या प्रेमाचा
शिलालेख–
आदिम युगापासून ते माणूस थांबेल त्या दिवसापर्यंत
रोजचा नवा ताजा 'शिलालेख' ! !

कविता मी अलिकडेच लिहिली आणि ती मला विशेष वाटली. ती का वाटली ? असा प्रश्न कलावंताना जरुर करावा पण त्या अगोदर वाचकांनी ती कविताच अंतःकरणपूर्वक स्वतःच्या जाणिवेत विरघळून घ्यावी. मग ही कविता विशेष वाटण्याचं कारण ही कळेल आणि त्या कवितेचं कार्यही अनुभवाची उत्कटता जशीच्या तशी थेट पोचणं हे इथं महत्त्वाचं.

आपल्याकडे साहित्यावर आणि अक्षर वाङ्मयाच्या निर्मितीवर उगाचच अलौकिकतेचा वर्ख लेपला गेला आहे. हा वर्ख हा लेप मला कधीच वास्तववादी वाटलेला नाही. साहित्य मग ते कोणत्याही प्रकारातलं असो वा आवरणातलं असो. त्यातला माणूस अधिक सच्चा, अधिक गहरा, अधिक खोल आणि जीवनात अवतीभवती दिसणारा असला तरच ते माणसांचं अक्षरसाहित्य होऊ शकेल. माणसांच्या कातड्यावरचं वस्त्र त्याचं सौंदर्य जरुर वाढवील, त्याच्या तोंडावरची पावडर त्वचेची दिखावट जरुर उजळती कराल. पण अधिक खरी असते ती माणसाची कातडी. त्या कातडीखालचं गरजा घेऊन हुंदडणारं अंगातलं त्याचं रक्त आणि त्या रक्तमांसाच्या अस्तित्वाला आलेला जाणिवांचा मोहर म्हणजे काव्य असतं.

कविता एक अनुभवाचा शोध असते. प्रतिभेला फुलासारखी डवरत येणारी माणसाची जाणीव जितकी अस्सल तितकी ती कविता बावनकशी असते. कवीसाठी कविता म्हणजे त्यानं अनुभवलेल्या अनुभवाची पुनर्निर्मिती असते. वाचकासाठी तो अनुभवाचा नवा शोध असतो. आणि याच अर्थानं माझ्या वरील कवितेकडे बघणं जास्त चांगलं अस मला वाटते.

या माझ्या कवितेत प्रीतीचा भाववेडा रंग आहे. प्रेमाचा पुन्हा पुन्हा झरणारा ओढा आहे. आणि आहे ओढही. ही ओढ बरसणाऱ्या पावसातली जरुर आहे. त्या पावसात केवड्याच्या गंधाच्या मिसळलेल्या सुगंध धारा आहेत. 'तुझ्या-माझ्या' रक्तातल्या भुकेचा शोध आहे. माणसाला माणसाच्या अस्तित्वाची भूक असणारी ही माणूस संस्कृती, ही कविता शोधायला निघते ती प्रेमाबद्दल ते प्रेम निर्माण झालेल्या माणसांच्या उगमापर्यंत. ही कविता पाऊस होत नाही, गीत होत नाही, स्वप्न होत नाही आणि हे सारं तिच्यात असूनही ती तत्त्वज्ञान बनते. हे तत्त्वज्ञान आठवणींच्या कागदावर पाय ठेवत उतरते. त्यात अनेक भुकांचा हिशेब असतो.

माणसाचं प्रेम माणसाइतकंच सनातन आहे या जाणिवेवर कवी आपल्या प्रियेला घेऊन जातो. प्रेयसीच्या बाहूत मिटून जाणारी ही कविता नाही तर प्रेयसीच्या आठवणीनं धुंद होत होत आपल्यातल्या प्रेमाच्या झुळझुळत्या ओढ्याच्या मूळ गावाला प्रियेसोबत पोचणारी ही कविता आहे असं मला वाटतं. कवितेनं तत्त्वज्ञान व्हावं काय ? असा प्रश्न कुणी विचारेलही. मी त्या वादात पडत नाही. वादात थांबणं हे वाद करणाऱ्यांचं काम. कविता निव्वळ तिथं थांबत नाही. ती आहे त्यापेक्षा अधिक पुढे जाते. माणसांना गाणं हा खऱ्या कवितेचा गुणधर्म असतो. आमचे अनेक कवी मित्र सरकारी कमिट्यांवर स्वार होत होत शहरात प्रस्थापित होण्यासाठी शहरातल्या माणसांचं मनोरंजन करणाऱ्या तकलादू रानकविता स्त्रियांच्या लोकगीतातील चाली आणि ओळी चोरून लिहीत राहण्यात आनंद मानतात. शहरातल्या निपुण व्यावसायिकांना रानातलं लालित्य गाणारी ही नार सोन्याचं अंड देणारी आहे हे कळते. शिवाय

प्रस्थापित व्यवस्थेला धक्का देणारा आवाज या कवितेत नसल्यामुळं व्यवस्थावाले आमच्या अशा या कवींना कडेवर घेऊन मस्त धंदा करतात. आमच्या कवी मित्रांनी आपल्या कवितेला असं बाजारात बसवावं हे बरं नाही इतकीच माझी भूमिका आहे. आणि कुणी काय आणि कसं लिहावं हा ज्याचा त्याचा वकुब असतो. ज्याच्या त्याच्या अनुभवावर कमी-जास्त उंचीचं कवितेचं झाड वाढत असते. ज्या कवीचा अनुभव जेवढा दांडगा तेवढी कविता आकाशात उंच वाढते. आणि ज्या कवितेला गंध माणसाचा असतो, श्वास माणसाचा असतो ती कविता ही फक्त उजेडाचं झाड असते. कविता म्हणजे उजेड. कविता म्हणजे आशावादी मनात पडलेलं वास्तवतेचं स्वप्न असते..

माणसाला कवितेनं उमेद दिली पाहिजे. अँटन चेकॉव्हवरील कवितेत म्हणूनच मी म्हटले आहे :

*'जगातल्या साऱ्या लेखकांना मिळून*  
*आता फुलवावा लागणार आहे*  
*सूर्याच्या डोळ्याखालच्या या मातीवर*  
*केळींच्या बागांचा हिरवागार मोसम*  
*जगाला माणसांचं रात्र स्थळ बनवण्यासाठी*  
*चेखोव तुझं आज स्मरण होताना.*

*(प्रा. बा. ह. कल्याणकर. १३ शिवनेरी, सेक्टर एफ. एन. ५, श्रीनगर, सिडको, औरंगाबाद ३)*

# आधार !

शंकर वैद्य

---

*अंधारात काहीतरी वाजले तेव्हा*
*किती घाबरलीस तू ?*
*माझा हात धरून म्हणालीस,*
*'मला भीती वाटते-तू असा जवळ राहा.'*
*'कसली भीती ? मी आहे ना जवळ !'*
*तुला सांगता आले नाही*
*तुझे अंग थरथरत राहिले*
*खिडकीतून तू नुसतीच पाहात राहिलीस, व्याकुळ-*
*प्रथमच जाणवले:*
*चंद्र एकटाच फिरत असतो भयाण पोकळीत_*

*राणी, तू आता शांत झोपलेली आहेस*
*माझ्या आधारावर*
*निवान्त विसावलेले वदन, अश्राप, सुखी*
*केवढा आधार वाटतो आहे तुला या पृथ्वीचा*
*आणि माझ्या अस्तित्वाचा !*
*दारावरून एक निःशब्द अंत्ययात्रा चालली आहे*
*बत्त्यांच्या प्रकाशात*
*-माझा पहारा भाबडा आहे*

*_मी पाहात होतो एक अरण्य*
*सागाची उंचसोट निष्पर्ण पांढरी झाडे*
*निःशब्द श्वासरहित वातावरण*
*आणि तू एकटीच चालली होतीस*
*ओढल्यासारखी*
*दऱ्याखोऱ्यांतून एकटी, भांबावलेली, कावरीबावरी*



अनुक्रमणिका

*'राणी थांब, राणी थांब–,*
*तुला ऐकूच न येणारी माझी मैलोमैल लांब हाक–*
*दचकून मी जागा झालो*
*अंग सर्द*
*अंगावर हात फिरवीत तू म्हणत होतीस,*
*'घाबरू नको ना असा ! मी आहे ना जवळ !'*

माझी 'आधार' ही कविता १० जानेवारी १९६९ या दिवशी मी लिहिली. ती 'बहुदा' त्याच वर्षीच्या 'स्त्री' मासिकाच्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली ! नंतर १९७१ साली प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'कालस्वर' या काव्यसंग्रहात ती समाविष्ट झालेली आहे.

कविता लेखनासंबंधी माझा एकंदर अनुभव असा आहे की एखादी कविता केव्हा-कशी सुचेल आणि लिहून होईल याविषयी खात्रीने काही सांगता येत नाही. एखाद्या वेळी कोणतीही पूर्वकल्पना नसताना ती सुचू शकते. आपण झाकली मूठ उघडावी आणि आत टवटवीत गुलाबाचे फूल असल्याचे दिसावे असा तो चमत्कार असतो. एखाद्या वेळी असेही होते की कविता सुचत सुचत अनेक दिवस मनाशी खेळ करीत मग आकाराला येते. एखाद्या वेळी हा खेळ अनेक वर्षेही चालू राहातो. एखादी कविता सुचता सुचता अर्धी लिहून होते आणि नंतर अशी अपुरी राहाते की मग ती पूर्ण होतच नाही. कधी एखादी कविता भारंभार शब्दांच्या गचपणातून शोधून काढावी लागते आणि उरलेल्या शब्दांचा मोहक भुस्सा कष्टाने फेकून द्यावा लागतो. कवितानिर्मितीच्या अशा नाना तऱ्हा असतात. मात्र अमुक एका पद्धतीने कविता सुचली म्हणजे ती हमखास चांगली असेल असे नाही. एखाद्या वेळी अंगातून सळक जावी इतक्या सहजपणे स्फुरलेली कविता चांगली असू शकते, तशीच कधी ती सामान्यही असू शकते आणि काळजी घेत घडवलेली कविता चांगली उतरू शकते. अचानकपणे स्फुरलेली कविता आपल्याला तिच्या चांगलेपणाचे भान येऊ न देता चांगली असू शकते असेही होते, आणि सर्व तंत्रे सांभाळून लिहिलेली कविता साफ शुष्क स्वरूपाची ठरू शकते. अर्थात सर्व कवींचे अनुभव असेच असतील असे नाही. 'आधार' या कवितेकडे जाताना काव्यलेखनाच्या संबंधातले माझे हे अनुभव सांगून पुढे जाणे इष्ट ठरेल असे वाटल्यावरून येथे त्यांचा उल्लेख व त्यासंबंधी हे थोडे विवेचन केले आहे.

'आधार' ही कविता लिहिल्याला आता एकवीस वर्षे झाली असली तरी ते दिवस मला बऱ्यापैकी आठवतात. मनाला आलेल्या एका नव्या भरतीचे ते दिवस होते. आजवरच्या काव्यलेखनातला माझा अनुभव असा की, आयुष्यात अशा भरतीचे एकेक पर्व येऊन जाते. नंतर काही काळ भाकड स्वरूपाचा जातो. या काळात लेखन जरासे रखडत होते पण कवितेशी जुळलेला धागा तुटलेला मात्र नसतो. काव्याचे वाचन, चिंतन, मूल्यमापन चालू असते आणि











कधीतरी एक नवे वळण सापडून पुन्हा लेखनाला भरती येते.

माझ्या आयुष्यातला १९६०-६२ नतरचा काळ असा भरतीच्या स्वरूपाचा होता. तेव्हा माझे मला नकळत 'काला'ची जाणीव असलेल्या कविता मी लिहू लागलो होतो. तसा बालपणी शाळेत शिकत असताना, मॅट्रिकपूर्व काळात, मी ज्या कविता लिहिल्या होत्या त्यात हा विषय त्या वेळच्या जाणिवेनुसार येऊन गेला होता आणि पुढेही तो विषय माझा पाठपुरावा करीत राहिलाच. (कितीक वर्षे-४-१०-१९५१-कालस्वर)- पण आता मात्र तो वेगळ्या रीतीने भेटत होता आणि कवितांतून प्रकटत होता. 'आधार' या कवितेपर्यंत पोचण्यापूर्वीची माझ्या दृष्टीने महत्त्वाची अशी ही माझी वाटचाल होती. या स्वरूपाच्या माझ्या अनेक कविता 'कालस्वर' (१९७१) या संग्रहात प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्या कवितांचे विशिष्ट स्वरूप ध्यानात घेऊनच त्या संग्रहाला 'कालस्वर' हे नाव मी दिलेले आहे. त्या अनुभवांची थोडी कल्पना द्यायची तर असे सांगता येईल: काळ उलगडतो तसे माणसाचे व्यक्तित्व अंतरंग हळूहळू उलगडत जाऊन कळू लागते पण अखेरीस ते अथांगच राहाते या प्रकारची जाणीव 'तू: वेळा' या कवितेतून व्यक्त झाली होती. (१-१०-६३) कोकिळाच्या 'कुहूऽऽकुहू' च्या तालबद्ध नाद-उद्गारा-मधल्या एका 'कुहू_' नंतर जाणवणाऱ्या निरव अवकाशातून कालाची लाट मनाला स्पर्शून गेली होती आणि याचा आविष्कार 'कुहू_कुहू' या छोट्या कवितेतून घडला होता. 'यायची तू' या कवितेत तिच्या येण्याची वाट पाहाताना-

*यायची तू उलगडे गती रात्रीतून*
*चाळवले कार्तिकाचे वारे मनातून*

असा प्रारंभ होत, रात्रीतून निसर्गाची व मनाचीही अवस्था संथ गतीने उमलत जाऊन पुढे-

*यायची तू फुले मंद कालाचे कमल*
*माझ्या मनाचाच मला आला परिमल*

हा जो आल्हाददायक अनुभव आला त्याचा आविष्कार घडला होता. या अशा काही अनुभूती कालाच्या 'समय' या स्वरूपाशी निगडित आणि प्राधान्याने सुखमय स्वरूपाच्या आहेत पण काळाचे एक स्वरूप भीषणही आहे. हा असा काळही मला नाना स्वरूपांत जाणवला होता. जुन्या घराच्या माडीवरल्या अधाऱ्या माळ्यावर धूळ खात पडलेल्या अनेक वस्तूंच्या आणि जुनाट वास्तूच्या आकारातून हा खाष्ट म्हातारा मला दिसला होता. (खाष्ट म्हातारा). धुण्यासाठी कपडे गाढवावर घालून नेणाऱ्या आणि 'गंजीफ्रॉकवर' नावाच्या खुणा करून ठेवणाऱ्या परटाच्या रूपातून तो मला कधी दिसला होता. (परीटदादा) तर कधी याच विराट शक्तीच्या पावलाशी धडधडणारे मानवी जीवनाचे 'एक भयाचे नगर' ही दिसले होते.

यालाच जोडून सांगावयास हवी अशी एक गोष्ट म्हणजे माझ्या मनात काय उलथापालथ घडत होती कळत नाही पण आयुष्याच्या या कालखंडात मला सतत काही स्वप्ने पडत होती. त्यातल्या अनेकांचे आकार छोट्या कथांचे वा कवितांचे आहेत हे ध्यानात येताच मी ती स्वप्ने

तत्काळ जशीच्या तशी लिहून ठेवू लागलो होतो. त्यांतली काही स्वप्ने जीव दडपून टाकणारी होती, काही प्रेमाचे मनोगत कळविण्याचे, प्रेमाची ओळख पटवून देण्याचे साधन वा माध्यम नष्ट झाल्याची व त्यामुळे झालेल्या जिवाच्या कोंडमाऱ्याची होती. एखादे स्वप्न सुंदर साक्षात्कारासारखे होते आणि त्याच्या लावण्याने जीव कोंदून टाकणारे होते. ही स्वप्ने नुसती 'कृष्ण-धवल' स्वरूपाची नव्हती तर त्यांत विविध रंगांचा विलासही असे. 'कालस्वर' मधल्या 'हात हालतोच आहे तर', 'एक स्वप्न', 'एक अनुभव—स्वप्नातला', 'एक भयाचे नगर' या माझ्या कविता अशा स्वप्नांतूनच निर्माण झालेल्या आहेत. 'आधार' या कवितेतही त्या कवितेत घडलेले एक स्वप्न आहेच. त्या स्वप्नातली काही स्वप्ने विलक्षण गमतीदार होती. अशी वेगवेगळ्या प्रकारची माझी काही स्वप्ने सत्यकथेच्या १९६७ च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली आहेत. हे सर्व सांगण्याचा हेतू हा की, कालाशी संबंधित असे काही अनुभव मला प्रकर्षाने जाणवत होते. त्यातले काही अनुभव मनाला धडका देत स्वप्नांतून प्रकट होत होते. यातच कालाचे अनुभव आणि प्रेमानुभव यांची एकत्र गुंफणही होत होती. 'आधार' ही कविता याचाच एक भाग होता.

मी ही कविता लिहिली त्याच्या आदल्याच दिवशी 'राणी, गा ना जरा' अशी एक कविता माझ्याकडून लिहून झाली होती. तिच्यात प्रकट झालेल्या मनःस्थितीचा 'आधार' कवितेशी थोडा संबंध असावा असे वाटते म्हणून तिच्याकडे थोडे वळावयास हवे.

प्रेमाच्या जगात प्रेमाच्या सुखद-दुःखद अनुभवांबरोबर अनेक जटिल प्रश्नही येतात. प्रेमात शरीराचा भाग किती ? मनाचा किती ? यात प्रेम किती ? व्यवहार किती ? हे प्रेम की एक तडजोड ? हे नाते खरेच जन्मजन्मांतरीचे असते का ? की ही फक्त बोलण्याची भाषा ? या प्रकारचे ते नाना प्रश्न असतात. यातलाच एक प्रश्न मला सामोरा आला आणि ठामपणे माझ्यापुढे राहिला. 'आपले नाते जन्माजन्मांचे आहे का ?' हा तो प्रश्न. मला त्याचे मोघम उत्तर द्यायचे नव्हते. त्या कवितेत मी म्हटले होते: हा प्रश्न बेचैन करणारा आहे. मला कळते आहे ते मर्यादित स्वरूपाचे आहे, पण आपण संगीताची मैफल ऐकत असताना आपले मन विस्तारते. तेव्हा गाणे ऐकताना असे एक वळण येते की आपण आपोआप एकमेकांकडे पाहातो. कारण काही खोल नाती तेव्हा आपणास जाणवून जातात असे वाटते. तुझ्या प्रश्नाला उत्तर म्हणून मी एवढेच काही तरी सांगू शकतो. आता या क्षणी गाणे संपलेले आहे आणि विस्तारलेले मन पुन्हा संकोचलेले आहे. आपण या क्षणाला एकमेकांच्या जवळ आहोत एवढेच काय ते मला माहीत आहे, पण या पलीकडचे मला काही माहीत नाही.' हे असे मी तिच्याशी बोलत असतानाच माझ्या अंतर्मनात मात्र वास्तवदर्शी कठोर ओळी येत होत्या,

*"नेऊन टाकतात शेवटी ही माणसे*
*माणसांची कलेवरे समुद्रकिनाऱ्यावर —एवढेच माहीत आहे*
*पुढचे मला ठाऊक नाही-"*
*मात्र प्रकटपणे मी तिला म्हणालो की*

*"तुझ्या प्रश्नाने मला व्याकुळ करू नकोस*
*व्याकुळ होऊ नकोस*
*राणी, गा ना जरा_"*

येथे तिला गायला सांगायचे कारण असे की त्या गाण्यातून मन पुन्हा विस्तारत जाईल, एका क्षणी दाद देत आपण पुन्हा एकमेकांकडे पाहू तेव्हा कदाचित नात्यांचे ते गूढ धागे खोलवर ठकलून आपणास दिसतील, आपल्या नात्यातले सत्य आपणास उमगेल !

पण हे असे उत्तर देऊन माझ्या मनाचे खरे समाधान झालेले नव्हते. तो विषय मनात घोळतच होता. वेगवेगळे आकार घेत चालला होता. याच्याच दुसऱ्या दिवशी 'आधार' ही कविता मला स्फुरली.

मी जोगेश्वरीला कॉलेजला जाण्यासाठी दादर स्टेशनवर बोरिवलीच्या धिम्या लोकलमध्ये बसलो. फर्स्ट क्लासचा डबा. डब्याच्या त्या दालनात एखादा-दुसराच प्रवासी. मी बसलो. काही सुचते आहे असे वाटून एका कागदावर लिहू लागलो. वाटेत काही मिनिटे लेखनाची साखळी किंचित तुटली असावी, पण अंधेरी स्टेशन आले तेव्हा माझी कविता लिहून पूर्ण झाली होती. त्यामुळे मन आनंदून गेले होते. माझ्या कॉलेजातील एक रसिक स्नेही मला जोगेश्वरीच्या फलाटावर भेटले. माझी उजळलेली मुद्रा पाहून त्यांनी ओळखले की यांना काहीतरी सुचले आहे. 'कॉलेजात चला, दाखवतो !' असे मी म्हणालो. दोघेही झपझप कॉलेजची टेकडी चढलो. मी कॉमनरूममध्ये त्यांना एका बाजूस घेऊन कविता वाचून दाखविली. त्यांना ती कशी वाटली हे त्यांनी जगावेगळ्या पद्धतीने व्यक्त केले. अभिप्रायादाखल त्यांनी हात पुढे करून स्वतःचे मनगट दाखवीत म्हटले, "पहा". त्यांच्या मनगटावरले केस तरारून उभे राहिलेले होते. मी म्हटले, "वा, काय दाद आहे ! चांगली पावती मिळाली !"

या कवितेसंबंधी लिहीत असताना मी त्या काळातल्या माझ्या मनःस्थितीचा, माझ्या अन्य काही कवितांतून प्रकटलेल्या अनुभवांचा विचार, माझ्या जुन्या वह्या चाळीत, शोधक वृत्तीने करीत आहे, पण एक गोष्ट खरी की आता आपण अशी कविता लिहिणार आहोत याची तो लेखनाचा क्षण येऊन ठेपला तोवर आणि कवितेचा नीट आकार दिसू लागेपर्यंत मला कल्पना नव्हती. एका कालखंडातली माझी मनःस्थिती मी मागील विवेचनात स्पष्ट केली. कालविषयक कवितांच्या मालिकेतली ही एक कविता आहे हे सांगितले, 'राणी, गा ना जरा' या कवितेचा सविस्तर उल्लेखही केला. कारण आता हे सारे घडून गेलेले असल्यामुळे शोधबुद्धीने ते मी सारे पाहू शकतो म्हणून. एरव्ही, 'आधार' ही कविता आपण लिहिणार आहोत याची एवढीही कल्पना मला नव्हती. (कवितेचे 'सुचणे' हे असेच असते असा माझा अनुभव आहे.) त्या कवितेतला तपशील, ते स्वप्न, ते अरण्यातले वातावरण हे माझ्या मनाने कोठून आणले हे कळत नाही. तिच्या अगोदरच्या कवितांशी तिचे काही नाते दाखविता येईल. तरीपण ही कविता अगदी स्वतंत्र व वेगळी आहे. एवढेच नाही तर तिच्या रचनेचे काही सौंदर्य विशेष मला

कालांतराने जाणवले आहेत, काही ओळींचे नवे अर्थसंबंध नंतर उलगडले आहेत. काही नव्या अर्थछटा आज, अगदी आत्ता दिसून येत आहेत. हे तिच्या उत्स्फूर्ततेचे एक गमक आहे आणि यातून तिची अर्थ प्रस्फुरित करण्याची शक्तीही कळते. तसेच नवे अर्थसंबंध कळल्याने त्यातून काही ओळींशी एक नवे नाते निर्माण होते. याची कांही उदाहरणे देऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. त्यामुळे त्या कवितेच्या काही विशेषांवर प्रकाश पडेल.

एक उदाहरण असे: 'प्रथमच जाणवले, चंद्र एकटाच फिरत असतो भयाण पोकळीत' असे लिहिताना चंद्राचे एकाकी फिरणे मला जाणवले होते, आकाशाला 'भयाण पोकळीचा अर्थ' आला होता. आता जाणवते की, कवितेच्या प्रारंभीच्या ओळींच्या संदर्भात 'प्रथमच जाणवले, चंद्र एकटाच फिरत असतो भयाण पोकळीत' या ओळीतला चंद्र नुसता चंद्र राहात नाही. 'माणसे एकमेकांच्या संगतीत असली तरी प्रत्येकाच्या मनाचा व्यवहार दुसऱ्या व्यक्तीस पूर्णतेने न कळता वेगळाच राहणारा असतो. एकेकाच्या मनाचे एकाकी भटकणे अटळपणे घडून येतच असते' असा अर्थही 'चंद्र एकटाच फिरत असतो भयाण पोकळीत' या ओळीतून सूचित होत राहतो. हीच ओळ या कवितेत आणखी एक कार्य साधते. 'अंधारात काहीतरी वाजले तेव्हा' या ओळीने अंधाराच्या वातावरणाचा जो बोध होतो त्याला चंद्राच्या उल्लेखाने हा प्रसंग रात्रीचा वा पूर्वरात्रीचा आहे अशी स्पष्टता मिळते. तसेच 'राणी, तू आता शांत झोपलेली आहेस,' वगैरे पुढच्या ओळींमधून तेथे अभिप्रेत असलेला रात्रीचा समग्र न सांगताही आपोआप गृहीत धरला जावा यासाठी आधार ती ओळ निर्माण करते. सबंध कवितेच्या रचनेच्या संबंधात नव्याने जाणवलेली एक गोष्ट अशी की कवितेच्या तिन्ही कडव्यांत अंधाराच्या विरोधाने मनावर ठसणाऱ्या तीन उजळ अथवा धवल रंगाच्या वस्तू येऊन जातात. पहिल्या कडव्यात 'चंद्र', दुसऱ्या कडव्यात 'बत्त्यांचा प्रकाश', आणि तिसऱ्या कडव्यात सागाची उंचसोट निष्पर्ण 'पांढरी झाडे'. या उजळ-पांढऱ्या रंगामुळे अंधारात विजेरीने प्रकाश झोत टाकून एखादे दृश्य हेतुपूर्वक दाखवावे तसे येथे घडते. मला वाटते की जीवनाच्या संबंधात जाणवलेल्या भयाचा अर्थ 'एकटेपण', 'मरण', निष्पर्ण सांगाडे' असा वाढत जातो. आणि तो कवितेतील भयद अनुभवाचा संस्कार मनावर ठसविण्यास प्रेरक ठरतो. कवितेतील वातावरणात कृष्ण-धवल रंगांनी एक तोल निर्माण होतो हे वेगळेच. अशा अनेक बाबी ती कविता लिहिताना ध्यानात आल्या नव्हत्या.

आणखीही थोडा तपशील सांगावासा वाटतो.

दुसऱ्या कडव्यात 'ती' शांतपणे झोपलेली आहे. तिच्या मनातला कोलाहल जसा काही संपलेला आहे. कदाचित् त्याने दिलेल्या आधारामुळे, पण 'तो' मात्र मानवी अस्तित्वाकडे साशंकतेने पाहू लागला आहे. 'केवढा आधार वाटतो आहे तुला या पृथ्वीचा आणि माझ्या अस्तित्वाचा' असे म्हणतानाच तो मनातून काहीसा खचलेला आहे. तिचे विश्वासून निवांत झोपणे आणि त्याला छेद देत नेमकी त्याच वेळी दारावरून अन्त्ययात्रा जाणे हे दोन तुकडे परस्परांशी चांगला विरोध साधीत येथे आले आहेत. 'माझा पहारा भाबडा आहे !' हा त्याचा



अनुक्रमणिका



हताश उद्गार त्या दोन तुकड्यांचा जणू भावार्थच स्पष्ट करीत एक दीर्घ उसासा निर्माण करून जातो. तिसऱ्या कडव्यातील अरण्य, सागाची उंचसोट निष्पर्ण पांढरी झाडे, श्वासरहित वातावरण हे सर्व माझ्या मनाने कोठून आणले हे जसे कळत नाही. तशीच 'मैलोमैल लांब हाक' ही शब्दसंहिता कशी सुचली हेही सांगता येत नाही. ती हाक त्याच्या जीवाचा आकांत व्यक्त करीत येते. कवितेतली 'ती' त्याला दिसत असूनही त्याच्या संपर्काच्या टप्प्यापलीकडे आहे. हे प्रदीर्घ अंतरही त्या 'मैलोमैल लांब हाकेमुळे' वाचकाच्या मनाला कळून येते. या अंतरालाही कवितेत अर्थपूर्ण जागा आहे. ते ताटातुटीची जाणीव मनावर ठसवते. हा असा आयुष्यासंबंधीच्या कठोर सत्याची जाण देणारा जाणिवेचा प्रवाह अनुभवातून आपल्या प्रत्ययाला येत असला तरी जीवनात माणसे एकमेकांना आधार देत जगतच असतात हीही एक वस्तुस्थिती आहेच. त्यात कदाचित भाबडेपणा आहे असे वाटेल; पण तो आयुष्याचा एक भाग आहे, हे दाखवीत ही कविता पूर्ण होते.

या कवितेचा सुटा विचार करता येणे शक्य नव्हते म्हणून माझ्या लेखनाच्या संबंधात ही कविता कोठे, कशी येते हे सविस्तर सांगत मी माझी त्या वेळची मनःस्थिती सांगून कवितेची निर्मिति-प्रक्रिया सांगितली आहे. मला नंतर उमजलेले काही अर्थसंबंध आणि रचनाविशेष हेही मुद्दाम सांगितले आहेत. कवितेच्या सौंदर्याचा तो एक भागच आहे. कविता मला का आवडते याचे काही उत्तर त्यातून सूचित व्हावे. ज्ञातापलीकडच्या काही बाबीही नमूद केल्या आहेत. आपली कविता आपल्यालाही कशी नवीन असते हे यातून पुन्हा ध्यानी आले. माझ्या दृष्टीने ते त्या कवितेच्या वेधकशक्तीचे एक अंग ठरते.

हा अनुभव मुक्त लयीत प्रकट झाला तो अगदी सहजपणे. अंतर्मनातल्या सौंदर्यदृष्टीचे भान ठेवून त्या कवितेची घडण साधली असली पाहिजे असे म्हणता येते. त्यात हा लयीचा भागही येतो. ही कविता लोकल गाडीच्या प्रवासात लिहिली गेली हे प्रारंभी सांगितलेच आहे. दोन स्टेशनात मध्यंतरीच गाडी कोठेतरी थांबली तेव्हा थोडा व्यत्यय येऊन कवितेचा धागा जरा गहाळ झाला, पण त्या वेळी काही ओळी 'आमिष' म्हणून लिहीत तो गहाळ धागा पुन्हा पकडून मी कविता पूर्ण केली. 'आमिष' म्हणून वापरलेल्या काही ओळी नंतर काढून टाकल्या.

मला ही कविता का आवडते हे आता वेगळे सांगण्याची गरज नाही. ते आतापर्यंतच्या विवेचनातून कळेल असे वाटते. ही कविता जुनी झालेली नाही असे अनुभवास येते. तिची आवाहनशक्ती अजून तशीच आहे. ती आपोआप आठवते. मनात घोळत राहते. त्याचा कंटाळा येत नाही. ती मनात येताच एका वेगळ्या वातावरणात घेऊन जाते. आयुष्यासंबंधीचे भान निर्माण करते. एका अनुभवाचा आस्वाद सौंदर्यपूर्ण रीतीने घडवते. अनेक रसिकांनाही ही कविता आवडलेली असून ती 'कालस्वर'चा विश्वसनीय आधार ठरली.

(प्रा. शंकर वैद्य, आफ्रिका हाऊस, एडनवाला रोड, माटुंगा, मुंबई- १९)



अनुक्रमणिका







# पाहुणेर

पुरुषोत्तम पाटील

*येणाऱ्यासाठी*
*लगबग पहाट– चुळुक झुळुक सडा*
*हलकसें स्वस्तिक, फुलकीशी रांगोळी*
*अन् थोडा दळदार सूर्य–*

*थांबलेल्यासाठी*
*एकुलता पाट, सुगरण ताट*
*अन् नखललेल्या कोवळ्या पानांचा*
*थोडा बेतशीर केशरविडा–*

*जाणाऱ्यासाठी*
*अर्ध्या-उघड्या दाराआडचा*
*ओझरता इरकली पदर*
*अन् कांकणांची थोडी अस्वस्थ किणकिण–*

'कविता फुलते कशी' यासंबंधीचे कुतूहल शमविण्यासाठी काही नामवंत कवींनी आपल्या निर्मितिप्रक्रियेचा मागोवा घेत त्यावर प्रकाश टाकला आहे. प्रत्येकाची निर्मितिप्रक्रिया ही वेगवेगळी असते. ज्याच्या त्याच्या स्वभावधर्माप्रमाणे, संवेदनशीलतेप्रमाणे त्या त्या कवितेचे बीज अंकुरत जाते, फुलत जाते. काही कवींच्या बाबतीत कवितेचे स्फुरण, निर्वहण– हा आवेगाचा, झपाट्याचा प्रकार असतो. कविवर्य बोरकरांची कविता गुणगुणत पदन्यास करीत येई हे मी जवळून पाहिले आहे. एकामागून एक ओळी सहज जलद गतीने अवतरत, त्या शेवटचा पूर्णविराम घेईपर्यंत. (त्या वेळी आम्हा तरुण मंडळीत बोरकरांची ही निर्मितिप्रक्रिया 'घुमत घुमत कविता करणे' म्हणून ओळखली जात होती !) काहींना कवितेची पहिली ओळ सुचून ती कविता पूर्ण व्हायला मधले अनेक महिने, वर्षे सुनी जावी लागत. 'व्यक्ती तितक्या प्रकृती' हा अनुभव याही संदर्भात भरपूर प्रत्ययाला येतो.

माझ्या कवितालेखनाच्या बाबतीत तिचे असे अचानक घुमण्याच्या पद्धतीने 'उत्स्फूर्त अवतरण' जसे कधी घडले नाही तसे एखादी कविता दीर्घ काळपर्यंत महिने न् महिने अपूर्ण



अनुक्रमणिका







राहिली असेही कधी झाले नाही. सामान्यतः कविता एकाच बैठकीत लिहून पूर्ण होते. तिच्यात बदलही नंतर सहसा होत नाही. एखाद दुसऱ्या शब्दाच्या बाबतीत परिष्करण झाले तर झाले.

'पाहुणेर' ही कविताही अशी एकटाकीच, एकाच बैठकीत लिहून पूर्ण झाली. आभाळात हळूहळू ढग जमा व्हावेत, त्यांची दाटी होऊन ते झाकोळून जावे आणि सावकाश थोडे थोडे थेंब मंदगतीने टपकू लागावेत आणि नंतरच त्यांचे सरींत रूपांतर व्हावे असा काहीसा प्रकार माझ्या कवितालेखनाच्या बाबतीत घडत आला आहे; एकदम धुवाँधार कोसळणे कधीच नाही.

ही झाली प्रत्यक्ष 'कविता-वस्तू' कागदावर अवतरण्याच्या वेळची स्थिती. पण या घटिताच्या पाठीमागे खूप खूप काही साचलेले, दडलेले असते. ते शोधण्याचा प्रयत्न करून पाहतो आहे.

* * *

'कुण्या एकाचे कुण्या एकीने केलेले स्वागत, पाहुणचार आणि दिलेला निरोप' एवढीच घटना या कवितेत चित्रित झाली आहे. तीन छोट्याशा प्रसंगदृश्यांतून.

हीच प्रसंगदृश्ये आणि अशा रेखीवपणे पण व्यंजनेचे अवगुंठन घेऊन का अवतरावीत ?

त्याला थोडासा इतिहास आहे.

मी खानदेशातला. माझे बालपण, किशोरपण खानदेशातल्या खेड्यात गेलेले. मी मामांकडे शिकायला होतो. या संस्कारक्षम वयात जे पाहत होतो, अनुभवत होतो ते मनात कुठेतरी खोलवर रुजत होते.

आज शहरात पहाटे जाग येते ती एक तर गिरणीच्या भोंग्याने किंवा उशाशी लावून ठेवलेल्या अलार्मच्या घड्याळाने ! मला पहाटे जाग यायची ती माझी नवपरिणित मामी अंगणात सडा टाकायची त्या आवाजाने. तो अंगण शिंपण्याचा चुळुक झुळुक गोड आवाज ५-१० मिनिटे तरी चालायचा. लयबद्ध. मी उठून बसायचा ओट्यावरच्या बाजेवर. गंमत वाटायची तो आवाज ऐकताना. सडा टाकून झाल्यावर कानतुटक्या कपातून मामी रांगोळी आणायची आणि निरनिराळ्या पद्धतीच्या सुंदर रांगोळ्या काढायची— कधी पाने-फुले, कधी स्वस्तिक, कधी चंद्र-सूर्य.

पहिल्या कडव्याच्या पाठीमागे ह्या स्मृतीचा शिक्का आहे.

जिव्हाळ्याचा पाहुणचार हे खानदेशचे खास वैशिष्ट्य. खानदेशी स्त्री म्हणजे सुगरणच. तिच्या हातच्या रुचिपूर्ण स्वयंपाकाने ज्याचे मन धाले नाही, तिच्या काहीशा अतिरेकी' आतिथ्याने ज्याचे मन सुखाने गुदमरले नाही असा पाहुणा विरळाच.

हे सुगरणपण, हे आतिथ्य दुसऱ्या कडव्यातील चित्रणापाठीमागचा निर्मितिस्रोत आहे.

तरुण वयात स्वतःच्या आणि मित्रांच्या वधूपरीक्षेसाठी जाण्याचा प्रसंग यायचा, बहुधा खेड्यातच. या प्रसंगाचा pattern – आकृतिबंधही ठरलेला असायचा : बैठकीची सजवलेली खोली. मुलासह चार ज्येष्ठ माणसे. वधूच्या आगमनाची प्रतीक्षा करत असलेली. ती यायची खाली मान घालून. बसायची. अवघडून. लाजाळूपणाची उदबत्ती सुगंधत राहयची. अनेक डोळे



अनुक्रमणिका







न्याहाळण्यात मग्न. मग काही प्रश्नोत्तरे. पाच मिनिटांचे अवघडलेले नाट्य संपायचे. ती उठून सर्वांना वाकून नमस्कार करून घरात-माजघरात जायची. बैठकीची खोली व माजघर यातल्या दारातून. जुना जमाना. आता दारावरून टाकला जाणारा 'आधुनिक' पडदा त्या वेळी नसायचा.

हे दार! हे दार फार मनात रुतून राहिले आहे. दाराची कवाडे पूर्णपणे बंद नाहीत. थोडी लोटलेली. जाता-येता येईल अशी. ह्या दाराआड-

माझे कुतूहलाचे सावध डोळे आणि कान वधूपेक्षाही ह्या दाराचा हमखास वेध घेत. दारापलीकडे कसली गडबड, कसला गोंधळ नाही. हलकेच वावरणाऱ्या व्यक्ती. हातातल्या बांगड्यांच्या मंद किणकिणीतून आणि वस्त्रांच्या ओझरत्या खसखशीतून जी थोडी चाहूल लागायची तेवढीच. कोण असतील? आई, बहिणी, मावश्या, चुलत्या- दाराला फटी असायच्या. बारीक. त्यातून काही डोळे चमकायचे. वराला न्याहाळण्यात मग्न असलेले. कधी नजरानजर झालीच तर हे उत्सुक डोळे गपकन् बाजूला होत. निरोप घेत पायऱ्या उतरताना मी मागे वळून पाह्यचो. दार थोडे किलकिले झालेले आणि त्यातून किंचितसा एखाद्या लफ्फेदार लुगड्याचा जरीकाठी पदर फडफडत असलेला. बस्स. तेवढेच. स्त्रिया दिसतच नाहीत. पण घरंदाज शांततेला त्या वेळी काही क्षण फुटलेले हे कुतूहलाचे कोवळे धुमारे! विसरू म्हणता विसरेना-दृश्याची लय उतरेना!

तिसऱ्या कडव्याच्या निर्मितीमागे हे आठवणीतले मूकनाट्य दडलेले आहे.

* * *

भूतकाळात अनुभवलेली ही दृश्ये म्हणजे या कवितेची प्राथमिक निमित्तकारणे. प्राथमिक असली तरी अत्यंत प्रभावी. त्यांना कवितेची सकस बीजेच म्हणावी लागेतील. खरे तर ही दृश्ये वेगवेगळी आहेत. तशी परस्परांशी असंगत आहेत. तरीही कवितानिर्मितीच्या वेळी एक सुसंगत, परिणामकारक चित्र कसे तयार झाले हे सांगणे तसे अवघडच. पण खोल पाण्यात उतरायला हवे. आधाराला आहे टी. एस. एलियटचे मार्मिक भाष्य- "When a poet's mind is perfectly equipped for its work, it is constantly amalgamating disparate experience... in the mind of the poet these experiences are always forming new wholes."-The Mataphysical Poets P. २८३.("ज्या वेळी कवीचे मन कवितानिर्मितीसाठी परिपूर्ण, परिपक्व अवस्थेत असते, त्या वेळी विविध असंगत अनुभवांची ते सातत्याने मिळवण करीत जाते- हे अनुभव कवीच्या मनात नवनवी स्वयंपूर्ण रूपे धारण करतात."- 'द मेटॅफिजिकल पोएट्स.' पृ. २८३). काही समीक्षकांनी 'amalgamate' चा अनुवाद 'संयुक्तीकरण', 'जोडणी' असा केलेला आहे. असंगत अनुभव या प्रक्रियेत केवळ 'जोडले' जातात असे नव्हे तर त्यांची 'एकरूप मिळवण' होऊन ते नवनव्या स्वतंत्र रूपात आविष्कृत होतात- निर्मितिप्रक्रियेत हे 'रूपांतर' महत्त्वाचे असते.

'पाहुणेर'च्या संदर्भात हे कसे आणि किती प्रमाणात घडले ते पहायला हवे.

पहिली गोष्ट म्हणजे वर उल्लेखिलेल्या तीन आठवणींच्या प्रसंगदृश्यांतून कवितेचा

नायक आणि नायिका साकार झाली. मुळात ती नव्हती. साहजिकच कवितेत चित्रित केलेल्या घटनाक्रमाला आधार मिळाला – स्वागत, पाहुणचार आणि निरोप. मुळातल्या अनुभवांचे तीन विभिन्न, असंगत घटक एका सूत्रात गुंफले जाऊ लागते. तो (नायक) येतो, थांबतो आणि जातो एवढेच अल्पकाळातले लघुनाट्य. येणारा तोच, थांबणारा तोच आणि जाणारा-निरोप घेणारा तोच. या लघुनाट्याचा नायक. या घटनांच्या केंद्रवर्ती असणारा.

पण हे फार फसवे आहे !

या कवितेत प्राधान्य आहे ते नायिकेला, हे नीट बारकाईने पाहिले म्हणजे सहज लक्षात येईल. ज्याचे स्वागत केले जाते, ज्याचा पाहुणचार केला जातो, ज्याला निरोप दिला जातो तो तिच्या 'जिवाचा सखा' एका अर्थाने कवितेचा नायक असला तरी कवितेतल्या तिन्ही टप्प्यातल्या चित्रणातून नायिकेचेच विलोभनीय व्यक्तिमत्त्व साकार करण्यावर भर दिला गेला आहे. नायक काहीसा आडोशाला जातो. पार्श्वभूमी म्हणून वापरला जातो ! 'पाहुण्या'पेक्षा 'पाहुणचार करणारी' ती– तिच्या मनाची भावविलसिते तिच्या लहानसहान 'कृतीं'तून व्यक्त होताहेत; 'उक्ती'तून नव्हे. ती बोलतच नाही. वाच्यार्थाने 'मूकनायिका'च. ती बोलते ती तिच्या कृतीतून. त्यातून त्याच्यावद्दलचा अपरंपार अभिमान, जिव्हाळा, आदर बोलका होतो.

तिच्या कृती निरखायला हव्यात.

तो येणार म्हणून तिच्या मनात उत्सुकता शिगेला पोहोचलेली असते. भल्या पहाटे ती उठते. नेहमीपेक्षा लवकरच. तिच्या मनातली घाई व्यक्त करण्याकरता 'लगबग पहाट'मधील 'लगबग' शब्द आला. या विचलित विशेषणाने (Transferred Epithet) तिच्या मनातली आतुरता अधोरेखित झाली. आता ती सडा टाकते आहे– चुळुक झुळुक, चुळुक झुळुक– ह नादानुकारी (Onomatopoeiac) शब्द तिच्या मनातील भावनांचे व्यंजक म्हणता येतील. सड्याच्या रूपाने ती आपल्या भावनांची शिंपणच करते आहे जणू. त्याच्या तंद्रीत हरवून. लयबद्ध शिंपण ! (मर्ढेकरांनी उल्लेखिलेल्या 'तोतऱ्या नळा'च्या धारेला प्लॅस्टिकची किंवा रबराची नळी लावून 'अंगण माझे ओलेचिंब' म्हणण्याचे नशिबी आलेल्या आधुनिक पिढीला या सडाशिंपणातले माधुर्य जाणवेलच असे नाही !)

आणि यानंतरचे रंगावली-रेखन. मांगल्याचे प्रतीक म्हणून ती स्वस्तिक काढते, फुल्यांची रांगोळी काढते. येथे 'हलकीफुलकी' या नेहमीच्या वापरातल्या शब्दाचे विभाजन झाले आहे– 'हलकेसे स्वस्तिक, फुलकीशी रांगोळी.' स्वस्तिक काढताना ती हलक्या, नाजुक हातांनी अलगदपणे काढते. 'येईल ना तो ? येईल ना त्याच्या भेटीचा मंगल योग ?' ही मनाच्या तळाशी दडून बसलेली कातरता तर या पाठीमागे नसेल ? शक्य आहे. फुल्याफुल्यांनी काढलेली, फुलांनी नटलेली रांगोळीही ती तेवढ्याच अलगदपणे रेखते. पण त्या रांगोळीच्या शेजारी उगवत्या 'दळदार सूर्या'चे चित्र मात्र ती अतिशय ठसठशीतपणे काढते. हा 'दळदार' शब्द असाच स्मृतिकोषातून अचानकपणे वर आला. माझ्या आईच्या बोलण्यात एक म्हण नेहमी यायची– 'जिच्या भाकरीले दळ । तिच्या नवऱ्याले बळ' या म्हणीतून उमललेला



अनुक्रमणिका







'दळदार' शब्द इथे सूर्यचित्राला बिलगला ! हा भेट देणारा नायिकेचा प्रियकर, पती– जो कोणी असेल तो- बलवान आहे, सूर्यासारखा तेजस्वी आहे हे संसूचन व्हायलाच हवे होते. ते असे सहजपणे झाले. हे सारे 'येणाऱ्यासाठी.'

दुसरा टप्पा. भोजनप्रसंगीचा. तत्पूर्वीचा मधला काळ निर्देशित केलेला नाही. त्याची गरजही नाही. चित्रपटातल्या fade out सारखा प्रकार. मुख्य प्रसंगावरच कॅमेरा फिरवायचा. तो एकटाच आहे. हे आदरातिथ्य एकट्याचेच आहे. म्हणून 'एकुलता पाट' हा उल्लेख आला. ('पाटपाणी करते हं' अशी भाषा जुन्या पिढीत असायची. आता 'डायनिंग टेबल'वाले काय म्हणत असतील ?) तीही त्याच्यासोबत जेवायला बसत नाही. वास्तविक दोघेच फक्त आहेत घरात. 'एक घास तुला, एक घास मला' असेही करता आले असते. पण तिचे संस्कार वेगळेच आहेत. शालीनतेचे, आदराचे. त्याला भरभरून वाढत त्याच्या मुखावरचे तृप्तीचे, खुषीचे भावही तिला निरखायचे असावेत. ती पाककुशल आहे. सुगरण आहे. म्हणून 'सुगरण ताट' हे शब्द वापरताना माझ्या मनात खानदेशी स्त्रीचा सुगरणपणाच रेंगाळत होता– जिचा तुकडा तोंडात टाकताच विरघळावा अशी मखमली पोताची पुरणपोळी–तीही खानदेशी तुपाने माखवलेली; आमरस; झणझणीत चवदार रशी (सार); रंगीत कुरडया, पापडांचे तळण– असा खानदेशी भोजनातिथ्याचा सरंजाम. हे सारे तिने आग्रह करकरून वाढले असेल. पक्वान्नांचा तपशील देण्याची गरजच नाही. 'सुगरण' शब्दात सारे येऊन गेले. 'पाट' आणि 'ताट' यांच्या संदर्भात इथेही विचलित विशेषणांची योजना अपरिहार्य वाटली. भोजनोत्तर तिने दिलेला केशरविडा 'नखललेल्या कोवळ्या पानांचा' आणि 'बेतशीर' होता हेही लक्षात घेतले पाहिजे. अगदी बारीकसारीक गोष्टीतही ती काळजी घेते. आतिथ्यशीलतेतील तिची दक्षता तिच्या मनावर प्रकाश टाकणारी आहे. या मनाचे रंग भडक, उठवळ नाहीत. 'बेतशीर' या शब्दानेच. तिच्या संयमी, मर्यादशील प्रेमाचे सूचन होऊ शकणार होते. म्हणून 'बेतशीर केशरविडा' आला. हे आतिथ्य 'थांबलेल्यासाठी.'

तिसरा टप्पा निरोपाचा. व्याकुळ करणारा क्षण. पण सामोरे गेल्याशिवाय गत्यंतर नाही. 'त्याच्या' सहवासाच्या घटकांचे रंग अजून तसेच ताजे, सतेज आहेत. त्यामुळे तर व्याकुळतेला सीमा नाही. काय काय मनात येत असेल? कुसुमाग्रजांच्या 'शेवटचे पान' मधील नायिकेप्रमाणे ? – 'आणि चांदणे सवे घेउनी । दुणावुनी तम जासी निघुनी_ क्षणभर येउन क्षणभर राहून । क्षणात जासी चार युगांचा घाव उरी घालून'– असे काही ? पण ती सावरते. मनातले कढ मनातल्या मनात दाबून त्याला निरोप देते. पण निरोप द्यायला उघड्यावर ओट्यावर येत नाही. जुन्या वळणातील खानदानी घरंदाजपणा स्वभावात मुरलेला. दाराआडूनच निरोप देते. दारही अर्धे-उघडे. त्यातून फडफडणारा इरकली लुगड्याचा ओझरता पदर. तिच्या फडफडणाऱ्या हृदयाचे स्पंदन सूचित करणारा. हातांची अस्वस्थ चाळवाचाळव. हा अस्वस्थपणा कांकणांच्या अस्वस्थ किणकिणीतून हलकेच, मंदपणे निनादित होतो. हा कातर निरोप 'जाणाऱ्यासाठी.' कविता वाचून संपविल्यानंतर काकणांचा हा नाद काही काळ जरी

रसिकांच्या मनात गुंजत राहिला तर या कवितेचे यश मी मानीन.

* * *

एक पुन्हा सांगायला हवे. माझ्या कवितांतून स्त्रीरूपाचे, तिच्या स्वभावाचे, वर्तनविभ्रमाचे चित्रण होत असताना खानदेशी जुन्या परंपरेतील स्त्रीच माझ्या मनात कायम वसतीला असते. 'तळ्यातल्या साउल्या'तील अनेक कवितांत 'माथ्यावरचा पदर', 'थरारे काचोळी', 'उसासे कंकण' 'मेंदी-पेटल्या हाताची धग', 'हटवादी हिरवा चुडा', 'कपाळाची चांदकोर', 'बिंदी', 'विनाबांगडीचा बोल', 'कोरे बिल्वर', 'आडावरचा रहाट', 'खण चोळीचा', 'तंग पोपटी नेसू काचता', 'माथ्यावरूनी घुंघट घेणे', 'दिलदार पदर कमरेला खोचीत', 'सजग सावरीचे हात', 'पदराच्या वाऱ्याने रांगत राहणारा संथ गारवा', 'लाजलाजरे सावरवस्त्र' असे जे अनेकविध निर्देश आहेत ते तिच्याच संदर्भात. त्यानंतरच्या गेल्या दहा वर्षातील कवितांतही 'पदराचा शेव', 'हिरवे गोंदण', 'गोठपाटल्यांचे हात', 'पोतीविना उजाड गळा', 'रेखीव भिवयांमधील लालजर्द कुंकवाखालचे चंद्रकोर गोंदण', 'पाऊलजड जोडव्यांचा हलका ठेका', 'पायघोळ लुगड्याचा घडीमोड लफ्फेदार असरपसर', पायांतल्या तोरड्यांची अपाप घसरघुटमळ', 'जडभार तोडे खट्याळती घोट्यावरी'— असा अविरत प्रवाह चालूच आहे ! हे तपशीलाने नोंदण्याचे कारण हे की, हे खानदेशी स्त्रीरूप मनात घट्ट रुतून बसले आहे. प्रस्तुत 'पाहुणेर'ची नायिकाही त्याला अपवाद नाही. माझ्या संस्कारक्षमतेची ती मर्यादाही असेल. पण माझ्या काव्यातून आसुसून प्रगट होतात ते या रूपाचे विभ्रमच.

या कवितेची 'बंदिश'—रेखीव बांधणी—अनेकांच्या कुतूहलाचा विषय झाली आहे. एरव्हीही अनावश्यक विस्तार मला टाळावासाच वाटतो. या कवितेत तर विधानरूप वाक्येही नाहीत. क्रियापदेच नाहीत ! आणि काही वर्षांनी डॉ. म. सु. पाटलांनी आपल्या 'अक्षरवाटा'त उद्धृत केलेले हर्बर्ट रीडचे वाक्य वाचनात आले आणि आश्चर्याचा सुखद धक्का बसला ! रीड म्हणतो, "कलेमध्ये वाक्य हे नष्ट केलेच पाहिजे. कारण ते कधीच अस्तित्वात नव्हते." ('पोएट्री अॅन्ड एक्सपिरियन्स'). या कवितेच्या बाबतीत हे कसे घडले हे मलाच कळले नाही. कदाचित कवितेत जो प्रसंग ग्रथित केला आहे त्याचे चित्रदर्शनी रूपच त्याला कारणीभूत असावे. त्या रूपाची ती मागणी असावी.

निर्मितिप्रक्रियेच्या संदर्भात स्थूलमानाने दोन घटक मानले जातात— एक कला निर्माण करणाऱ्या कलावंताचा 'स्व' आणि दुसरा ज्याचा तो अनुभव घेतो ते वास्तव. अनेक मान्यवर समीक्षकांनी त्यांची यथेच्छ चर्चा केली आहे. माझ्या काव्याच्या निर्मितिप्रक्रियेच्या संबंधात माझ्यातला 'स्व' हा नेहमीच अधिक प्रभावी राहिला आहे. 'पाहुणेर' ही तृतीय पुरुषी निवेदनातली म्हणून वरकरणी वस्तुनिष्ठ चित्रणाची कविता वाटली तरी माझ्यातला 'स्व'च्या आवडीनिवडीची, अभिरुचीची स्त्री-सौंदर्याकडे पाहण्याच्या विशिष्ट कलाचीच ती अभिव्यक्ती आहे—by proxy म्हणा हवी तर. निमित्त असतो बाहेरचा एखादा अनुभव. कलावंताच्या व्यक्तित्वाच्या लोलकातूनच अनुभवाचे किरण प्रवास करतात. त्यातून बाहेर पडताना विविध,

सुंदर रंग त्यांना प्राप्त होतात. वक्रीभवनही होते. म्हणून हा 'स्व' महत्त्वाचा. पिकासो तर म्हणतो, "अगदी निकराची गोष्ट म्हणजे तुमचा 'स्व'. हीच तुमची कमाई_बाकीचे सारे फोलपट होय." स्त्री, तिचे विभ्रम, तिची विलसिते, स्त्री-पुरुषातले अदम्य आकर्षण, त्यांच्यातला प्रणय माझ्यातल्या कलावंताचा अतूट आस्थाविषय राहिला आहे. शिवाय माझी अभिरुची पोसली गेली आहे ती मुख्यतः गाथासप्तशतीवर, ना. घ. देशपांडे, पु. शि. रेगे यांच्या काव्यावर. तिला तिचे स्वतःचे असे वळण असले तरी ती समृद्ध होण्यात या पूर्वसुरींचा फार मोठा वाटा आहे. अन्य प्रकारची कविता मला जमली नाही. जमणारही नाही. म्हणून 'पाहुणेर' मधला जोडप्याचा प्रणयबंध रंगवताना फार समरसून गेलो होतो. आणि प्रणयाचे भाव सरळ, साध्या रीतीने व्यक्त न होता जेव्हा व्यंजित होतात तेव्हा त्यातले माधुर्य शतपटीने वाढते. व्यंजनाराशी अशी गाढ मैत्री होण्याचे श्रेय आताच ज्या पूर्वसूरींचा उल्लेख केला त्यांना द्यायला हवे. व्यंजनेच्या, वक्रोक्तींच्या मार्गाने प्रवास करणाऱ्या आम्हा कवींना एका समीक्षक मित्राने 'वाकड्या वाटेचे वहिवाटदार' म्हणून गंमतीने संबोधिले होते तेही इथे आठवते ! 'पाहुणेर' मधील तिन्ही टप्प्यांत ही व्यंजना अतिशय तीव्र, गहिऱ्या, अल्पाक्षरी स्वरूपात अवतरली आहे हे खरेच आहे.

फार पूर्वी किशोरपणी, तरुणपणी अनुभवलेली दृश्ये स्मृतिकोषात खूप खोलवर तशीच सचेत होती, थरथरत होती– फक्त कोषावरण काढावे लागले एवढेच. त्या कोषातून मुक्त झाल्यावर 'पाहुणेर'च्या कलाकोषात त्यांचे रूपांतर कसे झाले, 'मिळवण'– amalgamation– कसे झाले त्या प्रक्रियेचा आलेख काढण्याचा हा प्रयत्न. तो कितपत सफल झाला कोण जाणे. कारण शब्दातूनच हे सारे मांडायचे असते. आणि शब्द तर– कविवर्य भा. रा. तांबे 'The Birth of the Muse' मध्ये म्हणून गेले त्याप्रमाणे अपुरे असमर्थच– "All the resources of language are not sufficient to turn the poet's heart inside-out!"

(प्रा. पुरुषोत्तम पाटील, वाडीभोकर रस्ता, देवपूर, धुळे-४२४००२)



अनुक्रमणिका







# एल्गार

सुरेश भट

"माझी आवडती कविता आणि तिची जन्मकथा" ह्या विषयावर मी लिहिणे फार अवघड काम आहे. एक तर मी नेहमीच कविता लिहीत नाही– सहसा लिहीत नाही. मी मराठी गझल लिहितो. गझलेत शेर असतात आणि एकेक शेर सुटा काढून त्याचे चिंतन केले, तर ती एक स्वतंत्र, सार्वभौम व प्रत्ययकारी कविता असल्याचा प्रत्यय येतो. कविता सलग असते, तर गझल कवितांची माळ असते. इतर कवींसाठी आपल्या आवडत्या कवितेची जन्मकथा लिहिणे तुलनात्मक दृष्टीने फार सोपे असते, पण गझलेची जन्मकथा सांगणे एकूण किचकट व गुंतागुंतीचे काम आहे. कारण एकाच गझलेच्या जन्मकथेत किमान ५ तरी शेरांच्या जन्मकथा समाविष्ट असतात.

–तेव्हा "माझी आवडती कविता आणि तिची जन्मकथा" ह्या विषयाऐवजी "माझी आवडती गझल आणि तिच्या जन्मकथा" ह्या विषयावर लिहिणे अधिक समर्पक ठरेल.

कोणत्याही कवीची कोणतीही कविता सर्वांत आवडती नसते. आयुष्यातील स्थित्यंतरे, जगण्याची वळणे आणि भोवतीच्या जगाचे व माणसांचे मिळणारे अनुभव ह्या साऱ्या उलाढालीत कवीची मनःस्थिती वेळोवेळी बदलत असते. एका विशिष्ट मनःस्थितीत आपली विशिष्ट कविता सर्वांत आवडेल, तर वेगळ्याच मनःस्थितीत त्याच कवीला आपली अजून एखादी कविता फार लाडकी वाटेल. आवडणे हा प्रकार विशिष्ट मनःस्थितीत संबंधित कवितेतून मिळणाऱ्या प्रभावी प्रत्ययांच्या कसोटीवर अवलंबून असतो.

मी आजपर्यंत शेकडो मराठी गझला लिहिल्या; पण आज महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या दिवाळी अंकासाठी आयुष्यात प्रथमच लेख लिहीत असताना माझ्या मनात विचार आला की, आजपर्यंत महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या दिवाळी अंकात माझा एकही लेख का बरे प्रसिद्ध झाला नाही ? मग मला आजवर थोरामोठ्यांनी दिलेल्या वागणुकीची आठवण झाली. ठाण्याच्या साहित्य संमेलनात मराठी गझलांवर झालेल्या अधिकारपूर्ण परिसंवादातून मला कसे वगळण्यात आले, त्याची कटू आठवण झाली. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक श्री. शंकर सारडा ह्यांनी मला अगत्याने लिहिलेल्या पत्रात– 'तुमच्यासारखा महत्त्वाचा कवी या अंकात नाही, असे होऊं नये.' असेही मला बजावले. त्याच्याही झिणझिण्या आल्या. काव्यलेखनात घालवलेल्या उण्यापुऱ्या ४३ वर्षांत माझ्या वाट्याला जे काही आले ते आठवले. मला माझा भूतकाळ आठवला, मी लेख विसरलो. आणि मग त्या चिडीत मला माझा शेर आठवला,



अनुक्रमणिका






*ओठी तुझ्या न आले अद्याप नाव माझे,*
*अन् ओठ शोधण्याचा माझा स्वभाव नाही !*

हा शेर आठवला आणि त्याचक्षणी माझ्या दृष्टीने माझी 'एल्गार' ही गझल माझी सर्वांत आवडती गझल झाली ! कारण त्या गझलीत माझा वरील शेर आहे.

तेव्हा 'सर्वांत आवडती' वगैरे प्रकार नसतो. विशिष्ट मानसिक स्थितीत जिने आपल्या काळजाचा ठाव घेतला ती सर्वांत आवडती !

संपूर्ण कविता एकदम स्फुरत असते, म्हणजे ती एकदम संपूर्ण जन्मत असते, ह्यावर माझा विश्वास नाही. कविता कुठेतरी मनात मुरत असते. ती मनात मुरत असतानाच वेळोवेळी मिळणाऱ्या अनुभवातील संवेदनांच्या स्पर्शांनी आकारही घेत असते. जेव्हा आपण म्हणतो की, अमुक कवीनें यंदा अमुक कविता लिहिली, तेव्हा ती कविता कवीच्या मनात कितीतरी आधी लिहिली गेलेली असते. योग्य वेळ येताच इतर अप्रयोजक व अनावश्यक शब्दांच्या गर्दीतून वाट काढीत ती ओठांवर येते किंवा कागदांवर उतरते एवढेच.

गझल हा काव्याचाच एक प्रकार असल्यामुळे तीसुद्धा ह्या नियमाला अपवाद नाही. फरक एवढाच की, अनेक कविता मनाच्या आपापल्या कोपऱ्यात मुरत असतात. आपापले प्रत्यय, आपापल्या संवेदना घेऊन 'शेर' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ह्या सर्व कविता अभिव्यक्तीच्या संधीची वाट पाहत असतात. मग कधीतरी ओठातून एखादी ओळ निघून जाते. कधीकधी दोन ओळी बाहेर पडतात. त्यात असते वृत्त आणि यमक ! आणि दोन ओळींच्या प्रत्येक कवितेची एक आपली स्वतःची जन्मकथा असतेच !

तेव्हा 'एल्गार' ह्या गझलेची जन्मकथा सांगताना मला त्यामधील खरीखुरी जन्मकथा सांगावी लागणारच !

१.

मी विचार करू लागलो की, मी इतके दुःख भोगले, तरीही ते मी पुरेसे कुठे भोगले ? अजून त्याची व माझी घसट व्हायचीच आहे. इतरांच्या मानाने माझे दुःख काहीच नाही. मी कशाला ओरडा करीत आहे ? जगात मी एकटाच दुःखी नाही आणि दुःखानेही माझी खरी कदर केली नाही–

*अद्यापही सुऱ्याला माझा सराव नाही !*
*अद्यापही पुरेसा हा खोल घाव नाही !*

२.

गझलेची सुरुवात तर झाली. मी जरासा थांबलो. तंबाखू मळू लागलो. मथळा वाचला. स्वतःवरच बेहद्द खूष झालो. म्हटले, क्या बात है । लिखना तो फिर ऐसा लिखना । आणि असे वाटत असतानाच मागील साऱ्यासाऱ्या गोष्टी आठवल्या. मला अक्षरशः संताप आला ! संताप हीसुद्धा एक जबरदस्त नशा असते. त्या नशेत मला मराठी काव्याचे महंत अक्षरशः

कस्पटासारखे वाटू लागले. (आता करून करून माझे काय कराल ? मेलेल्या कोंबड्याला आगीची भीती नसते ! जिंदगी तर संपत आली !) मी तर पेटलेलोच आहे. आता माझ्यासमोर कोण काय लिहिणार ? तुम्ही सर्कशी करा, तिरकस पवित्रे घ्या, कशिदा काढा, अभिजात बना, काहीही करा बाऽऽस ! मी तर येथे माझ्या जिन्दगीची बाजी लावून बसलेलो आहे. मी तर मरायला तयार राहून लिहीत राहिलो. मी तुमचे कपट, बेईमानी, मनाचा क्षुद्रपणा, कावे, बारकावे आणि कांगावे खूप पाहिले. आता माझी पाळी आलेली आहे. तुमचे 'कालखंड' ठरत असतील; पण मी काळ ओलांडलेला आहे_ हे असे वादळ माझ्या मनात रोरावत असतानाच मी शेर लिहिला,

*येथे पिसून माझे काळीज बैसलो मी*
*आता भल्याभल्यांच्या हातात डाव नाही !*

जुगार खेळताना पत्ते पिसतात ना, तसे मी माझे काळीज पिसून लिहीत आहे. जो काळीज पिसून लिहितो ना, तो कधी हरतच नसतो. आता डाव माझाच.

३.

त्या भल्याभल्यांच्या हातात नसलेल्या डावाची बोळवण करीत असतानाच मला त्यांच्या दुःखाची चीड आली. त्यांची दुःखे तरी कशी ? नितळ, धूसर, मुलायम, मोरपंखी_ आणि वगैरे वगैरे. सुख सोसवत नाही म्हणून अधूनमधून ही पौष्टिक दुःखे बरी असतात विरंगुळ्याला ! उसासे सोडण्याची सुकुमार संधी मिळते ना. कसा हरामखोर व लबाड वर्ग आहे पाहा. ह्याचा टाहो गगनाला भेदून नक्षत्रांनासुद्धा स्पर्श करतो. आणि जे सामान्य लोक खरी व अस्सल मराठी बोलतात, त्यांना साधे कण्हतासुद्धा येत नाही. ते जन्म घेतल्यापासूनच दुःखी असतात, पण त्यांच्यासाठी ही दुनिया नाही. जन्मतात कसेतरी, कसेबसे जगतात आणि कधीतरी मरून जातात. त्यांचे कोण ऐकून घेणार ?

*हमारी जान पे भारी था ग़म का अफ़साना*
*सुनी न बात किसी ने तो मर गये चुपचाप !*

मी माझ्या आयुष्यात हे सामाजिक सत्य अनुभवलेले आहे. आपल्या कारट्याला जर एका खास कॉन्व्हेन्टच्या किन्डरगार्टनमध्ये नुसता प्रवेश मिळाला नाही, तर एरवी आपल्या गोजिरवाण्या फ्लॅटमध्ये बसून 'किती हो बाई महागाई !' अशी नाजुक चर्चा करणारी बाई किती व्याकुळ होते पाहा. म्हणजे आता आपल्या भारताचे कसे होणार ? पण ह्या बाईलासुद्धा अधूनमधून अश्रू, उसासे, हुंदके, उदास स्वप्ने वगैरे 'मसाला' हवा असतोच. रुचिपालट !

भल्याभल्यांचा उल्लेख करतानाच मला त्यांची भाकड 'दुःखे' आठवली, जाणवली आणि त्याच आवेगात मी लिहून टाकले–

*हे दुःख राजवर्खी_ ते दुःख मोरपंखी_*
*जे जन्मजात दुःखी त्यांचा निभाव नाही !*

अशी आहे ह्या शेराची जन्मकथा !

४.

दुःखी जनतेच्या दुःखांचा असा वरीलप्रमाणे विचार करीत असताना मला फक्त स्वतःचाच विचार करणाऱ्या सत्ताधाऱ्यांची जाणीव झाली. स्वातंत्र्याचा सूर्य ह्या वर्गाच्या सोनेरी पिंजऱ्यात कधीच बंदिस्त झालेला आहे. आणि म्हणून जनतेच्या स्वप्नांच्या परिपूर्तीची पहाट आपोआप परागंदा झालेली आहे–

*त्यांना कसे विचारू, 'कोठे पहाट गेली ?'*
*त्यांच्यापल्याड त्यांची कोठेच धाव नाही !*

सूर्य बंदिस्त करून आमच्या पहाटेला पळवून लावणाऱ्या 'राजकारणी' अतिरेक्यांवरचा हा शेर सामान्य लोकांच्या जन्मजात दुःखाची स्पष्ट दखल घेतल्यानंतर अपरिहार्यपणे आला !

असे शेर येतच राहिले. निमंत्रणावाचून येत राहिले. हृदयात तुडुंब साचलेले असते, ते रोजरोज बाहेर पडत नाही, पण जेव्हा ते वाहू लागते, तेव्हा धो-धो वाहू लागते. शब्दांची वाट पाहावी लागत नाही ! आधी अर्थ बोलतो, नंतर शब्द बोलतात.

माझ्या ह्या अनुभवावर मी स्वतः लिहिलेले आहे–

*नाव माझे फुलांनी विचारू नये !*
*नाव सांगेन तेव्हा शहारू नये*
*हा पहा लागला अर्थ बोलावया*
*शब्द येतील; त्यांना पुकारू नये !*

माझे नेहमी हे असेच होते. एक तर मी आरामात गझल लिहितो किंवा लिहीतच नाही. किंवा 'एल्गार'सारखी गझल गळ्यात पडली की, शेरामागून शेर लिहीत जातो. जन्मामागून जन्म होतात !

५.

एका विशिष्ट प्रक्षुब्ध मनःस्थितीत मी लिहीत होतो. मी ज्या समाजव्यवस्थेत जन्मलो, त्या समाजव्यवस्थेचा निर्दयपणा, भंपकपणा, अहंकार व रानटीपणा मला समजू लागले तेव्हापासून जाणवत होता. 'एल्गार' ही गझल लिहिण्याआधीच मराठवाडा विद्यापीठाच्या नामांतराच्या निमित्ताने मराठवाड्यातील दलित बांधवांच्या संसारांची राखरांगोळी करण्यात आली. नामांतराचा प्रश्न तर बाजूलाच राहिला. पण त्या निमित्ताने 'माजलेल्या' दलितांच्या वस्त्याच्या वस्त्या पेटवण्यात आल्या, मुडदे पाडण्यात आले, डोळे काढण्यात आले. पारध करून जिवंत माणसांचे बळी घेण्यात आले. 'नामांतर' हे खरे कारण नव्हते, तर जे पूर्वी लवून 'जोहार' करायचे, ते आता बरोबरीचे होऊ लागले, हे खरे कारण होते. 'नामांतर' तर नुसती निमित्तमात्र ठिणगी होती. भयभीत दलितांनी आपापली गावे सोडून मराठवाड्यातील मोठ्या गावी व शहरी आसरा घेतला. 'उपद्रवी' लोक पळून गेले. लिहीत असताना हा सारा इतिहास माझ्या उरावर



अनुक्रमणिका






येऊन कोसळला आणि मी लिहिले–

*जी काल पेटली ती वस्ती मुजोर होती,*
*गावात सज्जनांच्या आता तणाव नाही !*

गावातील 'महारवाड्या'त दलित समाजच शिल्लक राहिला नाही, तर मग जाळपोळ व रक्तपात होणारच कसा ? ज्यांची वस्ती पेटली, ते लोक 'मुजोर' होते. आपली पायरी ओळखून वागत नव्हते. त्यांच्याच करणीमुळे त्यांची घरे पेटविण्यात आली. ते पळून गेले आणि आता गावात सारे कसे शांत-शांत आहे. तणावाचे तणच उखडले गेले. आता प्रेम व बंधुभावाचे अमाप पीक आहे !

६.

हे सारे अमानुष प्रकार घडूनसुद्धा (काही मोजके साहित्यिक, पत्रकार आणि विचारवंत सोडून) महाराष्ट्रातील बहुतेक साहित्यिक आणि 'विचारवंत' गपगार बसले. मला आठवले की, जेव्हा श्रीमती इंदिरा गांधींनी आणीबाणी घोषित केली, तेव्हा हे एकजात 'लोकशाहीवादी' बुद्धिजीवी अभिव्यक्ती स्वातंत्र्यवाले कोण कोकलत होते ! नामांतराची मागणी चुकीची असो वा बरोबर असो, पण नामांतरवाद्यांना ती मागणी करण्याचा मूलभूत लोकशाही हक्क नव्हता काय ? पण श्रीमती इंदिरा गांधींच्या आणीबाणीच्या नावाने एकच हाकाटी करणारे बहुसंख्य मराठी बुद्धिजीवी मराठवाड्यात झालेल्या अत्याचारांच्या वेळी मात्र चूप बसले ! कुठे गेले त्यांचे लोकशाहीप्रेम ? कुठे गेली त्यांची चीड ? आणि कुठे गेले त्यांचे अश्रू ?

सज्जनांच्या 'तणावरहित' गावाविषयी लिहितानाच माझ्या लक्षात हा सोयीस्कर चामडीबचाऊपणा आला. मराठवाड्यातील अत्याचारांना मराठी साहित्यिकांची सुप्त वर्णाश्रमी कसोटी लावण्यात आली. जणू गप्प बसण्याचा सामुदायिक निर्णयच करण्यात आला होता. आधीचा शेर संपतासंपता ही विसंगती माझ्या लक्षात आली. मग मी माझी प्रतिक्रिया अशी व्यक्त केली–

*झाले कुठे फरारी संतप्त राजबिंडे ?*
*कोठेच आसवांचा बाका बनाव नाही !*

सुज्ञांस अधिक सांगणे नलगे !

७-८-९

मी लिहीतच गेलो_महाराष्ट्रातील सारे बृहस्पती, सारे विद्वान, सारे खंडीभर 'रामशास्त्री'; सारे संतमहंत झोपी गेले होते काय ? की त्यांची निर्विकल्प समाधी लागली होती ? घरादाराची राखरांगोळी झाल्यानंतर, एका विशिष्ट समाजगटात जन्म घेण्याचे 'पातक' केलेल्या दलितांनी कुठे आसरा घ्यायचा ? नेहमीच्या आध्यात्मिक किंवा सरकारी संतांच्या लेखी ह्या राखरांगोळीचे महत्त्व ते काय ? कोणत्याही तपस्वी ऋषीला क्रोध आला नाही. तसे ते मुळातच शांत आणि उदात्त ! कुणाला शाप कशाला देतील ? पुण्यक्षय होतो ना. ह्या ऋषिमुनींनी

आधीच एक संमेलन घेऊन शाप द्यायचे ठरवले असते तर गोष्ट वेगळी होती. गझल लिहीत असतानाच ऐन मोक्यावर फरारी झालेल्या संतप्त राजबिंड्यांचा गनिमी कावा आणि त्यांच्या अश्रूंचा (एरवीचा) बाका बनावही मी उमजलो. उत्तर पेशवाईच्या काळात नारायणराव पेशव्यांच्या खुनाच्या प्रकरणी राघोबादादांना 'देहान्त प्रायश्चित्त' सुनावणारे ते रामशास्त्री वेगळे होते, पण ह्या वेळी तर मराठवाड्यातील दलितांच्या झोपड्या पेटवणाऱ्या गारद्यांना प्रत्यक्ष रामशास्त्रीच सामील झाले. त्यांचे धैर्य अपुरे पडले. त्यांची 'देहान्त वाणी' अस्पष्ट व अडखळती बनली. हे सामाजिक वास्तव माझ्या मनात उलगडले. मी झरझर तीन शेर लिहिले—

*गर्दीत गारद्यांच्या सामील रामशास्त्री–*
*मेल्याविना मढ्याला आता उपाव नाही !*

*जावे कुण्या ठिकाणी उद्‌ध्वस्त पापियांनी ?*
*संतांतही घराच्या राखेस भाव नाही !*

*उच्चारणार नाही कोणीच शापवाणी,*
*तैसा ऋषिमुनींचा लेखी ठराव नाही*

जर रामशास्त्रीच गारद्यांच्या बाजूने असतील, तर नारायणरावाला मेल्यावाचून गत्यंतर नाही. तो जिवंत मढेच ! जर आजचे रामशास्त्री अत्याचारी गुंड व उद्‌ध्वस्त झालेले दलित एकाच मापाने मोजत असतील, तर मग आपल्या डोळ्यांनीच आपल्या घराची आग पाहत बसल्याशिवाय दलितांपुढे दुसरा मार्गच नाही. मला हे तीन शेर लिहीत असताना आजचे "रामशास्त्री" दिसत होते, गोमातेसाठी गळा काढणारे व जिवंत माणसांविषयी मतलबी मौन पाळणारे सरकारी व गैरसरकारी संत दिसत होते आणि आणीबाणीला शिव्या देणारे, पण मराठवाड्यातील दलितांवर कोसळलेल्या "आणीबाणी"विषयी काहीही न बोलणारे ऋषिमुनीही आठवत होते. लिहिताना माझ्यासमोर नामांतराचा प्रश्न नव्हता, तर माणुसकीचा प्रश्न होता ! तर ते असो.

ती "एल्गार" ही गझल खवळलेल्या मनःस्थितीतच लिहिली, पण ऋषिमुनींचा आश्रम असलेला माझा ९ वा शेर लिहून झाल्यावर मी जरा थांबलो. माझ्या लक्षात आले की, माझी कुठेतरी चूक होत आहे, हा मूठभर चामडीबचाऊ व सामाजिक भणंग असलेल्या सांस्कृतिक महारोग्यांचा टीचभर वर्ग म्हणजे मी जिच्यावर काळजाच्या देठापासून प्रेम करतो, ती साधीसुधी माय मराठी जनता नव्हे ! घरामागील उकिरडा पहायचा की, अंगणात फुललेला मोगऱ्यांचा ताटवा पहायचा ? मी मला तेव्हाच बजावले की, हे "ऋषिमुनी" म्हणजे ही करोडो माणसे नाहीत. हे घरात टी. व्ही. समोर बसून अवघ्या विश्वाची चर्चा करणारे 'जीव' नाहीत, तर ही रस्त्यावर उन्हात चालणारी माणसे आहेत. एक दिवस ही साधीसुधी माणसेच एकवटतील.



अनुक्रमणिका







जात व धर्म विसरून एकवटतील आणि निकराचा हल्ला (एल्गार) करून आजची ही निर्दय, नीच व अन्यायी समाजव्यवस्था बदलतील. लिहिता लिहिता, पूर्वीच कधी तरी मनात खोलवर रुजलेला हा प्रत्यय पुन्हा मला शोधत माझ्यापाशी आला. मग मी लिहिले–

*साध्याच माणसांचा एल्गार येत आहे,*
*हा थोर गांडुळांचा भोंदू जमाव नाही !*

तर मी ही अशी गझल पूर्ण करीत गेलो. ज्याचे त्यास ठावे !

११

ह्या लेखाच्या प्रारंभीच मी "एल्गार" चा हा शेवटचा ११ वा शेर उद्‌धृत केला–

*ओठी तुझ्या न आले अद्याप नाव माझे*
*अन् ओठ शोधण्याचा माझा स्वभाव नाही !*

कसे नाव घेतील ? संकोच आडवा येतो.सामाजिक मर्यादा पडतात. शिवाय, महाराष्ट्रात खुलेआम, चारचौघात 'नाव घेणे' हे फार हिंमतीचे काम आहे. तर ते असो. नो कॉमेंटस्.

श्री. शंकर सारडा ह्यांनी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या यंदाच्या दिवाळी अंकासाठी माझा लेख मागितला. मी कसलेला बाका बरकंदाज लेखक नसूनही केवळ त्यांच्या संपादकीय कौशल्यामुळे नको त्या फंदात पडलो. पुढील वर्षीच्या महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या दिवाळी अंकात माझा लेख नसेल, अशी मी आशा करतो.

पण एक गोष्ट सांगून ठेवतो. "एल्गार" ह्या माझ्या गझलेच्या जन्मकथेतील जन्मकथा, ही गझल लिहीत असतानाच माझ्यात शिरल्या आणि त्या मी शेरांच्या रूपाने एका मागून एक अशा लिहून काढल्या. माझ्या शेरांनी कसा आकार घेतला, त्याची पार्श्वभूमी मी स्पष्ट केली. मी एकाच बैठकीत "एल्गार" ही गझल लिहून काढली. लिहीत असताना मी उचंबळत राहिलो. त्या एकेक उचंबळीचा अनुभव मी तपशिलांसह येथे दिला आहे.

मी गझल लिहिण्यासाठी एखाद्या निसर्गरम्य व निवांत ठिकाणी जात नसतो किंवा "ह्या जगापासून दूर-दूर-" जाऊन कुठेतरी "अज्ञात स्थळी दडी मारून बसत नसतो. माझी गझल सदैव माझ्याबरोबर असते. ती माझ्याबरोबर भोवतीच्या माणसात असते. ही गझल माझ्या मित्रांशी गप्पा मारीत असतानाच– पण एकाच प्रदीर्घ बैठकीत लिहून काढली.

तर असो. भूलचूक देणेघेणे. माझ्या आवडत्या गझलेच्या जन्मकथेतील जन्मकथांची निर्मितिप्रक्रिया अक्षरशः ही अशी झाली. भरोसा रखना है तो रखो !

(सुरेश भट, रामकृष्ण मठाजवळ, धनतोली, नागपूर ४४० ०१२)



अनुक्रमणिका







**क्रांतीचा जयजयकार** (पृष्ठ ८ वरुन)

'कोलंबसाचं गर्वगीत' कवितेनं आपल्याला असा आधार दिल्याचं अनेकांनी कळवलं होतं. भाववश झालेल्या एका प्राध्यापकानं तर माझे हात घट्ट धरून 'या कवितेमुळेच मी आज उभा आहे,' असं सांगितलं होतं.

'जा जरा पूर्वेकडे' ही विशाखातील कविता मला आवडलेली, पण वाचकांच्या फारशी लक्षात न आलेली. पण त्या कवितेसंबंधीचा एक अभिप्राय माझ्या स्मरणात आहे. तो अभिप्राय मर्ढेकरांचा. मी धनुर्धारीत असताना, मर्ढेकर (बहुधा ग. य. चिटणीसांबरोबर) आमच्या कचेरीत येत. प्रभाकर पाध्यांशी गप्पा मारण्यासाठी. समुद्रकाठी असलेल्या त्यांच्या घरीही आम्ही एकदा गेलो होतो. मर्ढेकर बोलायचे फार कमी; पण जे काही बोलणं असे त्यात मराठी, विशेषतः समकालीन कवींच्या काव्यासंबंधी आवडल्या-नावडल्याचा एकही उद्गार त्यांनी कधी आमच्या या बैठकीत तरी काढलाः नाही. त्यांच्या गणितात न बसणाऱ्या आमच्यासारख्यांच्या कविता त्यांनी कधी वाचल्याही नसाव्यात, असा माझा ठाम ग्रह होता. पण साहित्यसंघातर्फे भरलेल्या एका कविसंमेलनात त्यांनी मला धक्काच दिला. संमेलन चालू असता ते माझ्याजवळ आले आणि म्हणाले, 'जा जरा पूर्वेकडे' ही कविता तुम्ही वाचा माझ्यासाठी.

पण सर्वांत लक्षणीय अनुभव आला तो 'गर्जा जयजयकार' या कवितेसंबंधीचा. १९३९ साली (बहुधा) डमडमच्या तुरुंगात पन्नास-साठ राजबंद्यांनी प्राणांतिक उपोषण सुरू केलं होतं. पुण्याच्या दै. प्रभातमध्ये रात्रपाळी करीत असता या बातम्या माझ्या टेबलावर येऊन पडत होत्या. राजबंदी मृत्यूच्या अगदी दाराशी येऊन ठेपले त्या काळात ही कविता लिहिली गेली. ती ज्योत्स्ना मासिकात प्रकाशित झाली. या कवितेनं तुरुंगापासून दलाच्या, संघाच्या शाखांपर्यंत सर्वत्र प्रवेश केला होता, हे मला तीन-चार वर्षांनी समजलं. मी पत्रव्यवसायात मग्न होतो. आपल्या कवितांचं पुढे काय होतं याचा शोध घेण्याचा प्रयत्न मी करीत नव्हतो.

ही कविता अनपेक्षित ठिकाणी संचार करते आहे हे प्रथमतः मला समजलं ते अमरशेखना पुण्यातील एका साहित्यिक मेळाव्यात ती गाण्याची परवानगी अध्यक्षांनी नाकारली तेव्हा. या प्रकरणानं पुण्यात थोडी खळबळ उडाली होती. पण या कवितेचा माझ्याशी काही संबंध आहे हे इतरांना राहो, पण कचेरीतील माझ्या सहकाऱ्यांनाही माहीत नव्हते. पुढे अमरशेख माझ्या खोलीवर आले. कविता तुम्हाला ऐकवायची आहे म्हणाले. ते गायला लागले. अमरशेखचा आवाज, केवळ कंठानं नव्हे तर सर्वांगानं कविता गाण्याची त्यांची घाटणी, प्रत्येक शब्द संचेतन ज्वालाग्रही करण्याची त्यांची ताकद– सारंच अद्वितीय होतं. मला स्वतःलाही तो एक अपूर्व अनुभव होता. जाणीव व्यापून टाकणाऱ्या एका भावनेच्या उद्रेकात मी ती कविता लिहिली होती. त्या कागदांवरील लिखित शब्दांतून इतकी चेतना, इतकी धग निर्माण होऊ शकते हे अमरशेखच्या गाण्यातूनच मला प्रथमतः जाणवले. या कवितेसंबंधीची पुढील काळातील एक आठवण अमरशेखनेच कोठे तरी सांगितली आहे. ते तुरुंगात होते आणि तेथे ते बंदिवानांसह ती कविता नेहमी गात असत. अमरशेख मुक्त झाले त्या दिवशी तुरुंगाच्या जेलरनं अमरला



अनुक्रमणिका



विनंती केली, बाहेर जाण्यापूर्वी माझ्या घरी कृपया येऊन जा. अमरशेख त्याप्रमाणे गेले. तेथे तुरुंगातील सर्व अधिकारी, कामगार दाटीवाटीनं बसलेले. जेलरनं अमरशेखना विनंती केली, 'तुम्ही येथून जाण्यापूर्वी ती कविता आम्हा सर्वांना तुमच्याकडून ऐकायची आहे.' अमरशेख कविता गायले. कैदखाना सांभाळणारेच तेवढ्या वेळेपुरते स्वेच्छेने कैदी झाले होते. हा त्या कवितेचा फार मोठा सन्मान होता असं मला वाटतं.

**क्रांतीचा जयजयकार**

(अन्नत्याग करून मृत्यूच्या दारात पाऊल टाकताना राजबंद्यांच्या ओठावर असलेच गाणे स्फुरले नसेल काय ?)

*गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार*
*अन् वज्रांचे छातीवरती घ्या झेलून प्रहार !*
*खळखळु द्या या अदय शृंखला हातापायांत*
*पोलादाची काय तम्मा मरणाच्या दारात ?*
*सर्पांनो उद्दाम, आवळा कसूनिया पाश*
*पिचेल मनगट परी उरातिल अभंग आवेश*
*तडिताघाते कोसळेल का तासंचा संभार*
*कधीही तारांचा संभार*
*गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !*

*क्रुद्ध भूक पोटात घालु द्या खुशाल थैमान*
*कुरतडु द्या आतडी करू द्या रक्ताचे पान*
*संहारक काली, तुज देती बळीच आव्हान*
*बलशाली मरणाहुन आहे अमुचा अभिमान*
*मृत्युंजय आम्ही ! आम्हांला कसले कारागार ?*
*अहो हे कसले कारागार ?*
*गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !*

*पदोपदी पसरूनि निखारे आपुल्याच हाती*
*होऊनिया बेहोष धावलो ध्येयपथावरती*
*कधि न थांबलो विश्रांतीस्तव, पाहिले न मागे*
*बांधु न शकले प्रीतीचे वा कीर्तीचे धागे*
*एकच तारा समोर आणिक पायतळी अंगार*
*होता पायतळी अंगार*

गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !
श्वासांनो, जा वायूसंगे ओलांडुनि भिंत
अन् आईला कळवा अमुच्या हृदयांतिल खंत
सांगा वेडी तुझी मुले ही या अंधारात
बद्ध करांनी अखेरचा तुज करिती प्रणिपात
तुझ्या मुक्तिचे एकच होते वेड परी अनिवार
तयांना वेड परी अनिवार
गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !

नाचविता ध्वज तुझा गुंतले शृंखलेत हात
तुझ्या यशाचे पवाड गाता गळ्यात ये तात
चरणांचे तव पूजन केले म्हणुनि गुन्हेगार
देता जीवन-अर्घ्य तुला ठरलो वेडेपीर
देशिलना पण तुझ्या कुशीचा वेड्यांना आधार
आई, वेड्यांना आधार
गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !

कशास आई भिजविसी डोळे, उजळ तुझे भाल
रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल
सरणावरती आज आमुची पेटताच प्रेते
उठतिल त्या ज्वालांतुन भावी क्रांतीचे नेते
लोहदंड तव पायांमधले खळाखळा तुटणार
आई, खळाखळा तुटणार
गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !

आता कर ओंकारा, तांडव गिळावया घास
नाचत गर्जत टाक बळींच्या गळ्यावरी फास
रक्तमांस लुटण्यास गिधाडे येऊ देत क्रूर
पहा मोकळे केले आता त्यासाठी ऊर
शरिरांचा कर सुखेनैव या सुखेनैव संहार
मरणा सुखेनैव संहार
गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार !

(वि.वा.शिरवाडकर, जलतरण तलाव, नाशिक २)

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

## महत्त्वपूर्ण मराठी प्रकाशने

कार्मेलीन (कोंकणी कादंबरी) दामोदर मावजो अनुवादक : नरेश कवडी ५०/-
लोकांचे राज्य (आसामी कादंबरी) बीरेंद्र कुमार भट्टाचार्य
अनुवादिका : शांता ज. शेळके ८५/-
जा ओलांडुनी (कन्नड कादंबरी) सन्तेशिवरा लिंगण्णैया भैरप्पा
अनुवादिका : सौ. उमा कुळकर्णी ८०/-
चेम्मीन (मल्ल्याळम कादंबरी) तकझी शिवशंकर पिल्ले
अनुवादक : प्रमोद जोशी २५/-

## आगामी प्रकाशने

**निवडक हरि नारायण आपटे**
संपादक : कै. विद्याधर पुंडलीक
**सात पाऊले आकाशी**
कुंदनिका कापडीआ अनुवादिका : सौ. उषा पुरोहित
**माणुसकीच्या ज्योती**
वेरचंद मेघाणी अनुवादक : अच्युतभाई देशपांडे ४५/-

## हिंदी प्रकाशने

**सौंदर्य-मीमांसा**
रा. भा. पाटणकर अनुवादक : चंद्रकांत बांदिवडेकर १२०/-
**आजादी**
चमन नाहल अनुवादक : प्रभाकर माचवे ६०/-

## English

**Rajatarangini** by Ranjit Sitaram Pandit 150/–
Rabindranath Tagore
A Centenary Volume (1861-1961) 200/–




**साहित्य अकादमी-प्रादेशिक कार्यालय**
१७२, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०००१४ फोन : ४१३५७४४



अनुक्रमणिका



साहित्यिकांनीही संग्रही ठेवावीत अशी आमची काही निवडक पुस्तके

| | |
|---|---|
| धों.वि. देशपांडे | |
| **मला दिसलेली नाटके** | ६०-०० |
| ग.वा. कवीश्वर | |
| **महाभारताची गूढ रहस्ये** | ६०-०० |
| दाजी पणशीकर | |
| **कर्ण खरा कोण होता** | ४५-०० |
| (४ थी आवृत्ती) | |
| अरुण सारथी | |
| **महाराष्ट्राची शोकांतिका** | २५-०० |
| ग.वा. कविश्वर | |
| **ज्ञानेश्वरी विरुद्ध गीता** | २०-०० |
| (२ री आवृत्ती) | |
| पु.ना. ओक | |
| **ताजमहाल हे तेजोमहालय आहे** | ५०-०० |
| भा.कृ. केळकर | |
| **समाजसुधारक सावरकर** | ३५-०० |
| (२ री आवृत्ती) | |
| ग.वा. बेहेरे | |
| **संसारयात्रा** | ६०-०० |
| **आनंद यात्रा** | ६०-०० |
| **निसर्ग यात्रा** | ६०-०० |
| **अक्षर यात्रा** | ६०-०० |
| डॉ. रा.श्री. मोरवंचीकर | |
| **दक्षिणकाशी पैठण** | ६०-०० |

# रविराज प्रकाशन / अस्मिता प्रकाशन

४५८/२ सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
फोन क्र. ४४३५९७

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



## *आमची एकापेक्षा एक दर्जेदार प्रकाशने*

(१) महाबँकेत एक भिकारी (आत्मनिवेदन) रु.६०/—
(२) काफर (कादंबरी) रु.७०/—
(३) यशवंतराव चव्हाण (चरित्र) रु.३५/—
(४) महासागर (कादंबरी) रु.४०/—
(५) मैली गंगा (कथासंग्रह) रु.४०/—
(६) विस्तवाशी खेळायचंय मला (कादंबरी) रु.७०/—
(७) पराभूत (कादंबरी) रु.८०/—
(८) स्वस्ति श्री वटेशु (धार्मिक) रु.२०/—
(९) गगनाला गवसणी (कादंबरी) रु.५०/—
(१०) अस्पर्श (कादंबरी) रु.८०/—

## *आगामी प्रकाशने*

**'भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी केलेले शरसंधान !'**
(बाबासाहेबांच्या मूळ इंग्रजी ग्रंथावर आधारित रसग्रहण)
**'दर्द'** (कथासंग्रह)
**'परतीबंद'** (कथासंग्रह)
**'जोहार मायबाप'** (धार्मिक)
**'बँक-बँक'** (कादंबरी)
**'निष्पाप'** (कादंबरी)

**मायबोली मराठीच्या सेवेत—**

**प्रीतमसिंग जुनेजा**
जनवाणी प्रेस, ४५-अ, बुधवार पेठ पुणे- २.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







# देशमुख आणि कंपनी (पब्लिशर्स) प्रा. लि.

'सावली' ४७३, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

*आगामी प्रकाशने*

१) कुसुमाग्रज (वि. वा. शिरवाडकर)

**विचार धारा**
**वि. स. खांडेकरांच्या**

२) कॉम्रेड मालिनी तुळपुळे

३) डॉ. सुलोचना देशमुख

**माझा मित्र पंडित**
**(नरहर कुरुंदकर)**

*नवी प्रकाशने*

जाई निंबकर
**साथ**

प्रतिमा इंगोले
**जावयाचं पोर**

अनुक्रमणिका

**मीनल प्रकाशनाचे शतक !**

**आमचे १०० वे अभिमानास्पद प्रकाशन**

**'देशी-विदेशी खेळ' या महामालिकेतील पहिले पुस्तक**

# क्रिकेट

**बाळ ज. पंडित**

**या व येणाऱ्या प्रत्येक पुस्तकात -**




- खेळाचा थोडक्यात इतिहास
- खेळ कसा खेळावा / प्रचलित नियम
- पूरक व्यायाम व आहार
- भारतीय खेळाडू
- भारतातील व परदेशातील स्पर्धा
- प्रशिक्षण / ग्राऊंडस् / सामान
- सरकारी मदत / अनुदान
- भविष्यात खेळाडूंना वाव
- जागतिक रेकॉर्डस्

याशिवाय आणखीही भरपूर माहिती.

- ७ × ८.१/२ इंच आकार (आडवा)
- भरपूर छायाचित्रे, आकृत्या
- उत्कृष्ट डबलस्प्रेड मुखपृष्ठ
- मॅपलिथो कागदावरील संपूर्ण ऑफसेट छपाई

**लवकरच प्रकाशित होत आहे**

**मीनल प्रकाशन**

२६१८ अे, देशपांडे गल्ली, कोल्हापूर -४१६०१२.

दूरध्वनी । २९२४०.



अनुक्रमणिका

